प्रेमबोध प्रकाशन

तत्त्वविवेचक प्रस्तावना, शब्दकोश, व अभंग सूची यांसह

ओळीचे अभंगांची

# श्री सकल संत गाथा



संपादक

गोपाळ शंकर राहिरकर, बी. ए., एल्एल्.बी. ॲडव्होकेट, पुणें

[illegible]लचंद्र पंढरिनाथ बाहिरट, एम्.ए., पंढरपूर

भोगीलाल भाईदास कंपानी, बी.ए., एल्एल्.बी. ॲडव्होकेट, मुंबई

मुद्रक व प्रकाशक

गोपाळ शंकर राहिरकर

श्रीज्ञानेश्वर मुद्रणालय, ७७० शुक्रवार पेठ, पुणें २.



[illegible]तक, १८७७ ) किंमत ६ रुपये ( नोव्हेंबर, १९५५

# अर्पण पत्रिका



नामस्मरण आणि भजन याच केवळ उपासनेनें
ज्यांच्या जीवनांत भक्तिसुख व संतबोध साकार
झाला, त्या विश्वात्मक, श्रीविठ्ठलभक्त

**श्रीसंत सद्‌गुरु दादामहाराज सातारकर**

यांना

त्यांच्याच कृपाप्रसादानें लाभलेलीं हीं वाक्‌पुष्पें
सप्रेम सादर समर्पण

# विषयानुक्रमाणिका



# पुरवणी अभंग

मागाहून सुचलेले व नजरचुकीनें राहिलेले अभंग खालीं दिले असून छापण्याचे सोईचे दृष्टीनें यांतून राहिलेले अभंग पृ. ६४३ वर दिले आहेत.

रूपपरः--

सत्यज्ञानानंत गगनाचें प्रावर्ण । नाहीं रूप वर्ण गुण जेथें १ तो हा श्रीहरी पाहिला डोळेभरीं। पाहतां पाहणे दुरीं सारोनियां २ ज्ञानदेव म्हणे ज्योतिची निजज्योती । ते हे उभी मूर्ति विटेवरीं ॥ ३ ॥

नामपर-कीर्तनपरः—

सेवा ते आवडीं उच्चारावें नाम । भेदाभेद काम निवारूनि १ नलगे हालावें चालावें बाहेरी। अवघेंचि घरीं बैसलिया २ देवाचींच नामें देवाचिया शिरीं। सर्व अळंकारीं समर्पावीं ३ तुका म्हणे होय भावेंचि संतोषी। वसे नामापाशीं आपुलिया ॥ ४ ॥

कीर्तन ऐकावया भुलले श्रवण । श्रीमुख लोचन देखावया १ उदित हें भाग्य होईल कोणें काळीं। चित्त तळमळीं म्हणऊनि २ उतावीळ बाह्या भेटिलागीं दंड। लोटांगणीं धड जावयासी ३ तुका ह्मणे माथा ठेवीन चरणीं। होतील पारणीं इंद्रियांचीं ॥ ४ ॥

नाम तेंचि रूप रूप तेंचि नाम । नामरूपा भिन्न नाहीं नाहीं १ आकारला देव नामरूपा आला। म्हणोनी स्थापिलें नाम वेदीं २ नामा परता मंत्र नाहीं हो आणिक। सांगती ते मूर्ख ज्ञानहीन ३ नामा म्हणे नाम केशव केवळ। जाणती प्रेमळ भक्त भले ॥ ४ ॥

करुणा-भेटीः—

आर्त माझ्या बहु पोटीं । व्हावी भेटी पायाशीं १ आस तुम्ही कृपावंता। माझी चिंता असों द्या २ तळमळ करी चित। अखंडित वियोगें ३ तुका म्हणे पंढरीनाथा। जाणें वेथा अंतरींची ॥ ४ ॥

बोलविलीं तैसें आणी अनुभवा । नाहीं तरी देवा विटंबना १ मिठेंविण काय करावें मिष्टान्न। शव जीवेंविण शृंगारिलें २ संपादणींविण विटंबिलें सोंग। गुणेंविण चांग रूप हीन ३ कन्यापुत्रेंविण मंगळदायकें। वेचिलें हें फिकें द्रव्य तरी ४ तुका म्हणे तैसी होते मज परी। न देखें अंतरीं प्रेमभावें ॥ ५ ॥

समर्थाचें बाळ पांघरे वांकळ। हासती सकळ लोक कोणा १ समर्थासी लाज आपुल्या नांवाची। शरण आल्याची लागे चिंता २ तरी तुज कांहीं होईल उचित। तरी हा पतित तारी तुका ॥ ३ ॥

वियोगाच्या दुःखें । आळवितों करुणामुखें १ कृपावंते माझे आई। धांव घाली वो विठाई २ देऊनियां भेटी। आतां अवलोकावें दिठीं ३ निळा म्हणे प्रेमपान्हा। पाजीं लावूनियां स्तना ॥ ४ ॥

दुरुनी आलों तुझे भेटी । सांगावया जीवींची गोष्टी १ बोलगा बोल मजशीं कांहीं। दृष्टी वळवूनी मजकडे पाही २ अरे तूं कृपाळु दीनांचा। महा उदार थोर मनाचा ३ भक्तें पुंडलिकें गोंविलासे लोभें। प्रीतीच्या प्रेमें वळलासी वल्लभे ४ युगें अठ्ठावीस भरलीं। धणी अझुनी नाहीं पुरली ५ प्राण होती माझे कासाविस। नामा म्हणे कां धरिलें उदास ॥ ६ ॥

विठ्ठलपरः—

विठ्ठल आमुचा निजाचा। सज्जन सोयरा जीवाचा १ माय बाप चुलता बंधु। अवघा तुजशी संबंधु २ उभय कुळीं साक्ष। तूंचि माझा मातुळपक्ष ३ समर्पिली काया। तुका म्हणे पंढरीराया ॥ ४ ॥

विठ्ठल माझा जीव विठ्ठल माझा भाव। कुळधर्म देव विठ्ठल माझा १ विठ्ठल माझा गुरु विठ्ठल माझा तारू। उतरील पारू भवनदीचा २ विठ्ठल माझी माता विठ्ठल माझा पिता। विठ्ठल चुलता बहिणी बंधू ३ विठ्ठल हे जन विठ्ठल माझें मन। सोयरा सज्जन विठ्ठल माझा ३ तुका म्हणे माझा विठ्ठल विसावा। नस्वरित गांवा जाइन त्याच्या ॥ ५ ॥

विठ्ठल टाळ विठ्ठल दिंडी। विठ्ठल तोंडीं उच्चारा १ विठ्ठल अवघ्या भांडवला। विठ्ठल बोला विठ्ठल २ विठ्ठल नाद विठ्ठल भेद। विठ्ठल छंद विठ्ठल ३ विठ्ठल सुखा विठ्ठल दुःखा। तुकयामुखा विठ्ठल ॥ ४ ॥

आवडी धरोनी आलेती आकारा। केला हा पसारा याजसाठीं १ तें मी तुझें नाम गाईन आवडीं। क्षण एक घडी विसंबेना २ वर्म जाणावें हा मुख्य धर्मसार। अवघे प्रकार तयापासीं ३ वेगळया विचारें वेगळाले भाव। धरायासी ठाव बहु नाहीं ४ तुका म्हणे घालूं इच्छेचिये पोटीं। कवळुनी धाकुटी मूर्ती जीवें ॥ ५ ॥

आम्हां आवडे नांव घेतां। तोही पिता संतोषे १ उभयतां एक चित्त। तरी प्रीत वाढली २ आम्ही शोभों निकटवासें। अनारिसें न दिसों ३ तुका म्हणे पांडुरंगें। अवघीं अंगें निवालीं ॥ ४ ॥

भक्तवत्सलता :—

भक्त समागमें सर्वभावें हरी। न सांगतां करी सर्व काम १ सांठविला राहे हृदयसंपुष्टीं। बाहेर धाकुटी मूर्ति उभा २ मागण्याची वास पाहे मुखाकडे। चिंतिल्या रोकडे मनोरथ ३ तुका म्हणे जीवभाव देवा पायीं। ठेवूनियां कांहीं न मागती ॥ ४ ॥

एके रात्रीचे समयीं। देव आले लवलाहीं १ सुखशेजे पहुडले। जनीसवें गुज बोलें २ गुज बोलतां बोलतां। निद्रा आली अवचिता ३ उठा उठा चक्रपाणी। उजाडलें म्हणे जनी ॥ ४ ॥

ऊंस डोंगा परी रस नव्हे डोंगा। काय भुललासी वरलीया रंगा १ कमान डोंगी परी तीर नोहे डोंगा। काय भुललासी वरलिये रंगा २ नदी डोंगी परी जळ नव्हे डोंगें। काय भुललासी वरलिया रंगें ३ चोखा डोंगा परी भाव नव्हे डोंगा। काय भुललासी वरलिया रंगा ॥ ४ ॥

नाटपरः—

कई देखतां होईन डोळीं। सकळां भूतीं मूर्ति सांवळी। जीवा नांवा भूमंडळीं। जळीं स्थळीं काष्ठीं पाषाणीं १ ऐसी कृपा करील नारायण। जीव जगाचा होईन। प्रेमसागरीं बुडईन। होईल स्नान अनुतापीं २ ऐसा कई येईन दैवास। हश्य नासोनी जाईल आस। सदा संतचरणीं देहाचा वास। सेवीन शेष धणीवरी ३ कई नवसा येतील अंकुर। सुखा नाहींसा होईल पार। अमृत तें पृथ्वी जळ सागर। वाहाती पूर आनंदाचे ४ प्रसन्न दया क्षमा शांति। कई नवविधा होईल भक्ति। भोगईन वैराग्यसंपत्ति। मनोरथ कळती तंई पुरले ५ तुकयाबंधु म्हणे सांग। नव्हे तुजविण निरसेना पांग। म्हणोनि घातलें साष्टांग। पांडुरंगा चरणावरीं ॥ ६ ॥

एक मागणें हृषीकेशी। चित्त द्यावें सांगतों वचनासी। मज अंतर तुझ्या चरणासी। न पडे ऐसी कृपा करीं १ नको दुजी बुद्धी आणीक। रिद्धिसिद्धि परलोक। तूं स्वामी मी सेवक। खंडणा नको करूं ऐसी २ मना येईल तो जन्म देई। भलते कुळीं भलते ठायीं। तें मी सांकडें घालीत नाहीं। हृदयींहुनि तुवां न वजावें ३ इतुकें करी भलत्यापरी। भलत्या भावें तुझे द्वारीं। राहेन दास होऊनी कामारी। वदो वैखरी नित्य नाम ४ नको विचारूं दुसरें आतां। शरण आलों जी पंढरीनाथा। तुकयाबंधु म्हणे रे अच्युता। आहेसी तूं दाता दानशूर ॥ ५ ॥

उभा देखिला भीमातीरीं। कर मिरविले कटावरी। पाउलें समचि साजिरी। नाम तरी अनंत अति गोड १ शंखचक्रांकितभूषणें। जडित मेखळा चिद्रत्नें। पीतांबर उटी शोभे गोरेपणें। लोपलीं तेणें रवितेजें २ श्रवणीं कुंडलें देती ढाळ। दशांगुळीं मुद्रिका माळ। दंत ओळी हिरे झळाळ। मुख निर्मळ सुखरासी ३ कटीं कडदोरा वाकी वेळां। बाहीं बाहुवट पदक गळां। मृगनाभीं रेखिला टिळा। लवती डोळां विद्युल्लता ४ सुंदरपणाची साम्यता। काय वर्णावी ते पावे आतां। तुकयाबंधु म्हणे रे अच्युता। धन्य ते माता पिता प्रसवली ॥ ५ ॥

संतपर—वैष्णवपर :—

देव ते संत देव ते संत । निमित्य त्या प्रतिमा १ मी तों सांगतसें भावें । असों ठावें सकळां २ निराकारीं ओस दिशा । येथें इच्छा पुरतसे ३ तुका म्हणे रोकडें केणें । सेवितां येणें पोट धाय ॥ ४ ॥

धन्य आजि दिन । जाले संतांचें दर्शन १ जाली पापातापा तुटी । दैन्य गेलें उठाउठीं ४ जालें समाधान । पायीं विसांवलें मन ३ तुका म्हणे आले घरां । तोचि दिवाळी दसरा ॥ ४ ॥

धन्य आजि दिन संत दरुशनाचा । अनंत जन्मींचा शीण गेला १ मज वाटे त्यासी आलिंगन द्यावें । कदां न सोडावें चरण त्यांचे २ त्रिविध तापांची झाली बोळवण । देखिल्या चरण वैष्णवांचे ३ एका-जनार्दनीं घडो त्यांचा संग । न व्हावा वियोग जन्मोजन्मीं ॥ ४ ॥

गुरुचिया मुखें होईल ब्रह्मज्ञान । न कळे प्रेमखूण विठोबाची १ वेदांतें विचारा पुराणातें पुसा । विठोबाचा कैसा प्रेमभाव २ तुका म्हणे सांडा जाणिवेचा शीण । विठोबाची खूण जाणती संत ॥ ३ ॥

अमृताचीं फळें अमृताची वेली । तेचि पुढें चाली बीजाचीही १ ऐसियांचा संग देई नारायणा । ओलावा वचना जयांचिया २ उत्तम सेवन सीतळ कंठासी । पुष्टी कांति तैसी दिसे वरी ३ तुका म्हणे तैसें होई-जेत संगें । वास लागे अंगें चंदनाच्या ॥ ४ ॥

भाग्यवंता ऐशी जोडी । परवडी संतांची १ धन घरीं पांडुरंग । अभंग जें सरेना २ जनाविरहित हा लाभ । टांचें नभ सांठवणें ३ तुका म्हणे विष्णुदासां । नाहीं आशा दुसरी ॥ ४ ॥

भूत भविष्य कळों यावें वर्तमान । हे तों भाग्यहीन त्यांची जोडी १ आम्ही विष्णुदासीं देव ध्यावा चित्तें । होणार तें होतें प्रारब्धानें २ जग-रूढीसाठीं घातलें दुकान । जातो नारायण अंतरोनी ३ तुका म्हणे हा हो प्रपंच गाढा । थोरली ते पीडा रिद्धिसिद्धी ॥ ४ ॥

आम्हा अळंकार मुद्रांचे शृंगार । तुळसीचे हार वाहों कंठीं १ लाडिके डिंगर पंढरीरायाचे । निरंतर वाचे नामघोष २ आम्हा आणिकांची चाड चित्ती नाहीं । सर्वसुखें पायीं विठोबाच्या ३ तुका म्हणे आम्ही वैयोचि या मुक्ती । एकाविण चित्तीं दुजें नाहीं ॥ ४ ॥

वृक्षवल्ली आम्हां सोयरीं वनचरें । पक्षीही सुस्वरें आळविती १ येणें सुखें रुचे एकांताचा वास । नाहीं गुणदोष अंगा येत २ आकाश मंडप पृथिवी आसन । रमें तेथें मन क्रीडा करी ३ कंथाकमंडलु देहउपचारा । जाणवितो वारा अवसरु ४ हरीकथा भोजन परवडी विस्तार । करोनि

प्रकार सेवूं रुची ५ तुका म्हणे होय मनासी संवाद । आपुलाचि वाद आपणासी ॥ ६ ॥

गौळण–विहरिणीः—

माझें अचडें बचडें छकुडें ग राधे रूपडे। पांघरु घालिती कुंचडे ॥धृ०॥ हरि माझा गे सावळा । पायीं पैंजण वाजती खुळखुळा । यानें भुलवि त्या गोपी बाळा १ हरि माझा गे नेणता। करि त्रिभुवनाचा घोंगता । जो का नांदे त्रिभुवनीं २ ऐसे देवाजीचे गडी । पेंद्या सुदामाची जोडी। बाळिभद्र त्याचा गडी ३ जनी म्हणे तू चक्रपाणी । खेळ खेळतो वृंदावनीं । लुब्ध झाल्या त्या गौळणी ॥ ॥ ४ ॥

अवचिता परिमळु झुळकला अळुमाळु । मी म्हेंण गोपाळु आला गे माये । चांचरती चाचरती बाहेरीं निघालें । ठकाचि मी ठेलें काय करूं १ मज करा कां उपचारु अधिक तापभारु । सखिये शारंगधरु भेटवा कां ॥ धृ० ॥ तो सांवळा सुंदरु कासे पितांबरु । लावण्य मनोहरु देखियेला । भरलिया दृष्टीं जंव डोळां न्याहाळी । तंव कोठें वनमाळी गेला गे माये २ बोधोनि ठेलें मन तंव जालें आनेआन । सोकोनि घेतले प्राण माझे गे माये । बापरखुमादेवीवरु विठ्ठलु सुखाचा । तेणें कायां मनें वाचां वेधियेलें ॥ ३ ॥

मउ मेणाहूनी आम्ही विष्णुदास। कठीण वज्रास भेदूं ऐसें १ मेले जित असों निजोनियां जागे । जो जो जें जें मागे तें तें देऊं २ भले तरी देऊं गांडींची लंगोटी । नाठ्याळाचे काठीं मारूं माथां ३ मायबापाहूनी बहु मायावंत । करूं घात पात शत्रुहूनि ४ अमृत तें गाड काय आम्हांपुडें । विष तें बापुडें कडू किती ५ तुका म्हणे आम्ही अवघेचि गोड । जया पुरे कोड त्याचे परी ॥ ६ ॥

आम्ही क्षेत्रींचे संन्यासी । देहभरित हृषीकेशी । नाहीं केली ऐसी। आशा काम बोहरी १ आले अयाचित अंगा। सहज तें आम्हा भागा । दाता पांडुरंगा । ऐसी करितां निश्चिती २ दंड धरिला दंडायमान। मुळीं मुंडिलें मुंडण । बंदीं बंद कौपीन। बहिर्वास औठडें ३ काळें साधियेला काळ। मन करुनि निश्चळ। लौकिकीं विटाळ । धरुनि असो एकांता ४ कार्यकारणाची चाली । वाचा वाचत्वें नेमिली । एका नेमें चाली । स्वरूपींच राहाणें ५ नव्हे वेषधारी । तुका आहाच वरवरीं । आहे तैसी बरी। खंडे ओळखी वेदांची ॥ ६ ॥

---

# प्रस्तावना



श्रीज्ञानेश्वर माऊलींनीं ज्याचा पाया घातला व श्रीतुकोबाराय ज्याचे कळस झाले, त्या भक्तिप्रेमधर्ममंदिराचा गाभारा त्यांचें अभंगवाङ्मयांतच आहे. श्रीज्ञानेश्वरी व श्रीनाथभागवतादि ग्रंथाहून अभंग वाङ्मयाचें वैशिष्ट्य, त्या त्या महान् संतांचे ते आत्मानुभूतीचे, स्फूर्तींचे उद्गार, किंवा पूर्व ग्रंथनिरपेक्ष स्वतंत्र निवेदन म्हणून विशेष आहे. इतर ग्रंथावर टीका लिहितांना, त्यांना आपली स्वतंत्र मतें सांगण्याचे वेळीं मूळ ग्रंथ न सोडतां मुरड घालावी लागली. तेंच, अभंग वाङ्मयांत त्यांना आपलें स्पष्ट मत सहजस्फूर्त शब्दांनीं उकलून दाखवण शक्य झालें आहे. या दृष्टीनें श्रीसंतांचें अभंगवाङ्मय हाच त्यांच्या तत्वज्ञानाचा गाभा मानला पाहिजे; व भक्तिमार्गांत पाऊल टाकणाऱ्या भाविकांनीं, व चिकित्सक अभ्यासकांनीं या दृष्टीनें या अभंगसंकलनाचा अभ्यास करावा अशी विनंति आहे.

संस्कृत ग्रंथातलेंच ज्ञान, मराठींत फक्त सुलभ भाषेत श्रीसंतानीं मांडलें हा एक भ्रम कांहींच्या चित्तांत असतो. त्यांना या ग्रंथाच्या अवलोकनानें तो अगदीं फोल असल्याचें आढळून येईल. श्रीसन्तांनीं भाषांतराचें काम केलें किंवा वेदांताचीच केवळ 'री' ओढली नाहीं तर त्यांनीं अवश्य तेथें स्वानुभवाप्रमाणें आपलें स्वतंत्र तत्वज्ञान रेखाटलेलें आहे, हें अखेरीं मान्य करणें भाग आहे.

आमच्या म्हणण्याच्या स्पष्टीकरणार्थ आम्ही खालील गोष्टींकडे सर्वांचें मुद्दाम लक्ष वेधूं इच्छितो.

( १ ) वेदांतादि शास्त्रांनीं मुक्ति अगर मोक्ष हेंच अखेरचें निःश्रेयस मानलें आहे. या उलट, श्रीसंतांनीं मोक्षाचा, भक्तिसापेक्ष स्पष्ट निषेध केला आहे. या ग्रंथातील ' मोक्षतुच्छतापर सदरांत दिलेले अभंग लक्षपूर्वक वाचले तर ही गोष्ट अगदीं सूर्यप्रकाशाप्रमाणें स्वच्छ दिसून तेव्हांच पटेल. उदारणार्थ खालील वचनें पहा.

**कासयासी व्हावें जितांचि मुक्त । सांडुनिया थितें प्रेमसुख ॥ वैष्णवांचा दास झाला नारायण । काय त्या मिळोन असें काम ॥ ( अ. क्र. ४४१ )**

**मोक्षपदें तुच्छ केलीं या कारणें । आम्हां जन्म घेणें युगायुगीं । विटेपेसें सुख नव्हे भक्तिरस । पुढतपुढती आस सेवावी हे ॥ देवाहातीं रूप धरवूं आकार । नेदूं निराकार होऊं त्यासी ॥ ( अ. क्र. ४४२ )**

**तुका म्हणे गर्भवासी । सुखें घालावें आम्हासी ॥**
**झणीं मज मुक्ति देसी पांडुरंगा । मग मी संतसंगा कोठें पाहूं ॥**
**( अ. क्र. ४६९ )**

देवाशीं मिळून मोक्षरूप, अव्यक्त होणें ज्यांना मान्य नाहीं त्यांचें तत्वज्ञान, ध्येय व साधन या दोन्ही दृष्टींनीं निवृत्तिवादी लोकाहून पुष्कळच बाबतींत वेगळें असणें स्वाभाविक आहे. श्रीसंतांचें ध्येय किंवा त्यांचा देव प्रेममूर्ति श्रीविठ्ठल होय. या विठ्ठलाचें रूप त्यांच्या वचनांत आहे तें असें.

**मुसावलें मुसें । प्रेम भक्तांचें वोरसें ॥ धरूनिया विठ्ठलरूप । विटें ठाकलें चिद्रूप ॥ ( अ. क्र. १८७७ )**

**विठ्ठल जीवींचा जिव्हाळा । विठ्ठल कृपेचा कोंवळा' । विठ्ठल प्रेमाचा पुतळा । लावियेला चाळा । विश्व विठ्ठलें ॥ ( अ. क्र. २७१२ )**

**तूं माउलीहुनि मायाळ । हरि तूं चंद्राहुनि शीतळ । पाण्याहुनि पातळ । कल्लोळ प्रेमाचा ॥ ( अ. क्र. ८१८ )**

भावरूप पुंडलीकाच्या भक्तीस्तव प्रभुरूप साकार झालें, ती मूस भक्तीप्रेमा-खेरीज इतर नव्हती, हें सत्य या ग्रंथांतील अभंग वाचतांना ठायीं ठायीं व साक-ल्यानें समग्र असा विचार करतांनाही तेव्हांच ध्यानीं येईल. अर्थात्, मोक्षरूप न होतां, ( अव्यक्तांत विलीन न होतां ) अवीट अश । भक्तिसुखास्तव जन्म मागून प्रेमप्रभू श्रीविठ्ठलाचे लडिवाळ होऊं इच्छिणारांचा जीवनमार्गही निवृत्तिवादीलोकां-हून प्रमुखतः वेगळाच रहाणार.

मोक्षमार्गी तत्वज्ञाप्रमाणें संतही, केवळ विषय व इंद्रियें यांच्या आसक्तींत राहूं नये हेंच सांगतात. मात्र, वस्तुत्याग अगर इंद्रियदमन यावर त्यांचा कटाक्ष नाहीं, प्रथम वस्तुत्याग इंद्रियदमन, मग चित्तशुद्धि व इहलोकांतून निवृत्ति आणि नंतर ज्ञानप्रधान मोक्ष हा साधनक्रम या भक्तिपंथांत नाहीं. प्रेमप्रभू श्रीविठ्ठलाच्या भजनगोडींत हीन अशा विषयसुखाचा ( म्हणजे चंचल सुखांचा ) आपेआप वीट येण्याचा सुलभ पंथ श्रीसंतानीं नामस्मरण व सत्संगतींत आहे असें दाखवून दिलें आहे. वस्तूंच्या त्यागानें वा इंद्रियदमनादि शमदमसाधनांनीं हीन सुखांची अरुचि न होतां, आसक्तिच वाढेल हा त्यांचा सिद्धांत आहे. त्यागभोग किंवा भीति व प्रीति यामुळें आसक्ती अधिक दृढ होते हें पुढील वचनांत पहा.

**त्यागें भोग माझ्या येतील अंतरा । मग मी दातारा काय करूं ॥**

त्याग भोग दुःख काय सांडावें मांडावें। ऐसी माझ्या जीवें थोर मांडिली आशंका ॥ ( अ. क्र. २७४८ )

नको गुंफूं भोगीं नको पडूं त्यागीं । लावुनि सरे अंगीं देवाचिये ॥
विधीनें सेवन । विषयत्यागातें समान ॥ मुख्य धर्म देव चित्तीं । आदि अवसानीं अंतीं ॥ अ. क्र. ४४२०
भोगीं झाला त्याग । गीतीं गातां पांडुरंग ॥ अ. क्र. २२९६

इंद्रियदमन व विषयत्याग यावर भर देणारे साधनमार्ग, अत्यंत दुस्तर व सूक्ष्महि आहेत; ते टाकून नामस्मरण व सत्संगति असलेला हाच केवळ सुलभ भक्तिमार्ग श्रीसंतांनीं विश्वासाठीं घालून दिला आहे. तो सुलभ आहे, म्हणून कमी प्रतीचा नव्हे, तर सर्वश्रेष्ठ आहे. इतर मार्ग कठीण असून धोक्याचेही आहेत; याबाबत त्यांचीं निर्णायक स्पष्ट वचनें आहेत.

कर्मी गुंतले उत्तमोत्तम । नामें तारिले अधमाधम ॥ ५८७
कर्मधर्म नव्हती सांग । उणया अंगें पतन ॥ भलत्या काळीं नामावळी । सुलभ भोळी भाविका ॥ १०५
साधनें घालितीं । काळाचिये मुखीं ॥
न कळे तें कळों येईल उगलें । नामें या विठ्ठलें एकाचिया ॥ १२६
नाम संकीर्तन साधन पैं सोपें । जळतील पापें जन्मांतरिंचीं ॥
न लगती सायास जावें वनांतरा । सुखें येतो घरां नारायण ॥ १३०
संतचरणरज लागतां सहज । वासनेचें बीज जळोनि जाय ॥ ३९५०
संतांनीं सरता केलों तैशापरीं । चंदनीं ते बोरी व्यापियेली ॥ ३९५१
रविदीप हिरा दाविती देखणें । अदृश्य दर्शनें संतांचिया ॥ ४०११
सर्व सुखें आजीं येथेंची वोळलीं। संतांचीं देखिलीं चरणांबुजें ॥३९५८
ज्ञानध्यान तपजप हें साधन । तें हें संतनिधान सखे माझे ॥ ४१४९
जें सुख संतजज्जनांचें पायीं । तें सुख नाहीं आणिकें ठायीं ॥ ४१५६

भक्तिमार्गाविषयीं आणखी एक विकल्प पुष्कळच रूढ आहे तो म्हणजे 'कलियुगांत ज्यांना शमदमादि कठीण (अतएव श्रेष्ठ!) मार्ग पेलत नाहात, त्यांच्या-साठीं त्या मानानें दुय्यम असा नामस्मरणाचा पंथ साधुसंतांनीं सुरू केला. अर्थात् हा मार्ग दुबळ्यासाठींच केवळ आहे.' हा होय. इतिहासाचार्य राजवाडे या मतप्रणालीचे पुरस्कर्ते होतें ते विचार अनेक कर्मठ व वेदांती, अधून मधून मांडतात. श्रीसंत, या संशयाचें खंडन करितांना सांगतात.

नाम श्रेष्ठांचें हें श्रेष्ठ । नाम जपे तो वरिष्ठ ॥ २८३
तुका म्हणे पेला आहे श्रेष्ठाचार । ९३

**तत्त्वमस्यादि महावाक्यउपदेश । नामाचा अर्धांश नाहीं तेथें ॥ ३८०**
**सकळ धर्मांचें कारण । नामस्मरण हरिकीर्तन ॥ ३८९**

नामस्मरण व सत्संगति हा सुलभ व श्रेष्ठमार्ग आहे हें निःसंशय, पण नामस्मरणाबद्दलचा श्रीसंतांचा बोध यथार्थ उमगून घेतला तरच या मार्गाचें रहस्य कळेल. नामस्मरण म्हणजे केवळ जप-क्रिया नव्हे. ' प्रेमाचा जिव्हाळा नाम मुखासीं आलें ॥ ' म्हणजे, प्रेमप्रभु विठ्ठलाचें आवडीनें स्मरण तें नामस्मरण होय. आई आणि बाळ, वल्लभा आणि कांत, अगर देशभक्त व मातृभूमि या नात्यांत जी रति व स्मृति आहे याच जातीचें, प्रियत्वाची परमसीमा अशा विठ्ठलाचें स्मरण तें नामस्मरण, असें उमगलें तर त्या सुखाची गोडी व महति कळेल आणि त्या स्मरणांत इतर साधनांतील सर्वश्रेष्ठ लाभ, ( शांति, क्षमा, दया इत्यादि ) आपेआप कसे येतात हें स्पष्ट होईल. तसेंच प्रेमाच्या जिव्हाळांतून उगम पावलेल्या या नामस्मरण, हरिकीर्तनादि भक्तिप्रेमाची परिणति विरहरूपांत होणें व तोच सोहळा जन्मांतरीं भोगणें हें या भक्तिमार्गाचें अवीट गोडीचें वैशिष्ट्य आहे, हें कळण्यासाठीं विरहिणी व करुणापर अभंग गाईले पाहिजेत.

संस्कृतांतील वेदांतादि तत्त्वज्ञानाचा सोपा मराठी अनुवाद, याच दृष्टीनें मुख्यतः संतवाङ्मयाकडे तत्त्वज्ञानी अभ्यासक पहात आले आहेत. त्यामुळें अभंगवाङ्मय वाचतांना अनेक प्रसंगीं ( वर दाखविल्याप्रमाणें ) त्याहून वेगळा बोध संतवाङ्मयांत आढळल्यास तें वाङ्मय, एक तर भिन्न व्यक्तीचें असावें ( ज्ञानेश्वर एक कीं दोन या विचारप्रणालीप्रमाणें ) म्हणण्यांत येतें—अगर अशा संतवाङ्मयाचा इतर बोधाशीं समन्वय घडवून आणण्याची ओढाताण सुरू होते. आमच्या मतें संतांच्या भक्तिप्रेमधर्माची वर दिलेली बोधभूमिका कळेल तर श्रीसंतांचें अक्षर न अक्षर स्पष्ट होईल व त्यांच्या बोधाचें यथार्थ चित्र भेटेल. अर्थात् सुज्ञांनीं आम्ही सुचविलेला दृष्टिकोन समजून घेऊन संतवाङ्मय साकल्यानें अभ्यासावें व त्यांतून संतधर्माचें देवालय कसें रेखाटलें गेलें आहे तें डोळ्यापुढें आणावें, ही नम्र विनंति आहे.

श्रीसंतांच्या अभंगांची आम्हीं जी विषयवार निवड केली आहे तिला वारकरी सांप्रदायांत ओळीचे अभंग-मांडणी म्हणतात. अशा संकलनाचा जसा अभ्यासकांना उपयोग होतो, तसाच तो कीर्तनप्रवचनकारांना व भजन करणारांनाही होणार आहे. हें वर्गीकरण आम्हांला पूर्ण व निर्दोष करतां आलें किंवा येईल हा अभिमान व्यर्थ आहे. तरीहि अनेक वर्षे, तपें या रसांत रमलेल्यांची फलश्रुति, या

दृष्टीनें याला पुष्कळ मोल आहे. परमार्थ हा विचारापेक्षां आचारानें लौकर स्पष्ट होतो हें सत्य ज्यांना मान्य, त्यांना तर भजनाकरितां हा ग्रंथ अपूर्व असा चिंतामणिच वाटेल. श्रीतुकोबा त्यासाठीं म्हणतात ' **तुका म्हणे येथें भजन प्रमाण। काय थोरपण जाळावें तें ॥** ' या कामीं संगीत व सांप्रदायिक अशीं जेथें जेथें भजनें चालतात, त्यांना एका विशेष दृष्टीची आवश्यकता आहे. भजन म्हणजे प्रभूजवळ आपलें हृदय खोलणें होय; किंवा भजन हा प्रभूशीं जीवमात्राचा एकांत आहे. नित्य ज्या वृत्ति आपणांत उदय पावतात, त्या संतवचनांच्या सखीसहाय्यानें प्रभुकुंजांत म्हणजे भजनांत त्याच्या पदीं वहावयाच्या, याला भजन मानलें पाहिजे. या दृष्टीनें भजन करणारांनीं सामुदायिक प्रसंगीं सर्वांना बहुतेक समान अशा करुणापर, मागणी, सलगी, प्रेमाचें भांडण, एकविध, भूपाळी, नाट इत्यादि विभगाचे अभंग गाईल तर आपली प्रभुप्रेमाकडे वाढती ओढ रहात आहे हें ध्यानीं येईल. मात्र, मानवी वृत्ति हरएक दिवशीं किंवा निदान कांहीं काळ तरी एकच प्रकारची असते, क्षणक्षण किंवा प्रत्येक अभंगाबरोबर बदलत नसते. म्हणून एका प्रसंगीं तरी एकेका रसाचेंच ( एका सदरांतील अभंगांचें ) भजन होणें युक्त होईल. ज्या वेळीं करुणापर अभंग गाऊं, तेव्हा कलहपर अभंगांची त्यांत भेसळ होऊं नये. संवादी रंग अगर राग जर आपण ओळखतो तर विसंवादी वृत्तीचें मिश्रण असें भजन किंवा रागदारीचेच केवळ आलाप याला आपण प्रभुभजन कां म्हणावें ?

या दृष्टीनें श्रेष्ठ अनुभवी महात्म्यांनीं भजनाची रीत ठरविली आहे ती अशी. प्रथम ' रामकृष्ण हरी ' हा प्रभूचें आवाहन करणारा नाममंत्र गायचा. तो कोठपर्यंत ? तर, विश्वाशीं तादात्म्य असलेली वृत्ति त्यांतून निघून, सुंदर अशा विठ्ठलाचें सगुणरूप आठवेपर्यंत, तें रूप डोळ्यांत जीवांत उमटेपर्यंत. तें रूप डोळ्यापुढें उभें राहिलें कीं त्याची गोडी ' सुंदर तें ध्यान उभें विटेवरी ' ' रूप पहातां लोचनीं ' ' आवडे हें रूप गोजिरें सगुण ' इत्यादि रूपपर अभंगांनीं भोगावयाची. नंतर ' विठोबा रखुमाई ' ' विठ्ठल विठ्ठल विठ्ठल रखुमाई ' हें भजन म्हणावयाचें. नंतर त्या दिवशीं वा त्या प्रसंगीं, जी मनबुद्धीची वृत्ति असेल तिला अनुरूप–आणि विशेषतः करुणापर, मागणी, आळी इ० भक्तभूमि प्रभु-एकांताला निकट आहे या अनुभवानें प्रमुखतः त्या–अभंगांचें भजन करावें. हें भजन वेळेपेक्षां अंतरगोडीव विशेष अवलंबून असावें. मग ' जयविठ्ठल ' । भजन म्हणून ज्या संतकृपेनें हें प्रभुमीलनाचें भाग्य लाभलें त्यांच्या स्तुतीचे वा महिमचे अभंग म्हणावेत व ' ज्ञानोबा माउली तुकाराम ' ' ज्ञानेश्वर माउली... '

किंवा 'निवृत्ति ज्ञानदेव सोपान मुक्ताबाई...' इत्यादि संतनामभजनाचा गजर करावा. शेवटीं देवाची व संतांची आरती करावी. या क्रमानें केलेलें भजन वाराप्रमाणें ठरलेल्या अगर सुरावर रंगवलेल्या भजनाहून अधिक गोडीचें व परमार्थाचा लाभ करून देणारें असतें हा अनुभव येईल.

या ग्रंथसंपादनाचे कामीं सर्वांत अधिक प्रयत्न वै. श्री. सु. अ. इडयंगडी स्मॉलकॉज जज्ज यांचे आहेत. त्यांनीं श्रीदादामहाराज सातारकर यांचे सन्निधींत पुष्कळ काळ राहून बरीच निवड केली. प्रयाणापूर्वीं त्यांनीं सर्व साहित्य मजजवळ देऊन ते गेले. त्यांच्या वाङ्मयाचा या पुस्तकाला फार मोठा उपयोग झाला आहे. तथापि तेवढ्यावरच आम्ही थांबलों नाहीं. श्री. मो. सुं. संझगिरी बी. ए. मुंबई, यांच्यासारख्या ओळीचे अभंगांचे भजन करणारांची निवड व अभंगांची सूचना आम्हाला साह्यभूत झाली आहे. श्री. इड्यंगडी यांचे दोन्ही चिरंजीवांनीं 'ओळीचे अभंग' या ग्रंथाचा हवा तो उपयोग करण्याला परवानगी दिली व त्याच ग्रंथाचे दुसरे प्रकाशक श्री. भो. भा. कंपनी, ॲडव्होकेट मुंबई यांनींही प्रस्तुत ग्रंथरूपानें त्यांतील भाग छापण्यास व संपादक म्हणून या ग्रंथावर त्यांचें नांव घालण्यास परवानगी दिली. तसेंच संतबोधास प्राधान्य देऊन पाठ तपासण्याचें कामीं श्री. म. गो. बारटक्के, पुणें यांनीं बहुमोल मदत केली. या सर्वांचे व इतरही लहानमोठ्या रीतीनें आम्हाला साह्य करणारांचे आम्ही मनः-पूर्वक आभार मानीत आहों. थोड्या वेळांत व अल्प मोलांत हा ग्रंथ उपलब्ध करून देतांना कांहीं चुका राहून गेल्या आहेत. हंसक्षीर न्यायानें जनताजनार्दन त्याबद्दल क्षमावृत्तीनें पहातील ही आशा आहे.

संतवाङ्मयाचें अभ्यासक, पूजक व परमार्थी, या ग्रंथाचें यथार्थ परिशीलन करून आजकाल हताश झालेल्या मानवी जीवनाला श्रीसंतांचें मंगल व सुखद जीवन प्राप्त करून देवोत व मलाही श्रीसंत, हें एकांतीचें भजनसुख देवोत ही शेवटची विनवणी आहे.

संतचरणरज

**गो. शं. राहिरकर**

---

# संतांचें अभंग वाङ्मय



सन्तांचें वाङ्मय हा मराठी वाङ्मयाचा अमोल ठेवा आहे. या वाङ्मयांतील ज्ञानेश्वरी, एकनाथी भागवत, अमृतानुभव इत्यादि सन्तप्रणीत ग्रंथांचा अभ्यास अलीकडे समाधानकारक होऊं लागला आहे. सन्तांच्या अभंगवाङ्मयाचा अभ्यास अद्याप बाल्यावस्थेंतच आहे. वास्तविक सन्त-सारस्वताचा अभ्यास सन्तांच्या अभंगवाणी-अभ्यासावांचून अपुरा आहे. सन्तांचा दृष्टिकोन समजून घेण्यास अभंग वाङ्मय हें अत्यंत उपयुक्त आहे. श्रीज्ञानेश्वर महाराज, नामदेव, चोखोबा गोरोबा, भानुदास, एकनाथ, जनाबाई, कान्हुपात्रा, तुकोबा, निळोबा इत्यादि सन्त-मन्डळींनीं अभंगवाणींत श्रेष्ठ रचना केली आहे. या सर्व सन्तांच्या निवडक अभंगांचें विषयावर वर्गीकरण करून प्रस्तुत सकलसन्त गाथा तयार केला आहे. या संग्रहा-मुळें एकाच ग्रंथांत निरनिराळ्या विषयावरील भावना व विचार समजून घेण्यास अभ्यासकांना एकत्र केलेली महत्वाची सामुग्री उपलब्ध होत आहे.

सन्तांच्या इतर ग्रंथाप्रमाणें या अभंगवाणीचा आत्मा भक्तिरस हाच आहे.त्या भोवतींच सन्तांच्या साऱ्या भावनांची व विचारांची गुंफण झाली आहे. ज्या देवाची भक्ति अनुभवावयाची त्याच्या गोड रूपाचें वर्णन रूपपर अभंगांत त्यांनीं केलें आहे. जगताचें व मानवी जीवनाचें मूळ दैवी प्रेम असून त्या प्रेमाचें सगुण रूपच विटेवर विठ्ठलरूपानें उभें आहे. त्या प्रेमाच्या सौंदर्याचें, दिव्य तेजाचें, अनुपम्य माधुर्याचें व अगणित लावण्याचें वर्णन संतांनीं केलें आहे. "**मुसावलें मुसें । प्रेम भक्तांचें वोरसें ॥ धरोनिया विठ्ठलरूप । विटे ठाकलें चिद्रूप॥** " असें निळोबा म्हणतात. हें प्रेमच, कशानेंहि बाजूस न करतां येण्याजोगा, जीवनाचा जिव्हाळा आहे. त्याच्याच अनुभवाचा सोरस म्हणजे विटेवरील रूपाचें दर्शन होय. '**बापरखुमादेवीवरु हृदयींचा जाणुनी । अनुभव सौरसु केला ॥**' असें ज्ञानेश्वर माउली ह्मणतात व " **पांडुरंग कांति दिव्यतेज झळकती । रत्न-कीळा फांकती प्रभा ॥ अगणित लावण्य तेज पुंजाळलें । न वर्णवें तेथिंची शोभा ॥** " असें या प्रेममूर्तीचें गीत गातात.

या प्रेमाचें आवडीनें स्मरण म्हणजे नामस्मरण होय. नामपर अभंगांत भक्तिरस सेवनाच्या या राजमार्गाचें महत्त्व वर्णिलें आहे. नामस्मरण हा सिद्धपंथ आहे, असें श्रीतुकोबा सांगतात. नामदेवराय नामास कामधेनू म्हणतात. नाम हें फुकट व चोखट आहे, अशी ग्वाही नामयाची जनी देते. '**नामावांचून जें जें कर्म। अवघा जाणा तो अधर्म।**' असें श्रीभानुदासमहाराज निर्भीडपणें सांगतात. तर एकनाथमहाराज 'हास्य विनोदें घेतां नाम। तरती जन ते अधम'। असें नामाचें सामर्थ्य वर्णितात. नाम म्हणजे प्रेमाचा जिव्हाळा असून तत्त्वमस्यादि महावाक्यांत नामाचा अर्धांशही नाहीं असें श्रीज्ञानेश्वरमाउली त्याचें स्वरूप तत्वतः प्रतिपादन करितात.

नामस्मरणानें अनुभविलेल्या भक्तिप्रेमाच्या अनुभवाचा विहार म्हणजे हरिकीर्तन होय, हें कीर्तनपर अभंग अवलोकिल्यास दिसून येतें. कीर्तन म्हणजे केवळ मनोरंजन अगर उपदेशपर व्याख्यान नसून तें भक्तिरसाचें सेवनच होय. देवाच्या समोर वहाणारी ती अमृतधारा होय. श्रीतुकोबांनीं हरिकथा ही आपली माउली असून, तीच आपणांस व्याली व तिनेच आपलें पालनपोषण केलें हा आपला साच अनुभव सांगितला आहे. ( **बोलाचे गौरव। नव्हे माझा अनुभव॥ माझी हरिकथा माउली। नव्हे आणिकांसी पांगिली॥ व्याली वाढविलें। निजपदीं निजविलें॥** ) "**दीन आणि दुर्बळासी। सुखराशी हरिकथा॥**" असा तिचा महिमा आहे.

जीवनाचें ध्येय मोक्ष नसून भक्तीच आहे ही गोष्ट संतांनीं वारंवार सांगितली आहे. मोक्षतुच्छतापर अभंगाचें सदर हें वाचकांनीं या दृष्टीनें काळजीपूर्वक वाचण्याजोगें आहे. मोक्षामध्यें भक्तिरसाची गोडी चाखतां येत नाहीं. त्याकरतां परंपरागत मोक्षधर्म संतांनीं दूर सारला आहे.

निश्चित मार्ग व निश्चित ध्येय ठरल्यावर त्याखेरीज अन्याकडे ढुंकूनहि पहाण्याचें कारण नाहीं ही गोष्ट एकविध अभंगांतून व्यक्त होते. क्षुद्र देवतांचें पूजन, जपतपादि साधनें, हीं सर्व त्याज्य होत. "**आम्ही नामाचे धारक। नेणों प्रकार आणिक। सर्वभावें एक। विठ्ठलचि प्रमाण॥**" ही संतांची दृढ निष्ठा आहे. करुणापर अभंगांतून संतांनीं देवाची करुणा भाकली आहे. ही करुणा म्हणजे हृदय-दौर्बल्य नव्हे. "**तुका म्हणे आम्ही भाकितां करुणा। भलताचि शहाणा शोध काढी॥**" असा इशारा या करुणेचे, भलते अर्थ लावणारास तुकोबांनींच दिला आहे. करुणा म्हणजे प्रेमरसपान्हा होय. करुणापर अभंग म्हणजे श्रीविठ्ठलमाउ-

लीचें स्तनपानच होय. त्याचीच मागणी संतांनीं मागणीपर अभंगांचें द्वारां वारंवार केली आहे. संत हे या प्रेमाचे भिक्षेकरी आहेत. " **मागतां भिकारी झालों तुझें द्वारीं । देईं मज हरि कृपादान ॥ प्रेम प्रीति नाम उचित करावें । भावें संचरावें हृदयामाजीं ॥** " (श्रीतु. म.)

संत अगर भक्तच देवास मागतात असें नव्हे, तर देवही भक्ताकडे याचना करतो ही गोष्ट " भक्तवत्सलता " या सदराखालील अभंगांत दृष्टीस पडते. भक्त जसा प्रेमाचा भुकेला आहे तसा देवही प्रेमाचा भुकेला आहे.

" **हासूं रुसूं खेळूं वाढवूं आवडी । अविट ते गोडी अंतरींची ॥** "

या न्यायानें संतांनीं देवाशीं कधीं सलगी केली आहे तर कधीं देवाबरोबर ते भांडलेही आहेत. सलगीपर व प्रेमकलहपर अभंगातून भक्तिरसाचें एक निराळेंच दर्शन दृग्गोचर होतें. भेटीपर अभंगात संतांनीं देवास भेटण्याबद्दल आळी केली आहे. या आळीचा अर्थ देवाच्या भेटीच्या अगोदरचें ते अभंग आहेत असा नसून देवाच्या प्रेमस्वरूपाची अनुभूती प्रेमकल्लोळरूपानें कितीही घेतली तरी ती पुरत नाहीं व वारंवार तें प्रेम भेटावें या उत्कट इच्छेनें केलेली ती प्रार्थना होय. या प्रेमाच्या भेटीची तीव्र उत्कंठा संताच्या " विरहिणी " या अभंगांतूनही प्रगट झाली आहे. श्रीज्ञानेश्वरमहाराजाच्याप्रमाणेंच श्रीएकनाथतुकारामादिकांच्या विरहिणी आहेत. प्रमाचा विरह ही गोष्ट साधी नव्हे. " **वाट पाहे एकली मजमदन जाकळी । अवस्था धाकुली म्हणों नये ।** " असें श्रीज्ञानेश्वरमाउलींनीं म्हटलें आहे. विरहांतच प्रभूच्या प्रेमाचें आलिंगन घडतें व " वाफा शिंपिलिया वाळुनिया जाये " या न्यायानें त्या प्रेमालिंगनानें विरह होतो व पुन्हा आलिंगन घडतें. प्रेमभक्तीचा हा कळसच होय.

प्रेमभक्तीचा अनुभव सर्वांना सुलभ घेतां यावा म्हणून संतांनीं पंढरीचे वारीची प्रथा सुरू केली. प्रेमनगरी पंढरीचें व वारीच्या हळुवार व श्रेष्ठ सुखाचें वर्णन, पंढरीपर अभंगांतून केलें गेलें आहे. प्रेमानुभूतीचा वैयक्तिक अनुभव सर्वांना भेदभाव न बाळगतां देण्याकरितांच वारीची संस्था निर्माण करून प्रतिवर्षी आषाढी, कार्तिकी वारीची श्रेष्ठ स्नेहसंमेलनें भरविण्याची पद्धत सुरू केली, व ती अव्याहत त्यांच्या कृपेनेंच चालू आहे. प्रेमानुभूतीवर आधारलेली ही संघटना म्हणजेच वारकरी संप्रदाय होय.

भक्तिपंथ हा दुर्बळांचा नसून शूर धीरांचा आहे हें संतांनीं पाइकीच्या अभंगांतून सांगितलें आहे. आंधळे, पांगळे, वासुदेव इत्यादि निरनिराळीं रूपकें

घेऊन समाजाच्या दृष्टीपुढें वावरणाऱ्या नेहमींच्या गोष्टींच्या वर्णनाचें द्वारें समाजाच्या सर्व थरांतून विठ्ठल भक्तीचा अमृत–निर्झर संतांनीं कसा खेळविला आहे हें त्या त्या रूपकांचें अभंग वाचतांना ध्यानीं येतें. या दृष्टीनें श्रीएकनाथांचीं भारूडें व रूपकें अभ्यसनीय आहेत.

**" गुरुचिया मुखें होईल ब्रह्मज्ञान । न कळे प्रेमखूण विठोबाची "** (श्रीतु. म.) विठोबाची प्रेमखूण जाणणारे संत होत. हृदयांत प्रेमखूण प्रगट होणें हें जीवनाचें सर्वांत थोर मूल्य होय. या मूल्याचें दान ज्या संतांच्या कृपेनें व आशी॰र्वादानें मिळतें त्यांच्या थोरवीचें वर्णन संतपर अभंगांतून केलें गेलें आहे. श्रीज्ञानेश्वरमहाराज हे सकल संतांचे अग्रणी होत. सर्व संतांनीं त्यांना गाइलें आहे. कोणी-त्यांना " दुभती गाय " म्हटलें आहे. त्यांना कोणी " अहो सखये साजणी " म्हटलें. कोणी " ज्ञानियांचा राजा " म्हटलें तर कोणी " भक्त करुणाकर ज्ञानाबाई " म्हटलें आहे. श्रीतुकोबारायांबद्दल श्रीनिळोबाराय म्हणतात कीं, श्रीतुकोबारायाचें मुख अवलोकन केलें असतां त्या अवलोकनसुखापुढें समाधीचें सुखही तुच्छ वाटतें.

उपदेशपर अभंगांतून संतांनीं, प्रत्येकानें हृदयांत भक्तिप्रेम जागें ठेवून आपला व्यवहारही उत्तम कसा करावा हें शिकविलें आहे. या अभंगांचें अध्ययन काळजीपूर्वक केल्यास व्यवहारांतही आपण दक्षतेनें, नीतीनें कसें वागावें व त्याचबरोबर ईश्वरनिष्ठेची ज्योतही सतत कशी तेवत ठेवावी हें उमगेल.

सकळ–संत–गाथ्याचें हें ओझरतें दर्शन घडविलें आहे. त्यावरून निरनिराळें वर्गीकरण केलेल्या अभंगांतून संतांचा प्रेम–बोध कसा अनुस्यूत आहे, हें दिसून येईल. संतवाङ्मयाचा अभ्यास सर्वांनीं अधिक आस्थेनें, अधिक काळजीपूर्वक करावा. आपल्या जीवनाची नैतिक व अध्यात्मिक पार्श्वभूमि उत्तम तऱ्हेनें घडविण्यास संतवाङ्मयासारखें दुसरें उत्कृष्ट साधन नाहीं. संत हे समाजाचे उत्कृष्ट शिक्षक आहेत. त्यांची शिकवणूक समाजानें आपल्या हाडींमासीं खेळवून घेतली पाहिजे. स्वतः अंगीं बाणवून आपल्या मुलांबाळांना तिचे धडे शिकविले पाहिजेत. संतांनीं मोठ्या सायासानें मिळविलेलें प्रेमभक्तीचें धन प्रत्येक पिढीनें जतन करून आपल्या वारसांच्या स्वाधीन केलें पाहिजे. यांतच समाजाचा उद्धार व परम कल्याण आहे.

**—भा. पं. बहिरट, एम. ए.**

ओळीचे अभंग असलेली

# सकल संत गाथा



## रूपाचे अभंग



### श्रीतुकाराममहाराज



१ सुंदर तें ध्यान उभें विटेवरीं । कर कटावरीं ठेवूनिया १ तुळसीहार गळां कासे पीतांबर । आवडे निरंतर हेंचि ध्यान २ मकरकुंडलें तळपतीं श्रवणीं । कंठीं कौस्तुभमणि विराजित ३ तुका म्हणे माझें हेंचि सर्व सुख । पाहीन श्रीमुख आवडीनें ॥ ४ ॥

२ आवडे हें रूप गोजिरें सगुण । पाहतां लोचन सुखावले १ आतां दृष्टीपुढें ऐसाचि तूं राहें । जों मी तुज पाहें पांडुरंगा २ लांचावलें मन लागलीसे गोडी । ते जीवें न सोडी ऐसें जालें ३ तुका म्हणे आम्ही मागावें लडिवाळी । पुरवावी आळी मायबापें ॥ ४ ॥

३ सुखाचें ओतलें । दिसे श्रीमुख चांगलें १ मनें धरिला अभिळास । मिठी घातली पायास २ होतां दृष्टादृष्टी । ताप गेला उठाउठी ३ तुका म्हणे झाला । लाभें लाभ दुणावला ॥ ४ ॥

४ राहो आतां हेंचि ध्यान । डोळा मन लंपटो १ कोंडकोंडुनि धरीन जीवें । देहभावें पूजीन २ होईल येणें कळसा आलें । स्थिरावलें अंतरीं ३ तुका म्हणे गोजिरिया । विठोबा पायां पडों द्या ॥ ४ ॥

५ तुझे रूपीं डोळे । निवती सकळ सोहळे १ ध्यान साजिरें गोजिरें । कुंडलें तीं मकराकारें २ तुझ्या ध्यानाची आवडी । अवलोकितो घडोघडी ३ तुका म्हणे चित्ता । वाटे न व्हावा परता ॥ ४ ॥

६ धणी न पुरे गुण गातां । रूप दृष्टी न्याहाळितां १ बरवा बरवा पांडुरंग । कांति सांवळी सुरंग २ सकळ मंगळाचें सार । मुख सिद्धीचें भांडार ३ तुका म्हणे सुखा । अंतपार नाहीं लेखा ॥ ४ ॥

७ रूपीं गुंतलें लोचन । पायीं स्थिरावलें मन १ देहभाव हारपला । तुज पाहातां विठ्ठला २ कळों नेदीं सुख दुःख । तहान हारपली भूक ३ तुका म्हणे नव्हे परती । तुझ्या दर्शनें मागुती ॥ ४ ॥

८ तुज पाहातां सामोरी । दृष्टी न फिरे माघारीं १ माझें चित्त तुझ्या पायां । मिठी पडली पंढरीराया २ नव्हे सारितां निराळें । लवण मेळवितां जळें ३ तुका म्हणे बळी । जीव दिला पायांतळीं ॥ ४ ॥

९ राजस सुकुमार मदनाचा पुतळा । रविशशिकळा लोपलिया १ कस्तुरी मळवट चंदनाची उटी । रुळे माळ कंठीं वैजयंति २ मुगुट कुंडलें श्रीमुख शोभलें । सुखाचें ओतलें सकळही ३ कासे सोनकळा पांघरे पाटोळा । घननीळ सांवळा बाइयांनो ४ सकळही तुम्ही व्हा गे एकीसवा । तुका म्हणे जीवा धीर नाहीं ॥ ५ ॥

१० साजिरें गोजिरें रूप मनोहर । ध्यानीं निरंतर आवडलें १ बळिया शिरोमणी उदारांचा राणा । आवडला मना जीवीं जीवा २ रविकळा कोटी सांडा ओवाळुनी । कंठ आभरणीं शोभतसे ३ तुका म्हणे झालें नेत्रासी पारणें । मनोहर येणें रूप नांव ॥ ४ ॥

११ गरुडाचें वारिकें कासे पीतांबर । सांवळें मनोहर कैं देखेन १ बरवया बरवंटा घनमेघ सांवळा । वैजयंती माळा गळां शोभे २ मुगुट माथां कोटि सूर्यांचा झळाळ । कौस्तुभ निर्मळ शोभे कंठीं ३ ओतींव श्रीमुख सुखाचें सकळ । वामांगीं वेल्हाळ रखुमादेवी ४ उद्धव अक्रूर उभे दोहींकडे । वर्णिती पवाडे सनकादिक ५ तुका म्हणे नव्हे आणिकांसारिखा । तोचि माझा सखा पांडुरंग ॥ ६ ॥

१२ पैल पहातां श्रीमुख । तहान हारपली भूक १ पाहा पाहा डोळे-भरी । मूर्ति सावळी गोजिरी २ रविशशि ज्याच्या कळा । तो हा मदनाचा पुतळा ३ तुका म्हणे वर्णूं काई । घेतो अलाई बलाई ॥ ४ ॥

## श्री निळोबामहाराज

१३ सुकुमार सुंदर । अंगकांति मनोहर १ विठु घननीळ सांवळा । लावण्यें मदनाचा पुतळा २ कसीयेला पीतांबर । चरणीं ब्रीदाचा तोडर ३ निळा म्हणे माळा कंठीं । मुगुटीं मोरविसावेटी ॥ ४ ॥

१४ सगुण स्वरूप तुमचें हरी । शोभलें तें विटेवरीं १ तेणें लागली टकमक । डोळिया नावडे आणिक २ मनाबुद्धीसीही भुली । इंद्रियें गुंफोनि राहिलीं ३ निळा म्हणे तनु प्राण । गेलीं आपणा विसरोन ॥ ४ ॥

१५ सुहास्य वदन तुटती तारे । पाउलें गोजिरीं विटेवरीं १ कटावरीं ठेवूनि हात । आयुधें मंडित शंखचक्र २ पीतांबर वेष्टिला कासे । मेखळे ठसे जडिताचे ३ निळा म्हणे हृदयावरीं । पदक तमारी तेचि झळके ॥ ४ ॥

१६ उघडली सतेज खाणी । लावण्याची बरवेपणीं १ विठो सुंदरा सुंदर । रूप नागरा नागर २ मुख अमृतकुपिका । पूर्णचंद्र उदयो लोका ३ निळा म्हणे कटी तटीं । मूर्ति गोजिरी गोमटी ॥ ४ ॥

१७ हा गे पहा विटे उभा । सच्चिदानंदाचा हा गाभा १ देखे सकळांचेहि भाव । अध्यक्ष हें याचें नांव २ जेथें तेथें जैसा तैसा । नव्हे न्यून पूर्ण ऐसा ३ निळा म्हणे माझ्या जीवीं । ठेला जडोनी तो गोसावी ॥ ४ ॥

१८ मुगुट कुंडलें वनमाळा । केशर कस्तुरीचा टिळा १ विठो देखिला म्यां दिठी । अंगीं चंदनाचा उटी २ जडित कंकणें मुद्रिका । कासे पीतांबर नेटका ३ कटीं मेखळा विराजित । वांकी किंकिणी तोडर गर्जत ४ मुख लावण्याची खाणी । जैसा चंद्र पूर्णपणीं ५ निळा म्हणे कटीं कर । अंगकांति मनोहर ॥ ६ ॥

१९ गुण लावण्याची खाणी । विठोजी मुगुटमणी सकळांचा १ जाणे अंतरींचा भाव । देवाधिदेव पूजनीय २ ब्रह्मादिक लागती पायीं । सुरपती तोहि आज्ञांकित ३ निळा म्हणे लागला भाग्यें । हातीं अनुरागें गीतीं गातां ॥ ४ ॥

२० विठो लावण्याची राशी । जननयनासी पाहुणेरु १ पाहातिया तटस्थ लागे । फिरोंचि मागें विसरती २ सुघटित अवघेंचि ठाण । भूषणा भूषण शोभवीत ३ निळा म्हणे जडला जीवीं । त्रैलोक्य गोसावी विठो माझा ॥४॥

२१ ऐक्यरूपें हरिहर । उभा कटीं कर विटेवरीं १ तो म्यां देखियेला दिठीं । भूवैकुंठीं पंढरीये २ तुळसीमाळ वैजयंती । वेढिला संतीं मुनिवरीं ३ निळा म्हणे विश्रांति मना । झालें लोचना पारणें ॥ ४ ॥

२२ आत्मा सकळांचा श्रीहरी । तो हा उभा पंढरपुरीं १ म्हणोनियां देव येती । दर्शना ऋषींच्या पंगतीं २ प्रतिवर्षीं उपासक । येती यात्रे सनकादिक ३ निळा म्हणे त्रैलोक्यदाता । विठो लक्ष्मीचा भर्ता ॥ ४ ॥

## श्रीनामदेवमहाराज

२३ अवताराची राशी तो हा उभा विटेवरीं । शंखचक्रगदापद्म-सहित हरी १ देखिला देखिला देवाधिदेव बरवा । समाधान जीवा पाहतां वाटे गे माये २ सगुण चतुर्भुज रूपडें तेज पुंजाळती । वंदी चरणरज नामा विनवितसे पुढती ॥ ३ ॥

२४ विटेवरीं समचरण सुंदर । बाळ सुकुमार यशोदेचें १ वाळे वांकी गर्जे तोडर चरणीं । नाद झणझणी वाजताती २ कांसे कसियेला पीत पितांबर । लोपे झडकर तेणें प्रभा ३ नामा म्हणे नाहीं तुझ्या रूपा पार । तेथें मी किंकर काय वानूं ॥ ४ ॥

२५ रूपें शामसुंदर नीलोत्पल गाभा । सखीये स्वप्नीं शोभा देखियेली १ नेत्र विशाळ भाळ दंत हिरया ज्योती । बाइये मदनमूर्ती देखियेला २ शंख चक्र गदा शोभती चहूं करीं । सखीये गरुडावरीं देखियेला ३ शयन शेषापृष्ठीं नाभी परमेष्ठी । गंगा वामांगुष्ठीं देखियेला ४ पीतांबर कटीतटीं दिव्य चंदन उटी । सखीये जगजेठी देखियेला ५ विचारितां मानसीं नये जो व्यक्तीसी । नामा केशवेंसी लुब्धोनी ठेला ॥ ६ ॥

२६ वैकुंठीं पाहें तंव चतुर्भुज दिसे । परि सुंदर रूप तेथें नाहीं १ क्षीरसागरीं पाहें तों तेथें निद्रिस्त । परि सुंदर रूप तेथें नाहीं २ द्वारके पाहें तंव पाताळीं चरण । परि सुंदर रूप तेथें नाहीं ३ हृदयीं पाहें तंव अव्यक्तचि दिसे । परि सुंदर रूप तेथें नाहीं ४ नामा म्हणे ऐसा सर्व गुण संपूर्ण । पंढरीये उभा शोभतसे ॥ ५ ॥

२७ योगियांचें ब्रह्म शून्य व्योमाकार । आमुचें साकार विटेवरीं १ दाटुगें नागरु कटीं ठेऊनि कर । सर्वस्वें उदार भक्तालागीं २ ज्ञानीया सिद्धांतीं लक्षा परी नये । आमुची वाट पाहे अनाथाची ३ पुंडलिका भावा वोळलें वोरसें । नेणो काय कैसें प्रेम त्याचें ४ जाप्यकाचें जाप्य नाम मंत्रमय । आमुचें भक्तीप्रिय संसारीं कां ५ नामा म्हणे जीवें करीन ओवाळणी । झणीं चक्रपाणीं दिठावसी ॥ ६ ॥

२८ वेदांसी अगोचर परब्रह्म कारण । योगिया हृदयींचें ममत्व निर्वाण । आकळूं न कळेचि शेखीं धरियेलें मौन । तें रूप पंढरिये विटे समचरण १ कानडा विठ्ठल वो उभा भिवरेतीरीं । भक्तांचें आर्त वो जीवा लागलें भारी ॥ ध्रु० ॥ भूवैकुंठ पंढरी हे देवें रचियेली पैं गा । शिवें ती वंदियेली विठो सम चरणांची गंगा । सदाचा नामघोषु कलिमल जाय भंगा । काय वानूं सुख तेथिंचें भेटलिया पांडुरंगा २ विठ्ठल नाम वाचें जना

हाचि उपचारू। म्हणवूनियां दावितुसे। कटीं ठेऊनिया करू। येरासी मायानदी कामक्रोध मगरू। ठेवा हा नामयाचा स्वामी विठ्ठल वीरू ॥ ३ ॥

२९ अनिर्वाच्य ब्रह्म निगम म्हणती। शिणले वेवादती अठरा साही १ तें हें पुंडलिकें चोहोंटा उभें केलें। भावें भुलविलें पंढरीये २ घ्यारे घ्यारे तुम्हीं कैवल्याचें पीक। देतो पुंडलीक सकळ जीवा ३ उपनिषदांचें मतितार्थ जें साराचें यथार्थ। तो हा पंढरीनाथ प्रगट जगीं ४ हरिहर विरंची त्रिमूर्ती हाचि। माऊली दिनांची लोभापरु ५ जो श्रवणांचा श्रवण नयनांचा नयन। ज्ञानाचा दर्पण दृष्ट होय ६ आदिमध्येअंतीं व्यापक सर्वां भूतीं। तो हा जाला व्यक्ति भक्तिभावें ७ सदा चित्ता आनंदघन परिपूर्ण। कारण महा-कारण प्रभा हाचि ८ चित्ता चेतविता बुद्धीतें पाळिता। मनादि चाळितां इंद्रि-यांसी ९ तो या चराचरीं जीवलग सोइरा। म्हणोनि अनुसरा पांडुरंगा १० नामा म्हणे काया वाचा मनें त्याचें। नाम जपा कैचें जन्ममरण ॥ ११ ॥

३० नाम बरवें रूप बरवें। दर्शन बरवें कानडिया १ वेदांसी कानडें श्रुतीसी कानडें। परब्रह्म उघडें पंढरीये २ नामा म्हणे विठो त्रिभुवन बरवें। त्याहूनि बरवें प्रेम तुझें ॥ ३ ॥

३१ विश्वाच्या मोहना कपट नाटका। पंढरीनायका पांडुरंगा १ अवतार धरुनि होऊनि निमित्त। बुजविसी दैत्य सर्प खाणी २ गोपिकांचे घरीं कामासी लंपट। करिसी धीट गवळियांसी ३ भाव अभावाचा न करी कंटाळा। दावि बाळलीला म्हणे नामा ॥ ४ ॥

३२ प्रल्हादा रक्षिलें पांडवां प्रतिपाळिलें। तया उभें केलें पुंडलीकें १ बिभीषणा स्थापिलें ध्रुवासी अढळ केलें। तया उभें केलें पुंडलीकें २ चैद्यादि मर्दिले सुरवर तारीले। तया उभें केलें पुंडलीकें ४ अहिल्ये उद्धरिलें गजेंद्रा उद्धरिलें। तया उभें केलें पुंडलीके ४ गयासुरा वधिलें बळिस पाताळीं घातलें। तया उभें केलें पुंडलीकें ५ नामा म्हणे केशवा भक्तांचें ठेवणें। घेऊनि कैंवि जाणें घडे तुज ॥ ६ ॥

## श्रीजनाबाई

३३ पाय जोडूनि विटेवरीं। कर ठेउनी कटावरीं १ रूप सांवळें सुंदर। कानीं कुंडलें मकराकार २ गळां माळ वैजयंती। पुढें गोपाळ नाचती ३ गरुड सन्मुख उभा। म्हणे जनी धन्य शोभा ॥ ४ ॥

३४ अनंत लावण्याची शोभा। तो हा विटेवरी उभा १ पितांबर माळा गांठी। भाविकांसी घाली मिठी २ त्याचे पाय चुरी हातें। कष्टलीस

माझे माते ३ आवडी बोलें त्यासी। चला जाऊं एकांतासी ४ ऐसा ब्रह्मींचा पुतळा। दासी जनी पाहे डोळां ॥ ५ ॥

## श्रीभानुदासमहाराज

३५ चतुर्भुज मूर्ति लावण्य रूपडें। पाहतां आवडे जीवा बहु १ वैजयंती माळा किरीट कुंडलें। भूषण मिरवले मकराकार २ कासे सोनसळा पीतांबर पिवळा। कस्तुरीचा टिळा शोभे माये ३ शंख चक्र हातीं पद्म तें शोभलें। भानुदासें वंदिलें चरण कमळ ॥ ४ ॥

३६ देखतांचि रूप विटेवरीं गोजिरें। पाहतां साजिरें चरणकमळ १ पाहतां पाहतां दृष्टी धाये जेणें। वेकुंठींचें पेणें सहज हातीं २ भानुदास म्हणे लावण्य पुतळा। देखियेला डोळां पांडुरंग ॥ ३ ॥

३७ गोड साजिरें रूपस। उभा आहे हृषिकेश। योगी ध्याती जयास। तो हा सर्वेश साजिरा १ रूप मंडित सगुण। शंख चक्र पद्म जाण। गळां वैजयंती भूषण। पीतांबर मेखळा २ कस्तुरी चंदनाचा टिळा। मस्तकीं मुगुट रेखिला। घवघवीत घन सांवळा। नंदरायाचा नंदनु ३ हरुषें भानुदास नाचे। नाम गातसें सदा वाचे। प्रेम विठोबाचें। अंगीं वसे सर्वदां ॥ ४ ॥

## श्रीएकनाथमहाराज

३८ शामसुंदर मूर्ति विटेवरीं साजिरी। पाउलें गोजिरीं कोवळीं तीं १ ध्वजवज्रांकुश चिन्हें मिरवतीं। कटीं धरिले कर अनुपम्य शोभती २ ऐसा देखिला देव विठ्ठलु माये। एकाजनार्दनीं त्यासी गाये ॥ ३ ॥

३९ सुंदर बाळपणाची बुंथी घेउनिया श्रीपती। सनकादिक ध्याती तेथें कुंठित गे माय १ ब्रह्म वेडावलें गे वेडावलें। पुंडलीकाधीन झालें गे माय २ इंद्र चंद्र गुरु उपरमोनी जया सुखा। तो वाळुवंटी देखा संतांसवें गे माय ३ ऐसा नटधारी मनु सर्वांचें हरी। एका जनार्दनाचे करीं उच्छिष्ट खाय ॥ ४ ॥

४० डोळीयांची भूक हारपली। पाहतां श्रीविठ्ठल माउली १ पुंडलिकें बरवें केलें। परब्रह्म उभें ठेलें २ अठ्ठावीस युगें झालीं। अद्यापि न बैसे खालीं ३ उगा राहिला तिष्ठत। आलियासी क्षेम देत ४ ऐसा कृपाळु दीनाचा। एकाजनार्दनीं साचा ॥ ५ ॥

४१ विटेवरीं दिसे स्वानंदाचा गाभा। श्रीमुखाची शोभा काय वानूं १ कटीं पितांबर तुळशीचे हार। उभा सर्वेश्वर भक्तिकाजा २ लावण्य रूपडें

पाहे पुंडलीक । आणीक सम्यक नये दुजा ३ पाहतां पाहतां विश्रांती पैं जाली । एकाजनार्दनीं माउली संतांची ते ॥ ४ ॥

४२ रूप सांवळें सुकुमार । कानीं कुंडलें मकराकार १ तो हा पंढरीचा राणा । न कळे योगियांच्या ध्याना २ पीतांबर वैजयंती । माथां मुकुट शोभे दीप्ति ३ एका जनार्दनीं ध्यान । विटें पाउलें समान ॥ ४ ॥

४३ मूर्ति सांवळी गोमटी । अंगीं केशराची उटी १ मुकुट कुंडलें बनमाळा । टिळक रेखिला पिवळा २ कर्णी कुंडलें मकराकार । गळां शोभे वैजयंति हार ३ नेत्र आकर्ण सुकुमार । एका जनार्दनीं विटेवर ॥ ४ ॥

४४ दोन्ही कर ठेउनी कटीं । उभा भीवरेचे तटीं १ रूप सांवळें सुंदर । गळां वैजयंती हार २ कानीं कुंडलें मकराकार । तेज न समायें अंबर ३ एकाजनार्दनीं उदार । भीमातीरीं दिगंबर ॥ ४ ॥

४५ भीमरथीचे तीरीं । उभा विठ्ठल विटेवरीं १ रूप सांवळें सुंदर । कुंडलें कानीं मकराकार २ गळां शोभे वैजयंती । चंद्रसूर्य तेजें लपती ३ कौस्तुभ हृदयावरीं । उटी केशरी साजिरी ४ एकाजनार्दनीं निढळें । बरवें देखिलें साजिरें ॥ ५ ॥

४६ चतुर्भुज साजिरी शोभा । चिन्मय गाभा साकार १ शंख चक्र गदा कमळ । कांसे पीतांबर सोज्वळ २ मुगुट कुंडलें मेखळा । श्रीवत्स शोभे वक्षस्थळा ३ निर्गुण सगुण ऐसे ठाण । एका जनार्दनीं ध्यान ॥ ४ ॥

४७ सुंदर तें ध्यान मांडीवरीं घेउनी । कौसल्या जननी गीतीं गाये १ सुंदर तें ध्यान नंदाच्या अंगणीं । गोपाळ गौळणी खेळताती २ सुंदर तें ध्यान चंद्रभागे तटीं । पुंडलिका पाठीं उभें असे ३ सुंदर तें ध्यान एकाजनार्दनीं । जनीं वनीं मनीं भरलासे ॥ ४ ॥

४८ जें या चराचरीं गोमटें । पाहतां वेदां वाट न फुटे । तें पुंडलीकाचे पेठे । उभें नीट विटेवरीं १ सोपारा सोपारा झाला आम्हा । शास्त्रें वर्णिती महिमा । न कळे जो आगमनिगमा । वेद पुराणा तिहीं लोकीं २ सहस्रमुखांचें ठेवणें । योगी ध्याती जया ध्यानें । तो नाचतो कीर्तनें । प्रेमळ भक्त देखोनी ३ एका जनार्दनी देखा । आम्हां झाला सुलभ सोपा । निवारूनी भवतापा । उतरी पार निर्धारें ॥ ४ ॥

४९ सर्वांचें जें मूळ सर्वांचें जें स्थळ । तें पदयुगुल विटेवरीं १ साजिरे साजिरे कर दोन्ही कटीं । उभा असे तटीं भीवरेच्या २ नये ध्याना मना आगमाच्या खुणा । कैलासींचा राणा ध्यात जया ३ एकाजनार्दनीं परे परता दुरी । पुंडलिकाचे द्वारीं उभा विठो ॥ ४ ॥

५० वेदाचा विवेक शास्त्रांचा हा बोध। तो हा परमानंद विठ्ठलमूर्ती १ पुराणासी वाड साधनाचें कोड। तें गोडाचें गोड विठ्ठलमूर्ती २ ब्रह्मादि वंदिती शिवादि ज्या ध्याती। सर्वांसी विश्रांति विठ्ठलमूर्ती ३ मुनिजनांचें ध्यान परम पावन। एकाजनार्दनीं पावन विठ्ठलमूर्ती ॥ ४ ॥

५१ सगुण निर्गुण मूर्ति उभी असे विटे। कोटी सूर्य दाटे प्रभा तेथें १ सुंदर सगुण मूर्ति चतुर्भुज। पाहतां पूर्वज उद्धरती २ त्रिभुवनीं गाजे ब्रीदाचा तोडर। तोचि कटीं कर उभा विटे ३ एका जनार्दनीं नातुडे जो वेदा। उभा तो मर्यादा धरूनि पाठीं ॥ ४ ॥

५२ परेहूनी परता वैखरीये कानडा। विठ्ठल उघडा भीमातटीं १ शिणलीं दरुशनें भागलीं पुराणें। शास्त्रांचिये अनुमाने नये दृष्टी २ नेति नेति शब्दें श्रुति अनुवादती। ते हे विठ्ठलमूर्ति विटेवरी ३ एकाजनार्दनीं चहूं वाचा वेगळा। तेणें मज चाळा लावियेला ॥ ४ ॥

५३ जयाची समदृष्टी पाहूं धांवें मन। शोभते चरण विटेवरीं १ कानडें कानडें वेदांसी कानडें। श्रुतीसी जो आतुडे गीतीं गातां २ परात्पर साजिरें बाळरूप गोजिरें। भाग्याचें साजिरे नरनारी ३ एकाजनार्दनीं कैवल्य जिव्हाळा। मदनाचा पुतळा विटेवरीं ॥ ४ ॥

५४ अकार तो अकारू मकार तो मकारू। उकाराचा पालउ शोभे गे माय १ आदि अंत नसे ज्या रूपावेगळें। तें कैसें वोळलें पुंडलिका गे माय २ वेद उपरमला पुराणें कुंठित। शास्त्रांचि मति नेणत तया सुखा गे माय ३ जाणते नेणते सर्व वेडावले। ठकलेचि ठेले सांगूं काय गे माय ४ या पुंडलिकें वेडाविलें चाळवूनि गोविलें। एकाजनार्दनीं उभें केलें विटेवरीं गे माय ॥ ५ ॥

५५ अनंताचे गुण अनंत अपार। न कळेचि पार श्रुतीशास्त्रां १ तो हा महाराज विटेवरीं उभा। लावण्याचा गाभा शोभतसे २ कटावरी कर ठेवी जगजेठी। पाहे कृपादृष्टीं भक्तांकडे ३ पुंडलिकाचे तेजें जोडलासे ठेवा। एकाजनार्दनीं सेवा देई देवा ॥ ४ ॥

५६ आनंदाचा कंद उभा पांडुरंग। गोपाळांचा संघ भोवता उभा १ चंद्रभागातीरीं शोभे पुंडलीक। संत आलोलिक गर्जतातीं २ भाळे भोळे जन गाती तें सावडें। विठ्ठला आवडे प्रेम त्यांचें ३ नारीनर मिळाले आनंदें गजर। होत जयजयकार महाद्वारीं ४ एकाजनार्दनीं प्रेमळ ते जन। करिती भजन विठोबाचें ॥ ५ ॥

५७ देतो मोक्ष मुक्ती वांटितसे फुका। ऐसा हा निश्चयो देखा करूनि

ठेलों १ सांवळें रूपडें गोजिरें गोमटें। उभें पुंडलीक पेठें पंढरीये २ वांटितसे इच्छा जयासी जें आहे। उभारूनी बाह्या देत असे ३ एकाजनार्दनीं देतां न सरे मागें। जाहाला असती युगें अठ्ठावीस ॥ ४ ॥

५८ सर्वांघटीं बिंबला व्यापुनी राहिला। पुंडलीकें उभा केला विटेवरीं १ सांवळा चतुर्भुज कांसे पितांबर। वैजयंती माळ शोभे कंठीं २ कटावरीं कर पाउलें साजिरीं। उभा तो श्रीहरी विटेवरीं ३ एकाजनार्दनीं बिंबें तो बिंबला। बिंब बिंबोनी ठेला देहामाजीं ॥ ४ ॥

५९ परापश्यंती मध्यमा। जो न कळे आगमा निगमां। पुंडलीकालागीं धामा। पंढरिये आला तो १ नीरे भीवरेचे तटीं। कास घालुनी गोमटी। वैजंयंती शोभे कंठीं। श्रीवत्सलांछन २ शंख चक्र मिरवें करीं। उटी चंदनाची साजिरी। खोप मिरवे शिरीं। मयूर पिच्छे शोभती ३ शोभे कस्तुरीचा टिळा। राजस सुंदर सांवळा। एकाजनार्दनीं डोळां। वेधिलें मन ॥४॥

६० ध्यानाचें ध्यान ज्ञानाचें ज्ञान। तें समचरण विटेवरीं १ भावाचा तो भाव देवाचा तो देव। वैकुंठींचा राव विटेवरीं २ कामाचा तो काम योगियां विश्राम। धामाचा तो धाम विटेवरीं ३ वैराग्याचें वैराग्य मुक्ताचें माहेर। तो देव सर्वेश्वर विटेवरीं ४ भोळीयाचा भोळा ज्ञानियाचा डोळा। एकाजनार्दनी सोहळा विटेवरीं ॥ ५ ॥

६१ गोकुळीं जें शोभलें। तें विटेवरीं देखिलें १ काळ्या पृष्ठीं शोभलें। तें विटेवरीं देखिलें ॥ २ ॥ पूतने हृदयीं शोभलें। तें विटेवरीं देखिलें ३ काळयवनें पाहिलें। तें विटेवरीं देखिलें ४ एकाजनार्दनीं भलें। तें विटेवरीं देखिलें ॥ ५ ॥

६२ भीष्में जया ध्याइलें। तें विटेवरीं देखिलें १ धर्मरायें पूजियेलें। तें विटेवरीं देखिलें २ शिशुपाळा अंतक जाहलें। तें विटेवरीं देखिलें ३ एकाजनार्दनीं पूजिलें। तें विटेवरीं देखिलें ॥ ४ ॥

६३ जें द्रौपदीनें स्मरिलें। तें विटेवरीं शोभलें १ जें अर्जुनें स्मरिलें। तें विटेवरीं शोभलें २ जेणें गजेंद्रा उद्धरिलें। तें विटेवरीं शोभलें ३ जें हनुमंतें स्मरिलें। तें विटेवरीं शोभलें ४ जें पुंडलिकें ध्याईलें। तें एकाजनार्दनीं देखिलें ॥ ५ ॥

## श्रीज्ञानदेवमहाराज

६४ रूप पाहतां लोचनीं। सुख झालें वो साजणी १ तो हा विठ्ठल

बरवा । तो हा माधव बरवा २ बहुता सुकृताची जोडी । म्हणूनि विठ्ठलीं आवडी ३ सर्व सुखाचें आगर । बाप रखुमादेवीवर ॥ ४ ॥

६५ बरवा वो हरी बरवा वो । गोविंद गोपाळ गुण गरुवा वो १ सांवळा वो हरी सांवळा वो । मदनमोहन कान्हो गोवळा वो २ पाहतां वो हरि पाहतां वो । ध्यान लागलें या चित्ता वो ३ पढिये वो हरि पढिये वो । बापरखुमादेवीवरु घडिये वो ॥ ४ ॥

६६ अनुपम्य मनोहर । कांसे शोभे पितांबर । चरणीं ब्रीदाचा तोडर । देखिला देवो १ योगियाची कसवटी । दावितसे नेत्रपुटीं । उभा भीवरेच्या तटीं । देखिला देवो २ बापरखुमादेवीवरु । पुंडलिका अभय करू । परब्रह्म-साकारू । देखिला देवो ॥ ३ ॥

६७ पांडुरंगकांती दिव्य तेज झळकती । रत्नकीळा फांकती प्रभा । अगणित लावण्य तेज पुंजाळलें । न वर्णवे तेथींची शोभा १ कानडा हा विठ्ठलु कर्नाटकु । येणें मज लाविला वेधु । खोळ बुंथी घेऊनि खुणाची पालवी । आळविल्या सादु नेदी २ शब्देंवीण संवादु दुजेंवीण अनुवादु । हें तव कैसेंनि गमे । परेहि परतें बोलणें खुंटलें वैखरीं कैसेनि सांगे ३ पाया पडूं गेलें तंव पाउलचि न दिसे । उभाचि स्वयंभु असे । समोर कीं पाठी-मोरा न कळे । ठकचि पडिलें कैसें ४ क्षेमालागीं मन उतावीळ माझें । म्हणवूनि स्फुरताती बाहो । क्षेम देऊं गेलें तव मीचि मी एकली । आसा-वला जीवरावो ५ बापरखुमादेविवरू हृदयींचा जाणुनी । अनुभव सौरसु केला । दृष्टीचा डोळा पाहों मी गेलीये । तंव भीतरीं पालटु झाला ॥ ६ ॥

६८ त्रिभंगी देहुडा ठाण मांडुनियां माये । कल्पद्रुमातळीं वेणु वाज-वितु आहे १ गोविंदु वो माये गोपाळु वो । सबाह्य अभ्यंतरीं अवघा परमा-नंदु वो २ सांवळें सगुण सकळां जीवांचें जीवन । घनानंद मूर्ति पाहतां हारपलें मन ३ शून्य स्थावर जंगम व्यापुनि राहिला अकळ । बापरखुमा-देविवरु विठ्ठलु सकळ ॥ ४ ॥

६९ तुरे कांवळा डांगेवरी निशाण वेणु घेऊनि करीं । वैजयंति रुळे कैशी वक्षस्थळावरीं १ गोविंदु वो पैल गोपाळु माये । सुरतरु तळवटीं देखें कैसा उभा राहे ॥ धृ० ॥ आड त्रिपुंड्र शोभत द्रुमिल भारेंसि जे जात । नागर केशरीचीं पुष्पें कैसा खोप मिरवत २ हिरिया ऐशा दंतपंक्ति अधर पोंवळ-वेली । श्रवणीं कुंडलें ब्रह्मरसाचीं वोतलीं ३ विश्वाचें जीवन तें म्यां सार-देखियेलें । योगी ध्याती ध्यानीं ब्रह्म तेंचि गोकुळासि आलें ४ आजि धन्य

धन्य जालें राया कृष्णासि देखिलें । निवृत्तिमुनिरायप्रसादें ध्यान हृदयासि आलें ॥ ५ ॥

७० स्वरूपीं पाहतां बिंबीं बिंब उमटे । मेघःश्याम दाटे कुंथी मनीं १ चित्त वित्त हरि जाला वो साजणी । अवचिता आंगणीं म्यां देखियेला २ सांवळा डोळसु चतुर्भुज रूपडें । दिसे चहूंकडे एकतत्व ३ ज्ञानदेव म्हणे द्वैत निरसूनि पाही । एका रूपा सोयी बाही तरशील ॥ ४ ॥

## श्रीमुक्ताई

७१ मुक्त जीव सदा होति पैं नामपाठें । तेंचि रूप विटे देखिलें आम्ही १ पुंडलीकें विठ्ठल आणिला पंढरी । आणूनि लवकरी तारिलें जग २ ऐसें पुण्य केलें एका पुंडलीकेंची । निरसली जनाची भ्रमभूली ३ मुक्ताई चिंतनें मुक्त पैं जाली । चरणीं समरसली हरिपाठें ॥ ४ ॥

७२ प्रकृति निर्गुण प्रकृति सगुण । दीपें दीप पूर्ण एका तत्वें १ देखिलें गे माय पंढरीपाटणीं । पुंडलीका अंगणीं विठ्ठलराजा २ विज्ञानेंसी तेज सज्ञानेंसी निज । निर्गुणेंसी चोज केलें सये ३ मुक्ताई तारक सम्यक विठ्ठल । निवृत्तीनें चोखाळ दाखविलें ॥ ४ ॥

७३ शून्यापरतें पाही तंव शून्य तेंही नाहीं । पाहातें पाहोनि ठायीं ठेवियलें १ कैसा गे माये हा तारकु दिवटा । पंढरी वैकुंठा प्रगटला २ न कळे याची गती आदिमध्य अंतीं । जेथें श्रुति नेति नेति प्रगटल्या ३ मुक्ताई सप्रेम विठ्ठल संभ्रम । शून्याही शून्य सम शेजबाज ॥ ४ ॥

## श्रीसेनामहाराज

७४ विटेवरीं उभा नीट कटावरीं कर । वाट पाहे निरंतर भक्ताची गे माये १ श्रीमुगुट रत्नाचा ढाळ देती कुंडलांचा । तुरा खोविला मोत्याचा तो गे माये २ कंठीं शोभे एकावळी तोडर गर्जे भूमंडळीं । भक्तजनाची माउली तो गे माये ३ सोनेंसळा पीतांबर ब्रीद वागवी मनोहर । सेना वंदी निरंतर तो गे माये ॥ ४ ॥

७५ समचरण विटेवरीं । पाहतां समाधान अंतरीं १ चला जाऊं पंढरीसी । भेटूं रखुमाई वरासी २ होती संताचिया भेटी । सांगूं सुखाचिया गोष्टी ३ जन्ममरणाची चिंता । सेना म्हणे नाहीं आतां ॥ ४ ॥

७६ कटीं ठेऊनियां कर । रूप पाहिलें मनोहर १ तेणें समाधान

चित्ता । पायीं ठेवियेला माथा २ वाहों टाळी गातो गीत । सुखें नाचे राउळांत ३ सेना म्हणे नामापुढें । तुच्छ सकळ बापुडें ॥ ४ ॥

७७ विटेवरीं उभा नीट देखिला गे माये । निवाली कांती हरपला देहभाव १ तें रूप पाहतां मन माझें वेधलें । नुठेंचि कांहीं केलें तेथुनि गे माये २ अवघें अवधियांचा विसर पडियेला । पाहतां चरणाला श्रीविठोबाच्या ३ सेना म्हणे चला जाऊं पंढरीसी । जिवलग विठ्ठलासी भेटावया ॥४॥

७८ विटेवरीं उभा । जैसा लावण्याचा गाभा १ पायीं ठेउनियां माथा । अवघी वारली चिंता २ समाधान चित्ता । डोळां श्रीमुख पाहतां ३ बहु जन्मीं केला लाग । सेना देखे पांडुरंग ॥ ४ ॥

७९ जो हा दुर्लभ योगिया जनासी । उभाचि देखिला पुंडलीकापासीं १ हारपलें दुजेपण फिटला संदेह । निमाली वासना गेला देहभाव २ विटेवरीं उभा पंढरीचा राणा । सेना म्हणे बहु आवडतो मना ॥ ३ ॥

## श्रीचोखामेळा

८० श्रीमुखाची शोभा कस्तुरी मळवट । उभा असे नीट विटेवरीं १ कर दोनी कटीं कुंडलें झळकतीं । तेज हें फांकतीं दशदिशां २ वैजयंती माळा चंदनाची उटी । टिळक ललाटीं कस्तुरीचा ३ चोखा म्हणे माझ्या जीवींचा जीवनु । पाहतां तनु मनु भुलोनी जाय ॥ ४ ॥

८१ गोजिरें साजिरें श्रीमुख चांगलें । ध्यानीं मिरवलें योगियांच्या १ पंढरी भूवैकुंठ भीवरेच्या तीरीं । वैकुंठाचा हरी उभा विटे २ राही रखुमाई सत्यभामा नारी । पुंडलीकें सहपरिवारीं आणियेला ३ वैजयंती माळ किरीटकुंडलें । प्रेमें आलिंगिलें चोखियानें ॥ ४ ॥

८२ सर्वही सुखाचें ओतिलें श्रीमुख । त्रिभुवननायक पंढरीये १ कर दोन्ही कटीं सम पाय विटे । शोभलें गोमटें बाळरूप २ जीवाचें जीवन योगियांचें धन । चोखा म्हणे मंडन तिन्ही लोकीं ॥ ३ ॥

८३ उतरलें सुख चंद्रभागेतटीं । पाहा वाळुवंटीं बाळरूप १ बहुतां काळाचें ठेवणें योगियांचें । ध्येय शंकराचें सुख ब्रह्म २ जयालागीं अहोरात्र विवादती । तो भक्ताचिये प्रीति उभा असे ३ चोखा म्हणे सर्व सुखाचें आगर । न कळे ज्याचा पार श्रुति-शास्त्रां ॥ ४ ॥

८४ अनादि निर्मळ वेदाचें जें मूळ । परब्रह्म सोज्वळ विटेवरीं १ कर दोन्ही कटीं राहिलासे उभा । नीळवर्ण प्रभा फांकतसे २ आनंदाचा कंद पाऊलें साजिरीं । चोखा म्हणे हरी पंढरीये ॥ ३ ॥

८५ अनाम जयासी तेंचि रूपा आलें। उभें तें राहिलें विटेवरीं १ पुंडलीकाच्या प्रेमा युगें अठ्ठावीस। समचरणीं वास पंढरीये २ चोखा म्हणे ऐसा भक्तांचा कनवाळू। जाणे लळा पाळू भाविकांचा ॥ ३ ॥

८६ व्यापक व्यापला तिहीं त्रिभुवनीं। चारी वर्ण खाणी विठू माझा १ शंख चक्र करीं वैजयंती माळा। नेसला पिवळा पितांबर २ कटावरीं जेणें कर हे ठेविले। ध्यान मिरविलें भीमातिरीं ३ चोखा म्हणे माझा आनंदाचा कंद। नाम हें गोविंद मिरविलें ॥ ४ ॥

८७ श्रीमुख चांगलें कांसे पीतांबर। वैजयंती हार रुळे कंठीं १ तो माझ्या जीवींचा जिवलग सांवळा। भेटवा हो डोळा संतजन २ बहुतांचें धांवणें केले नानापरी। पुराणें ही थोरी वानिताती ३ चोखा म्हणे वेद शास्त्रांसी जो साक्षी। तोचि आम्हां रक्षी नानापरी ॥ ४ ॥

८८ वैकुंठ पंढरी भीवरेचे तीरीं। प्रत्यक्ष श्रीहरी उभा तेथें १ रूप हें सांवळें गोड तें गोजिरें। धणी न पुरे पाहतां जया २ कांसे सोनसळा नेसला पिवळा। वैजयंती माळा गळां शोभे ३ चोखा म्हणे ऐसें सगुण हें ध्यान। विटे समचरण ठेवियेले ॥ ४ ॥

८९ सुखाचें जें सुख चंद्रभागेतटीं। पुंडलीकापाठीं उभें असे १ साजिरें गोजिरें समचरणीं उभें। भक्तांचिया लोभें विटेवरीं २ कर दोनी कटीं श्रीमुख चांगलें। शंख चक्र मिरवले गदा पद्म ३ चोखा म्हणे शोभे वैजयंती कंठीं। चंदनाची उटी सर्व अंगीं ॥ ४ ॥

९० सुंदर मुखकमल कस्तुरी मळवटी। उभा देखिला तटीं भीवरेच्या १ मकराकार कुंडलें श्रवणीं ढाळ देती। गळा वैजयंती मुक्तमाळा २ शंख चक्र गदा पद्म चहूं करीं। गरुड वाहन हरी देखियेला ३ चोखा म्हणे सर्व सुखाचें आगर। निरा भीवरा तीर विठ्ठल उभा ॥ ४ ॥

९१ ज्या कारणें वेदश्रुति अनुवादती। तो हा रमापति पंढरीये १ सुखाचें ठेवणें क्षीरसागर निवासी। तो हा पंढरीसी उभा विटे २ भाविका कारणें उभवोनी हात। उदारपणें देत भुक्तिमुक्ति ३ न पाहे उंच नीच याती कुळ। स्त्री शूद्र चांडाळ सरते पायीं ४ चोखा म्हणे ऐसा भावाचा भुकेला। म्हणोनि स्थिरावला भीमातटीं ॥ ५ ॥

९२ जाणतें असोनी नेणतें पै झालें। सुखाला पावलें भक्तांचिया १ कैसा हा नवलाव सुखाचा पाहा हो। न कळे भाव ब्रह्मादिकां २ तो हरि समर्थ पंढरीये उभा। त्रैलोक्याची शोभा शोभतसे ३ चोखा म्हणे आमुचें दीनांचें माहेर। तें पंढरपूर भीमातटीं ॥ ४ ॥

---

# नामपर



## श्रीतुकाराममहाराज

९३ समुद्रवलयांकित पृथ्वीचें दान। करितां समान नये नामा १ म्हणऊनि कोणी न करावा आळस। म्हणा रात्रंदिवस राम राम २ सकळही शास्त्रें पठण करितां वेद। सरी नये गोविंद नामें एकें ३ सकळही तीर्थें प्रयागादि काशी। करितां नामाशीं तुळतीना ४ कर्वती कर्मरीं देहासी दंडण करितां समान नये नामा ५ तुका म्हणे ऐसा आहे श्रेष्ठाचार। नाम हेंचि सार विठोबाचें॥ ६॥

९४ नाम पावन पावन। त्याहूनि पवित्र आहे कोण २ शिव हालाहलें तापला। तोही नामें शीतळ झाला २ शिवास नामाचा आधार। केला कळि-काळ किंकर ३ मरण झालें काशीपुरीं। तेथें नामची उद्धरी ४ तुका म्हणे अवघीं चोरें। एक हरिनाम सोइरें॥ ५॥

९५ नाम घेतां उठाउठी। होय संसाराची तुटी १ ऐसा लाभ बांधा गाठीं। विठ्ठल पायीं पडे मिठी २ नामापरतें साधन नाहीं। जें तूं करिसी आणिक कांहीं ३ हाकारोनि सांगे तुका। नाम घेतां राहों नका॥ ४॥

९६ नाम गोड नाम गोड। पुरे कोड सकळही १ रसना येरां रसां विटे। घेतां घोट अधिक हें २ आणिका रसें मरण गांठी। येणें तुटी संसारें ३ तुका म्हणे आहार जाला। हा विठ्ठल आम्हांसी॥ ४॥

९७ नाम घेतां कंठ शीतळ शरीर। इंद्रिया व्यापार नाठवती १ गोड हें गोमटें अमृतासी वाड। केला कईवाड माझ्या चित्तें २ प्रेमरसें जाली पुष्ट अंगकांति। त्रिविध नासती ताप क्षणें ३ तुका म्हणे तैथें विकाराची मात। बोलों नये हित सकळांचें॥ ४॥

९८ नामाचिया बळें कैवल्यसाधन। उगेंचि निधान हातां चढे १ जाणोनिया वर्म भक्त भागवत। राहिले निवांत प्रेमबोधें २ कोण जपतप बाहें हें कावाड। म्हणती अवघड यारे नाचूं ३ उघड समाधि हरिकथा सोहळा। नरनारी बाळा लहान थोरां ४ छंदें वाहती टाळी गाती नामावळी। जय-

जयकारें होळी दहन दोषां ५ येणें ब्रह्मानंदें दुमदुमलें जग । सुलभ हा मार्ग सांपडला ६ तुका म्हणे हरिभक्तीच्या उल्हासें । आणियला त्रास यमदूतां ॥७॥

९९ नामाचे पवाडे बोलतीं पुराणें । होऊनि कीर्तन तोचि ठेला १ आदिनाथा कंठीं आगळा हा मंत्र । आवडीचें स्तोत्र सदा घोकी ॥ छ॥ आगळें हें सार उत्तमा उत्तम । ब्रह्मकर्म नाम एक तुझें २ तिहीं त्रिभुवनीं गमन नारदा । हातीं वीणा सदा नाम मुखीं ३ परिक्षितीं मृत्यु सातां दिवसांचा । मुक्त जाला वाचां उच्चारितां ४ कोळियाची कीर्ति वाढली गहन । केलें रामायण रामाआधीं ५ सगुण निर्गुण तुज म्हणे वेद । तुका म्हणे भेद नाहीं नामीं ॥ ७ ॥

१०० बरवी नामावळी । तुझी महादोषां होळी १ जालें आम्हांसी जीवन । धणीवरी हें सेवन २ सोपें आणि गोड । किती अमृताही वाड ३ तुका म्हणे अच्युता । आमुचा कल्पतरू दाता ॥ ४ ॥

१०१ नामाची आवडी तोचि जाणा देव । न धरी संदेह कांहीं मनीं १ ऐसें मी हें नाहीं बोलत नेणतां । आणोनि संमता संतांचिया २ नाम म्हणे तया उरलें साधन । ऐसें हें वचन बोलों नये ३ तुका म्हणे सुख पावें या वचनीं । ज्याची शुद्ध दोन्ही मायबापें ॥ ४ ॥

१०२ प्रेम तेथें वास करी । मुखीं उच्चारितां हरी १ प्रेमे यावें तया गांवा । चोजवीत या वैष्णवां २ प्रेम पाठीं लागें बळें । भक्त देखोनिया भोळे ३ प्रेम न वजें दवडितां । शिरें बळें जेथें कथा ४ तुका म्हणे थोर आशा । प्रेमा घरीं विष्णुदासा ॥ ५ ॥

१०३ काय करितील केलीं नित्य पापें । वसे नाम ज्यापें विठोबाचें १ तृणीं हुताशन लागतां ते रासी । जळतील तैसीं क्षणमात्रें २ विष्णुमूर्तिपाद पाहतां चरण । तेथें कर्म कोण राहूं शके ३ तुका म्हणे नाम जाळी महादोष । जेथें होय घोष कीर्तनाचा ॥ ४ ॥

१०४ रामनामाचे पवाडे । अखंड ज्याची वाचा पढे १ धन्य तो एक संसारीं । राम नाम जो उच्चारी २ राम नाम गर्जे वाचा । काळ आज्ञाधारक त्याचा ३ तुका म्हणे रामनामीं । कृतकृत्य झालों आम्ही ॥ ४ ॥

१०५ कर्म धर्म नव्हती सांग । उण्या अंगें पतन १ भलत्या काळें नामावळी । सुलभ भोळी भाविकां २ प्रायश्चित्तें पडती पायां । गाती तयां वैष्णवां ३ तुका म्हणे नुपजे दोष । करा घोष आनंदें ॥ ४ ॥

१०६ नव्हे गुरुदास्य संसारियां । वैराग्य तरी भेणें कांपे विषया । तैसें नाम नव्हे पंढरिराया । जया सायास न लगती १ म्हणोनि गोड सर्व भावें ।

आंघोळी नलगे तोंड धुवावें । अर्थ घाड जीवें । नलगे भ्यावें संसारा २ कर्म तंव न पुरे संसारिक । धर्म तरी फलदायक । नाम विठ्ठलाचें एक । नाशी दुःख भवाचें ३ न लगे सांडणें मांडणें । आगम निगमाचें देखणें । अवघें तुका म्हणे । विठ्ठलनामें आटलें ॥ ४ ॥

१०७ हित तें हें एक राम कंठीं राहे । नाठवती देहभाव देहीं १ हाचि एक धर्म निज बीजवर्म । हेंचि जाळी कर्मे केलीं महा २ चित्त राहे पायीं रूप बैसे डोळां । जीवें कळवळा आवडीचा ३ अखंड न खंडे अभंग न भंगे । तुका म्हणे गंगे मिळणी सिंधु ॥ ४ ॥

१०८ मंत्रचळें पिसें लागतें सत्वर । अबद्ध ते फार तरले नामें १ अशौच तो बाधो आणिकां अक्षरां । नाम निद्सुरा घेतां तरे २ राग ज्ञान घात चुकतां होय वेळ । नाम सर्वकाळ शुभदायक ३ आणिकां भजना बोलिला निषेध । नाम तें अभेद् सकळां मुखीं ४ तुका म्हणे तपें घालितीं घालणी । वेश्या उद्धरूनि नेली नामें ॥ ५ ॥

१०९ नामें स्नानसंध्या केलें क्रियाकर्म । त्याचा भवश्रम निवारला १ आणिकें दुरावलीं करितां खटपट । वाउगे बोभाट वर्माविण २ रामनामीं जिहीं धरिला विश्वास । तिहीं भवपाश तोडियेले ३ तुका म्हणे केलें कळि-काळ ठेंगणें । नामसंकीर्तनें भाविकांनीं ॥ ४ ॥

११० न पालटे एक । भोळा भक्तचि भाविक १ येरां नाश आहे पुढें । पुण्य सरता उघडें २ नेणे गर्भवास । एक विष्णुचाचि दास ३ तुका म्हणे खरें । नाम विठोबाचें बरें ॥ ४ ॥

१११ गायें नाचे वाहें टाळी । साधन कळी उत्तम हें १ काय जाणों तरले किती । नांव आइती या बैसों २ सायासाचें नाहीं काम । घेतां नाम विठोबाचें ३ तुका म्हणे निर्वाणीचें । शस्त्र साचें हें एक ॥ ४ ॥

११२ तपासी तें मन करूं पाहे घात । धरोनि सांगात इंद्रियांचा १ म्हणोनि कीर्तन आवडलें मज । सांडोनियां लाज हेंचि करी २ पाहतां आगमनिगमाचे ठाव । तेथें नाहीं भाव एकविध ३ तुका म्हणे येथें नाहीं वो विकार । नाम एक सार विठोबाचें ॥ ४ ॥

११३ ब्रह्मयाचे वेद् शंखासुरें नेले । त्यासाठीं धरिलें मत्स्यरूप १ तेणें आत्मा नव्हता नेला ब्रह्मांडासी । काय ब्रह्मयासी नव्हतें ज्ञान २ परि तेणें धावा केला आवडीनें । आले नारायण कृपासिंधु ३ तुका म्हणे विठोबा मी नामधारक । पोसणें सेवक भेटी देईं ॥ ४ ॥

११४ वेदाचें गव्हर न कळे पाठकां । अधिकार लोकां नाहीं येरां १

विठोबाचें नाम सुलभ सोपारें। तारी एकसरें भवसिंधु २ जाणत्यां असाध्य मंत्र तंत्र काळ। येर तो सकळ मूढ लोक ३ तुका म्हणे विधिनिषेध लोपला। उच्छेद या झाला मारगाचा ॥ ४ ॥

११५ वेद अनंत बोलिला। अर्थ इतुकाची साधिला १ विठोबासी शरण जावें। निजनिष्ठें नाम गावें २ सकळ शास्त्रांचा विचार। अंतीं इतुकाची निर्धार ३ अठरा पुराणीं सिद्धांत। तुका म्हणे हाचि हेत ॥ ४ ॥

११६ चारी वेद जयासाठीं। त्याचें नाम धरा कंठीं १ न करीं आणीक साधन। कष्टसी कां वांयावीण २ अठरा पुराणांचे पोटीं। नामाविण नाहीं गोठी ३ गीता जेणें उपदेशिली। ते ही विटेवरीं माउली ४ तुका म्हणे सार धरीं। वाचे हरिनाम उच्चारीं ॥ ५ ॥

११७ हांकेसरसी उडी। घालुनियां स्तंभ फोडी १ ऐसी कृपावंत कोण। माझे विठाईवांचून २ करितां आठव। धांवोनियां घाली कव ३ तुका म्हणे गीतीं गातां। नामें द्यावी सायुज्यता ॥ ४ ॥

११८ मुखीं नाम हातीं मोक्ष। ऐसीं साक्ष बहुतांची १ वैष्णवाचा माल खरा। तुरतुरा वस्तूसी २ भस्म दंड नलगे काठी। तीर्थां आटी भ्रमण ३ तुका म्हणे आडकाठी। नाहीं भेटी देवाचे ॥ ४ ॥

११९ विठोबाचें नाम ज्याचें मुखीं नित्य। त्या देखिल्या पतित उद्धरती १ विठ्ठल विठ्ठल भावें म्हणे वाचें। तरी तो काळाचें दांत ठेंची २ बहुत तारिलें सांगों किती आतां। ऐसा कोण दाता दुजा नाहीं ३ तुका म्हणे त्यांही ऐकोनिया कीर्ति। धरिला एकांतीं हृदयामाजीं ॥ ४ ॥

१२० लागोनियां पायां विनवितों तुम्हाला। करें टाळी बोला मुखें नाम १ विठ्ठल विठ्ठल म्हणा वेळोवेळां। हा सुखसोहळा स्वर्गीं नाहीं २ कृष्ण विष्णु हरी गोविंद गोपाळ। मार्ग हा प्रांजळ वैकुंठींचा ३ सकळांसीं येथें आहे अधिकार। कलियुगीं उद्धार हरिनामें ४ तुका म्हणे नामापासीं चारी मुक्ति। ऐसें बहुतां ग्रंथीं बोलियेलें ॥ ५ ॥

१२१ कळे न कळे ज्या धर्म। ऐका सांगतों रे वर्म॥ माझ्या विठोबाचें नाम। अट्टाहासें उच्चारा १ तो या दाखविल वाटा। जया पाहिजे त्या नीटा। कृपावंत मोठा। पाहिजे तो कळवळा २ पुसतां चुका होतो वाटा। सर्वे बोळावा गोमटा। मोडों नेदी कांटा। घेऊं सांटा चोरांसी ३ तुका म्हणे मोल। नलगे द्यावें वेंचा बोल। विठ्ठल विठ्ठल। ऐसा छंद मनासी ॥४॥

१२२ उभाउभी फळ। अंगीं मंत्राचें या बळ १ म्हणा विठ्ठल विठ्ठल।

गोड आणि स्वल्प बोल २ कळिकाळाची बाधा । नव्हे उच्चारितां सदा ३ तुका म्हणे रोग । वारे भवाऐसा भोग ॥ ४ ॥

१२३ ब्रह्मरस घेईं काढा । जेणें पीडा वारेल १ पथ्य नाम विठोबाचें । आणीक वाचें न सेवीं २ भवरोगा ऐसें जाय । आणीक काय क्षुल्लकें ३ तुका म्हणे नव्हे बाधा । आणीक कदा भूतांची ॥ ४ ॥

१२४ ऐसी जोडी करा नाम कंठीं धरा । जेणें चुके फेरा गर्भवास १ नासिवंत आटी प्रियापुत्रधन । बीज ज्याचें हीन तेंचि फळ २ नाव धड करा सहस्र नामांची । जे भवसिंधुची थडी पावे ३ तुका म्हणे काळा हाणा तोंडावरीं । भाता भरा हरिरामबाणीं ॥ ४ ॥

१२५ स्वल्प वाटे चला जावूं । वाचे गाऊं विठ्ठल ॥ १ ॥ तुम्ही आम्ही खेळीमेळीं । गदारोळीं आनंदें २ ध्वजा कुंचे गरुडटके । शृंगार निके करोनि ३ तुका म्हणे हेंचि नीट । जवळीं वाट वैकुंठा ॥ ४ ॥

१२६ न कळे तें कळों येईल उगलें । नामें या विठ्ठलें एकाचिया १ न दिसे तें दिसों येईल उगलें । नामें या विठ्ठलें एकाचिया २ न बोलों तें बोलों येईल उगलें । नामें या विठ्ठलें एकाचिया ३ न भेटे तें भेटों येईल आपण । करितां चिंतन विठोबाचें ४ अलभ्य तो लाभ होईल अपार । नाम निरंतर म्हणतां वाचें ५ तुका म्हणे जीव आसक्त सर्वभावें । तरतील नांवें विठोबाच्या ॥ ६ ॥

१२७ गर्जत जावें नामावळी । प्रेमें टाळी वाहोनी १ येणें सुखें पुढती धांवे । भेटीसवें गोपाळा २ लोटांगण घाला तळीं । वंदा धुळी संतांची ३ तुका म्हणे विठ्ठल लाहो । ऐसा वाहो उभारा ॥ ४ ॥

१२८ प्राणिया एक बीज मंत्र उच्चारीं । प्रतिदिनीं रामकृष्ण म्हण कां मुरारी १ हेंचि साधन रे तुज सर्वहि सिद्धीचें । नाम उच्चारीं रे गोपाळाचें वाचें २ उपास पारणें नलगे वनसेवन । नलगे धूम्रपान पंचाग्नितापणें ३ सुखाचें फुकाचें कांहीं न वेंचे भांडार । कोटी यज्ञापरिस तुका म्हणे हें सार ॥ ४ ॥

१२९ नामापरतें साधन नाहीं पैं आणीक । भवसिंधुतारक हेंचि एक १ उत्तमा उत्तम सर्वांही वरिष्ठ । नाम श्रेष्ठां श्रेष्ठ तिहीं लोकीं २ शिव भवानी हें आवडीचें स्तोत्र । गुह्यमंत्र बीज एकांतीचा ३ तुका म्हणे कोण इतरांचा पाड । सवाहुनी वाड नाम आहे ॥ ४ ॥

१३० नामसंकीर्तन साधन पैं सोपें । जळतील पापें जन्मांतरींचीं १ न लगती सायास जावें वनांतरा । सुखें येतो घरा नारायण २ ठायींच बैसोनि करा एकचित्त । आवडीं अनंत आळवावा ३ रामकृष्ण हरि विठ्ठल केशवा ।

मंत्र हा जपावा सर्वकाळ ४ याविण आणिक नाहीं पैं साधन । वाहतसे आण विठोबाची ५ तुका म्हणे सोपें आहे सर्वांहूनि । शहाणा तो धर्णा घेतो येथें ॥ ६ ॥

१३१ हरि म्हणतां गति पातकें नासती । कळिकाळ कांपती हरि म्हणतां १ हरि म्हणतां भुक्ति हरि म्हणतां मुक्ति । चुके यातायाती हरि म्हणतां २ तपें अनुष्ठानें न लगती साधनें । तुटतीं बंधनें हरि म्हणतां ३ तुका म्हणे भावें जपा हरिचें नाम । मग काळ यम शरण तुम्हां ॥ ४ ॥

१३२ नाम घेतां नलगे मोल । नाममंत्र नाहीं खोल १ दोंचि अक्षरांचें काम । उच्चारावें राम राम २ नाहीं वर्ण धर्म याती । नामीं अवघींचि सरती ३ तुका म्हणे नाम । चैतन्य हें निजधाम ॥ ४ ॥

१३३ नाम घेतां वायां गेला । ऐसा कोणे आईकिला १ सांगा विनवितों तुम्हांसी । संत महंत सिद्ध ऋषी २ नामें तरला नाहीं कोण । ऐसा द्यावा निवडून ३ सलगीच्या उत्तरा । तुका म्हणे क्षमा करा ॥ ४ ॥

१३४ नाम न वदे ज्याची वाचा । तो लेक दों बापांचा १ हेचि ओळख तयाची । भ्रूण जाणा अभक्ताची २ ज्यासी विठ्ठल नाहीं ठावा । त्याचा संग न करावा ३ ठावा नाहीं पांडुरंग । जाणा जातीचा तो मांग ४ नाम न म्हणे ज्याचें तोंड । तेंचि चर्मकाचें कुंड ५ तुका म्हणे त्याचे दिवशीं । रांड गेली महारापाशीं ॥ ६ ॥

१३५ काय नव्हे केलें । एका चिंतितां विठ्ठलें १ सर्व साधनांचें सार । भवसिंधु उतरीं पार २ योग याग तपें । केलीं तयानें अमूपें ३ तुका म्हणे जपा । मंत्र त्रिअक्षरीं सोपा ॥ ४ ॥

१३६ चाल केलासी मोकळा । बोल विठ्ठल वेळोवेळां १ तुज पापचि नाहीं ऐसें । नाम घेतां जवळीं वसे २ पंच पातकांच्या कोडी । नामें जळतां न लगे घडी ३ केलीं मागें नको पाहों । तुज जमान आम्हीं आहों ४ करीं तुज जीं करवतीं । आणिक नामें घेऊं किती ५ तुका म्हणे काळा । रीग नाहीं निघती ज्वाळा ॥ ६ ॥

१३७ नाम साराचेंही सार । शरणांगत यमकिंकर १ नाम उत्तम उत्तम । वाचें बोला पुरुषोत्तम २ नाम जपतां चंद्रमौळी । नामें तरला वाल्हा कोळी ३ तुका म्हणे वर्णूं काय । तारक विठोबाचे पाय ॥ ४ ॥

१३८ वंदूं चरणरज सेवूं उष्टावळी । पूर्व कर्मा होळी करुनी सांडूं १ अमुप हें गांठीं बांधूं भांडवल । अनाथां विठ्ठल आम्हांजोगा २ अवघे होती लाभ एका या चिंतनें । नामसंकीर्तनें गोविंदाच्या ३ जन्ममरणाच्या खुंटतील खेपा । होईल हा सोपा सिद्ध पंथ ४ गेले पुढें त्यांचा शोधीत मारग ।

चला जाऊं माग घेत आम्हां ५ तुका म्हणे घालूं जीवपणा चिरा । जाऊं त्या माहेरा निजाचिया ॥ ६ ॥

१३९ सर्व सुखा अधिकारी । मुखें उच्चारी हरिनाम १ सर्वांगें तो सर्वोत्तम । मुखीं नाम हरीच २ ऐसी उभारिली बाहे । वेदीं पाहें पुराणीं ३ तुका म्हणे येथें कांहीं । संदेह नाहीं भरंवसा ॥ ४ ॥

१४० नाशिवंत देह नासेल हा जाणा । कां रे उच्चाराना वाचे नाम १ नामेंचि तारिले कोट्यान हे कोटी । नामें हें वैकुंठीं बैसविलें २ नामापरतें सार नाहीं त्रिभुवनीं । तें कां तुम्हीं मनीं आठवाना ३ तुका म्हणे नाम बेदासी आगळें । तें दिलें गोपाळें फुकासाठीं ॥ ४ ॥

१४१ नाम दूषी त्याचें नको दरुषण । विष तें वचन वाटे मज १ अमंगळ वाणी नाइकवे कानीं । निंदेची पोहणी उठे तेथें २ काय साच लभ्य त्याचिये वचनीं । कोणत्या पुराणीं दिली ग्वाही ३ काय आड लावूं त्याचिया तोंडासी । आतां या जिभेसी काय करूं ४ तुका म्हणे संत न मानिती त्यांस । घेऊं पाहे ग्रास यमदूत ॥ ५ ॥

१४२ झाडें बोरपोनि खाऊनिया पाला । आठवि विठ्ठला वेळोवेळां १ बल्कलें नेसूनि चिंधिया वेढूनी । सांडी जवळुनी देहभान २ लोकमान वमनासमान मानणें । एकांतीं राहणें विठोबासाठीं ३ सहसा करूं नये प्रपंचीं सौजन्य । सेवावें अरण्य एकांतवास ४ ऐसा हा निर्धार करी जो मनाचा । तुका म्हणे त्याचा पांग फिटे ॥ ५ ॥

१४३ युक्ताहार न लगे आणीक साधनें । अल्प नारायणें दाखविलें १ कलियुगामाजीं करावें कीर्तन । तेणें नारायण येईल भेटी २ नलगे लौकिक सांडावा वेव्हार । घ्यावें वनांतर भस्म दंड ३ तुका म्हणे मज आणीक उपाव । दिसती ते वाव नामेंविण ॥ ४ ॥

१४४ संध्या कर्म ध्यान जप तप अनुष्ठान । अवघें घडे नाम उच्चारितां । न वेचे मोल कांहीं लगती न सायास । तरी कां आळस करिसी झणीं १ ऐसें हें सार कां न घेसी फुकाचें । काय तुझें वेंचे मोल तया २ पुत्रस्नेहें शोक करी अजामेळ । तंव तो कृपाळ जवळीं उभा । अनाथाच्या नाथें घातला विमानीं । नेला उचलोनी परलोकां ३ अंतकाळीं गणिका पक्षियाच्या छंदें । राम राम पदें उच्चारिलें । तंव त्या दीनानाथा कृपा आली कैसी । त्यानें तियेसी वैकुंठा नेलें ४ अवचिता नाम आलिया हे गती । चिंतितां चित्तीं जवळीं असे । तुका म्हणे भावें स्मरतां राम राम । कोण जाणें वर्म तये दशे ॥ ५ ॥

१४५ काळ सार्थक केला त्यांनीं । धरिला मनीं विठ्ठल १ नाम वाचें श्रवण कीर्ति । पाउलें चित्तीं समान २ कीर्तनाचा समारंभ । निर्दंभ सर्वदा ३ तुका म्हणे स्वरूपसिद्धि । नित्य समाधि हरिनामीं ॥ ४ ॥

१४६ अनुहातध्वनि वाहे सकळां पिंडीं । राम नाहीं तोंडीं कैसा तरे १ सकळां जीवांमाजीं देव आहे खरा । देखिल्या दुसरावीण न तरे २ ज्ञान सकळांमाजीं आहे हें साच । भक्तीविण तेंच ब्रह्म नव्हे ३ काय मुद्रा कळल्या कराव्या सांगतां । दीप न लागतां उन्मनीचा ४ तुका म्हणे नका पिंडाचें पाळण । स्थापूं नारायण आतुडेना ॥ ५ ॥

१४७ रात्रीं दिवस आम्हां युद्धाचा प्रसंग । अंतर्बाह्य जग आणि मन १ जीवाही अगोज पडती आघात । येऊनिया नित्य नित्य वारूं २ तुका म्हणे तुझ्या नामाचिया बळें । अवघीयांचें काळें केलें तोंड ॥ ३ ॥

## श्रीनिळोबामहाराज

१४८ नामापाशीं भुक्तिमुक्ति । ज्ञान विरक्ति हरिनामीं १ नामापाशीं दया शांति । साधना समाप्ती हरिनामीं २ नामें प्राप्त नित्यानंद । स्वरुपाव-बोध हरिनामें ३ नामीं तिष्ठती ऋद्धिसिद्धि । तुटती उपाधी हरिनामें ४ निळा म्हणे हरिनाम सार । उतरी भवपार हरिनाम ॥ ५ ॥

१४९ होय अंतरीं पालट । करितां पाठ हरिनामें १ देवाऐसें देवचि होती । जे या भजती विठ्ठला २ ऐसा याचा प्रताप ठसा । प्रगटे सरिसा नामजपें ३ निळा म्हणे लाटिक नव्हे । पहा स्वानुभवें आपुलिया ॥ ४ ॥

१५० नामचिंतनें जडली प्रीती । भगवद्भावना सर्व भूतीं १ हेंचि परमार्थ साधन । मुखीं नाम हृदयीं ध्यान २ विषयभोगीं विलोभता । मोह न बाधी त्या ममता ३ निळा म्हणे निजध्यासें । झाले मुक्त शुकाऐसें ॥ ४ ॥

१५१ निजात्मप्राप्तीलागीं सार । हरिचिया उच्चार नामाचा १ हेंचि बीज हेंचि गुज । हेंचि निज निजाचें २ ऐसें संतीं पुरस्कारुनी । सांगितलें कानीं येऊनियां ३ निळा म्हणे परम प्राप्ती । नामींचि विश्रांति हरीचिया ॥४॥

१५२ यम नियम प्राणायाम । साधे जपतां रामनाम १ रामनाम जपतां आधीं । नासताती आधिव्याधी २ रामनामीं जडली वाचा । हरिरूप होय साचा ३ निळा म्हणे रामनाम । पावलासे मोक्षधाम ॥ ४ ॥

१५३ विठ्ठल नामें वाहे टाळी । ब्रह्मानंदाच्या कल्लोळीं १ निजात्म-सुखाचा सोहळा । विठ्ठल अवलोकिती डोळां २ सकळही सुकृतें वोळलीं । विठ्ठलरूपें उभीं ठेलीं ३ निळा म्हणे जडली बुद्धी । नित्य हरिनामें समाधी ॥४॥

१५४ पशु पक्षी श्वापद याती । भृंग पतंग कीटक जाती १ हरीतें भजतां हरिरूप झालीं । निजानंदीं निमग्न ठेलीं २ दैत्य दानव निशाचर । मानव याती नारीनर ३ निळा म्हणे भजतां हरी । अगाधपणें पावले थोरी ॥४॥

१५५ विठ्ठल विठ्ठल म्हणतां वाचें । स्वरूप त्याचें आठवें १ श्याम सुंदर कटीं कर । रूप मनोहर तेजस्वी २ दिव्य सुमनें तुळशीमाळा । मळवट पिंवळा रेखियेला ३ निळा म्हणे मुगुटावरीं । खोंविल्या मंजुरी कोवळिया ॥ ४ ॥

१५६ उच्चारितां नाम वाचें । झालें त्याचें स्वरूपच्रि १ नाहीं तया उरलें दुजें । आत्मतेजें जग भासें २ ब्रह्मानंदीं निमग्न वृत्ति । विराजती स्वानंदें ३ निळा म्हणे गुणातीत । अखंडित निजबोधें ॥ ४ ॥ .

१५७ उपदेशिला एकचि सार । मजही उच्चार नामाचा १ म्हणती न पडे फंदीं । होशिल दोंदी काळाचा २ करी संत समागम । गाई हरिनाम कीर्तनीं ३ निळा म्हणे ऐसा संतीं । केला निजप्रीति उपदेश ॥ ४ ॥

१५८ हेंचि परमार्थाचें सार । हरिच्रिया उच्चार नामाचा १ जिहीं केला पावले ते । वैकुंठीं सरते सुखी झाले २ गातां वानितां हरिगुणरासी । झाले त्रैलोक्यासी पूज्य ते ३ निळा म्हणे निका उपावो । सांपडला ठावो वैष्णवां ॥ ४ ॥

१५९ हेंचि आम्हासी गुरुगम्य । हरिचें नाम उपदेशिलें १ आणिकां साधनीं चाडची नाहीं । घालितीं अपायीं म्हणोनियां २ योगाभ्यास मंत्रजप । पुरश्चरण तप हरिनाम ३ निळा म्हणे दाविला मार्ग । हाचि हा चांग गुरुनाथें ॥ ४ ॥

१६० सुखें जन्मांतरें घेऊं । नामें आळवूं श्रीहरीचीं १ नाहीं आम्हां त्याचें कोडें । संसार बापुडें तें काय २ कळिकाळाचें भय तें किती । पायां पडती यमधर्म ३ निळा म्हणे सर्वहि सिद्धी । रुळती पदीं हरिनामें ॥ ४ ॥

१६१ संत एकांतीं बैसले । सर्वही सिद्धांत शोधिलें । ज्ञानदृष्टी अवलोकिलें । सारांश काढिलें निवडुनी १ तें एक श्रीहरीचें नाम । सकळ पातकां करी भस्म । अधिकारी उत्तम आणि अधम । चारी वर्ण नरनारी २ विठ्ठल नामें उच्चार ओठीं । मूर्ती पाहतां दृष्टी । लाभे ब्रह्मतेची पुष्टी । वाढे पोटीं निजशांती ३ देखतां कांपती त्या काळ । हरिच्या ऐसें अंगीं बळ । प्रगटे वैराग्य अढळ । तुटती मळ ममतेचे ४ महादोषांची झाडणी । अहंभावादिकांची गाळणी । उभय कुळें बैसवोनि । जाती विमानीं वैकुंठा ५ ऐसा नामाचा प्रताप । नेदी उरो पुण्य पाप । भंगूनिया त्रिविध ताप ।

ठाकती सद्रूप होऊनि ६ दृश्य नुरे त्याचिये दृष्टी। ब्रह्मानंदें कोंदे सृष्टी। निळा म्हणे धरितां कंठीं। बीज मात्र हरिनाम ॥ ७ ॥

१६२ नाम गर्जे श्रवण कीर्ती। पाऊलें चित्तीं समान १ काळ सार्थक केला त्यांनीं। धरिला मनीं विठ्ठल २ कीर्तनाचा समारंभ। निर्दंभ सर्वदा ३ निळा म्हणे स्वरूपसिद्धी। नित्य समाधि हरिनामीं ॥ ४ ॥

## श्रीनामदेवमहाराज

१६३ नामाचा महिमा नेणेंचि पैं ब्रह्मा। म्हणोनियां कर्मा अनुसरला १ नाम हेंचि कर्म नाम हेंचि धर्म। केशव हेंची वर्म सांगितल २ नाम शुद्ध स्नान नाम शुद्ध संध्या। नामाविणें वेदां आणीक नाहीं ३ करितां आचमन केशव नारायण। करिती उच्चारण आधीं हेंचि ४ लग्नाचिये काळीं म्हणती सावधान। लक्ष्मीनारायण चिंतन करा ५ देहांचिये अंतीं प्रायश्चित्त देती। शेवटीं बदविती रामनाम ॥ ६ ॥ ऐसिया नामापरतें नाहीं सार। गिरिजेसी शंकर उपदेशी ७ करिती पितृश्राद्ध कर्म आचरती। शेवटीं म्हणती एको विष्णु ८ नामें होय गती नामें होय मुक्ति। नामयाचे चित्तीं रामनाम ॥ ९ ॥

१६४ नामाचा प्रताप जाणवेना कोणा। समुद्रीं पाषाण तारियेले १ आवडीनें कोणी चिंतितां उल्हास। काय तो तयास उपेक्षील २ कुंटिणी ते नीच राव्यासाठीं नेली। वैकुंठीं ठेविली संन्निधची ३ अजामिळ खळ पुत्राचिया मिषें। उद्धरिलें त्यास दीनानाथें ४ नामा म्हणे ऐसें सांगों आतां किती। नामापाशीं मुक्ति उभी असे ॥ ५ ॥

१६५ नामाचें सामर्थ्य नेणतीं वेदशास्त्रें। शेषाचीं तीं वक्त्रें मौनावलीं १ गंगा गणपती चंद्रसूर्य श्रेष्ठ। शंकर वरिष्ठ मौनावले २ भीष्म पाराशर उद्धव अंगद। ब्रह्मा मुचकुंद मौनावले ३ नामा म्हणे काय जाणे मी ते स्तुति। दाटोनि श्रीपति उभा केला ॥ ४ ॥

१६६ नामाचा प्रताप काय वानूं वाचें। अक्षय सुखाचें स्थान दावी १ नामाविण कांहीं नाहीं नाहीं सार। साधावें सत्वर भलेंनो हें २ अजामेळ पहा आजन्म पातकी। नामें गेला सेखीं वैकुंठासीं ३ कुंटिणी जारणी शुकामिसें गाये। वैकुंठासी जाये ततक्षणीं ४ पहा वाल्हा कोळी उफराट्या नामें। भविष्य संभ्रमें वाखाणिलें ५ नामा म्हणे किती सांगावा निर्धारें। साधन सोपारें नाम एक ॥ ६ ॥

१६७ मंत्राचा पैं मंत्र हरी हा उच्चार। न लगे तो विचार करणें कांहीं १ सुफळ नाम गाढें वाचेसी उच्चारूं। केशव हाकारूं सर्वांभूतीं २

नाहीं यासी पतन नोहेल बंधन । नित्य हेंचि स्नान रामनामें ३ नामा म्हणे भाव सर्वांभूतीं करा । आणिक पसारा घालूं नका ॥ ४ ॥

१६८ व्यापक तें नाम तेव्हांच होईल । जेव्हां ओळखेल मीपणासी १ आपुलेंचि नाम न ओळखिलें । व्यापक साधिलें जायाचिना २ आपुलीच ओळख आपणासी पडे । मग सर्वत्र जोडें नाम तेव्हां ३ नामाविण नाम तेंचि होय विभ्रम । नामदेव म्हणे संतां पुसा ॥ ४ ॥

१६९ केशव नाम गाय केशव नाम गाय । केशव नाम गाय कामधेनु १ वेणुनादीं चरे पाणी पी भीवरे । ती गाय हंबरे भक्तालागीं २ भक्तिसुखें खाय प्रेमें तें पान्हाय । भुकेलिया खाय पातकासी ३ नामा म्हणे गाय ते पंढरीस आहे । पापिया न साहे पाठीं लागे ॥ ४ ॥

१७० केशव म्हणतां क्लेश जाताती परते । त्याहूनि सरतें आणिक नाहीं १ वेद कां पढसी शास्त्र कां शिणसी । उद्दंड वाचेसीं हरी म्हणा २ याहूनि पैं सार नाहीं हो दुसरें । भीष्में युधिष्ठिर उपदेशिला ३ नामा म्हणे धरा केशवीं विश्वास । तुटे गर्भवास नामें एकें ॥ ४ ॥

१७१ विष्णुनाम श्रेष्ठ गाती देवऋषी । नाम अहर्निशीं गोपाळाचें १ हरि हरि हरि तूंचि बा श्रीहरी । वसे चराचरीं जनार्दन २ आदि ब्रह्म हरी आळवी त्रिपुरारी । उमेप्रती करी उपदेशु ३ नामा म्हणे राम हा जप परम । शंकरासी नेम दिननिशीं ॥ ४ ॥

१७२ करितां हरिकथा नाम सुखरासी । उद्धार जीवासी एका नामें १ तें हें रामनाम जपें तूं सप्रेम । जप हा सुगम सुफल सदा २ नामेंचि तरले नामेंचि पावले । नाम म्हणतां गेले वैकुंठासी ३ नामा म्हणे एका नामेंसी विनट । ते वैकुंठींचे पेठ पावेल देखा ॥ ४ ॥

१७३ रामकृष्ण माळ घालीं कां अढळ । तुटेल भवजाळ मायामोहो १ होशील तूं साधु न पवसी बाधु । पूर्ण ब्रह्मानंद तुष्टेल तुज २ जपतां रामनाम पुरती सकळ काम । आदी अंतीं नेम साधेल तुज ३ नामा म्हणे कृतार्थ पूर्ण मनोरथ । न लगती ते अर्थ माया फांसे ॥ ४ ॥

१७४ हरिनाम पाठ हाचि भाव । हरी हरी हाचि देव । हरीविण न फिटे संदेह । सर्व जिवांचा जाण पां १ हरीतत्त्व ज्याचे देहीं । तोचि तरला येथें पाहीं । हरीविण या डोहीं । भवसागर कैसा तरेल २ रामकृष्ण वासुदेवा । हाचि सर्व जीवांचा विसांवा । येथें पोकारूनियां धांवा । विठ्ठलनाम उच्चारी ३ नामा जपे हृदयीं सदा । रामकृष्ण हाचि धंदा । हरीराम परमानंदा । हाचि जप जपतसे ॥ ४ ॥

१७५ विठ्ठलाचें नाम जे माउलीचे ओठीं । विठो तिचे पोटीं गर्भवासी १ जयाचिये कुळीं पंढरीची वारी । विठो त्याचे घरीं बाळलीला २ नामा म्हणे जिव्हे काढीन मी रवा । असत्य केशवा वचन होतां ॥ ३ ॥

१७६ नामाचें चरित्र सदा अति गोड । तीर्थें काय चाड नाममात्रें १ ऐसा दृढ मनीं करावा विचार । नाम परिकर कलियुगीं २ नामा म्हणे नाम अनादि अक्षर । उभा कटीं कर भक्तांसाठीं ॥ ३ ॥

१७७ नाम हें अमृत भक्तांसी लाधलें । आपण घेतलें बौध्यरूप १ नाम हें आळवा नाम हें आठवा । होईल दोहावा कामधेनु २ न बाधेल विघ्न प्रपंच हें भान । नाम हेचि खूण वैकुंठींची ३ नामा म्हणे जड जीव ब्रह्म सर्व । हा गीतेमाजीं भाव कृष्ण सांगे ॥ ४ ॥

१७८ नामामृत गोडी आहे वैष्णवांसी । येरां प्राकृतांसी कळेनाची १ प्राकृत हे जन भुलले विषयीं । नामाचिया गांवीं कैसे जाती २ नामीं चित्त व्हावें जावें तेव्हां गांवा । मग नाम गोंवा तेथें कैचा ३ नाम तेंचि झालें वर्ण रूपातीत । अनाम स्वतंत्र स्वयंभ तो ४ नामदेव म्हणे नाम हें सुलभ । अभक्तां दुर्लभ नानापरी ॥ ५ ॥

१७९ नाम गाऊं नाम ध्याऊं । नामें विठोबासी पाहूं १ आम्ही दैवाचे दैवाचे । दास पंढरिरायाचे २ टाळ दिंडी घेऊनि हातीं । केशवराज गाऊं गीतीं ३ नामा म्हणे लाखोली सदा । वाहूं नामाची गोविंदा ॥ ४ ॥

१८० नामीं नारायण । होय भक्तांचे आधीन १ न मागतां भक्ति । नामापासी चारी मुक्ती २ भुलों नये जाण । नाम वैकुंटीं निशाण ३ नामा म्हणे ऐसे प्राणी । सम होती नारायणीं ॥ ४ ॥

१८१ नाम तेंचि रूप रूप तेंचि नाम । नामरूपा भिन्न नाहीं नाहीं १ आकारला देव नामारूपा आला । म्हणोनी स्थापिलें नाम देवें २ नामापरता मंत्र नाहीं हो आणीक । सांगती ते मूर्ख ज्ञानहीन ३ नामा म्हणे नाम केशव केवळ । जाणती प्रेमळ भक्त भले ॥ ४ ॥

१८२ नामापरता मंत्र नाहीं त्रिभुवनीं । ऐसीं बोले वाणी वेदशास्त्रीं १ पहा विचारोनि अनुभव मनीं । नका आडरानीं झणा भरो २ नामावांचोनिया तरले जे म्हणती । ते आधीं बुडता भवसागरीं ३ नामा म्हणे नाम ॐकाराचें मूळ । परब्रह्म केवळ रामनाम ॥ ४ ॥

१८३ नामावांचूनि कांहीं दुजें एथें नाहीं । वेगीं लवलाही राम जपा १ गोविंद गोपाळ वाचेसीं रसाळ । पावसी केवळ निजपद २ ध्रुव प्रल्हाद

वळी अंबऋषि प्रबुद्ध । नामेंचि विद्‌गाद्‌ पावले देखा ३ नामा म्हणे राम वाचे जया नाम । संसाराचे श्रम हरे नामें ॥ ४ ॥

१८४ नामाचा धारक विष्णुरूप देख । वैकुंठीचें सुख रुळें पायीं १ निराकार देव आकारासी आला । भक्तीं पै स्थापिला नामरूपा २ नाममंत्र बीज जंववरीं नाहीं जया । तंववरी केशव दया नाहीं प्राप्त ३ नामा म्हणे नाम केशव केवळ । जाणती प्रेमळ हरीभक्त ॥ ४ ॥

१८५ नामचि जो जाणे आनु कांहीं नेणें । संसार नामाविणें जाई-जणा १ नाम स्मरे त्यासि संसार नाहीं । खुंटली ते पाही येरझार २ नामेंवीण त्याचें जळो कां जिआले । वायांविण आले संसारासी ३ नामा म्हणे मज नामींच सौरसु । स्मरे हृषीकेशु त्यासी पावे ॥ ४ ॥

१८६ नाम फुकाचें चोखट । नाम घेतां नलगे कष्ट १ पडशील ज्या सागरीं । रामनामें आत्मा तारी २ पुत्रभावें स्मरण केलें । तया वैकुंठासी नेलें ३ नामा म्हणे महिमा जाण । घेतो विठ्ठलाची आण ॥ ४ ॥

१८७ साराचेंहि सार भक्तीचें भांडार । नाम निरंतर गातां वाचे १ कासया करावें आणीक साधन । नामाविण क्षण जाऊं नेदी २ दया शांति क्षमा हेंचि पैं भूषण । नामसंकीर्तन अहर्निशीं ३ नामा म्हणे जप अखंड नामाचा । काळ हा सुखाचा सदोदित ॥ ४ ॥

१८८ सार पैं नाम विठ्ठलाचें आहे । दिननिशीं सोय मना लावीं १ गुंपेजेल मन जोडतीं पाउलें । तुटती घेतले मायाजाळ २ नामचि कारण जप पैं सफळ । उद्धार निर्मळ सकळ जीवां ३ नामा म्हणे तो हा विठ्ठल पंढरिये । नाम अमृतमय चराचरीं ॥ ४ ॥

१८९ सर्वांमाजीं सार नाम हें देवाचें । सर्व साधनांचें सार जें कां १ चार सहा आणिक अठरा वर्णिती । नामें निजप्राप्ति अर्धक्षणीं २ व्यासादिकीं नाम साधिलें दृढ । प्रपंच काबाड निरसले ३ नामदेव म्हणे निजनाम ब्रह्म । घेतां नेमधर्म सर्व साधे ॥ ४ ॥

१९० शास्त्रांचे जें सार वेदाचें गव्हर । उतराया पार आणिक नाहीं १ विठ्ठल विठ्ठल म्हणा उघडा मंत्र जाणा । कळिकाळ अंकणा होईल तुम्हां २ न करावें खंडन अखंड उच्चारण । तप अनुष्ठान न लगे तुम्हां ३ सिद्धीचें हें सार मुक्तीचें माहेर । उतरावया पार दुजे नाहीं ४ विठ्ठला परतें काय करिसी दैवतें । परब्रह्म निरुतें पंढरीये ५ सिद्धीचें सहज भक्तीचें हें बीज । केशवीं दिलें मज म्हणे नामा ॥ ६ ॥

१९१ करितां वेदाध्ययन ज्योतिष । नामाच्या तो लेश नये हातां १ बहुत व्युत्पत्ति पुराण । व्यर्थ तें स्मरण नाम नव्हे २ अनंत हें नाम जयांतूनि आलें । त्यांताचि जिरालें जळीं जळ ३ सद्‌गुरु तें नाम सद्‌गुरुकृपेंविण कोणा । साधन साधेना जपें तपें ४ नामदेव म्हणे स्वतःसिद्ध नाम । गुरुविण वर्म हातां नये ॥ ५ ॥

१९२ अभ्यासिले वेद झाला शास्त्रबोध । साधिल्या विदग्ध नाना कळा १ प्रेमाचा जिव्हाळा जंव नाहीं अंतरीं । तव कैसा श्रीहरि करील कृपा २ हित तें आचरा हित तें विचारा । नामीं भाव धरा जाणतेनो ३ प्रसंगीं। पुराणें ऐकिलीं श्रवणीं । त्यांतील कोण मनीं धरीला अर्थ ४ काय तें सांडिलें काय तें मांडिलें । काय तें दंडीलें प्रवृत्तीसी ५ अनंत ह्या मूर्ति पाहिल्या लोचनीं । त्यांतील कोण ध्यानीं प्रतिबिंबली ६ स्वप्नाचिया परी देखसी आभास । न धरी विश्वास चित्त तुझें ७ वांझेचिये स्तनीं अमृताची धणी । मृगजळ पाणी तान्हेलीया ८ तरी प्रेमेंविण फळती क्रियाकर्मे । हातीं येती वर्मे विठोबाचीं ९ दृष्टीचें देखणें श्रवणींचें ऐकणें । मनाचें बैसणें एक होय १० नामा म्हणे तरी विठो येउनि भेटे । कायाचि पालटे कैवल्य होय ॥ ११ ॥

१९३ सार पैं सांगत उपनिषद् तुम्हां । वाचे रामनामा जप करा १ होंचि पैं मथित सांगोनियां गेले । उच्चारितां ठेले ब्रह्मरूप २ ज्योतिसी ते ज्योति भजन करील । आपणचि होईल हरी स्वयें ३ नामा म्हणे कैसें विप-रीत करणें । भूतदया धरणें सर्वांभूतीं ॥ ४ ॥

१९४ सकळ साधनांचें सार । रामकृष्ण हा उच्चार १ म्हणा गोविंद नरहरी । सकळ जीवां तोचि तारी २ नाम घेतां हरी माधव । तरताती सकळ जीव ३ नामा म्हणे केशव वाचे । धन्य जीवीत वैष्णवांचें ॥ ४ ॥

१९५ सोपा हा सुगम उपावो परीस । धरी तूं विश्वास नाम महीमें १ नाम हेंचि गंगा नाम हेंचि भीमा । अंतरीं श्रीरामा जपिजेसु २ अमृत सुरस रामनाम एक । वाचेचें वाचक मन करीं ३ नामा म्हण सुरस ध्यायी केशवास । दिनानिशीं हव्यास हाचि करी ॥ ४ ॥

१९६ म्हणतां वाचे नाम वैकुंठ जवळीं । नित्य वनमाळी भक्तासंगें १ होईल साधन विठ्ठलीं परिपूर्ण । निवती नयन मूर्ति पाहतां २ शंखचक्रांकित आयुधें शोभतीं । भाग्योदयीं प्राप्ती भावशीळा ३ नामा म्हणे तें रूप पंढ-रीस आहे । न सांडी ते सोये केशवाची ॥ ४ ॥

१९७ अखंड मुखीं रामनाम । धन्य तयाचाचि जन्म । स्नान

संध्येसी नेम । तो पुरुष महापवित्र १ धन्य धन्य तयाचा जन्म । रामार्पण अवघें कर्म । तोचि तरला हाचि नेम । रामकृष्ण उच्चारणीं २ अनंत जन्मांचें सांकडें । तेणेंचि उगविलें कोडें । जपतप येणें नावडे । रामकृष्ण उच्चारणीं ३ नामा म्हणे नाममात्रें । अवघीं निवारिलीं शास्त्रें । रामकृष्ण नाम वक्त्रें । उच्चारी तो धन्य ॥ ४ ॥

१९८ सर्व काळ हरी जप । हेंचि तप्तामाजीं तप । नलगाति घालावे संकल्प । नाना मंत्राचे परियेसीं १ मंत्रामाजीं मंत्रसार । रामकृष्ण हा उच्चार । नित्यानित्य निर्विकार । हरी जोडेल साचारें २ मागें कृतायुगीं काय सांगों । त्रेतायुगीं काय ओळगों । द्वापारीं कृष्ण रंगें रंगों । परीं कलीमाजीं नाम तारक ३ नामा म्हणे ग्रंथीं । पाहे पां यथानिगुती । नाम जपतांचि तरती । हें व्यासाचें वचन ऐसें ॥ ४ ॥

१९९ नाम वाचे उच्चारितां । हरे संसाराची व्यथा । जाती दोषाचिया चळथा । रामकृष्ण उच्चारणीं १ हरी माधव गोविंद । याचि नामाचा जया छंद । तोचि पावेल परमानंद । निजभुवन वैकुंठीं २ जन्मजन्माचि तप राशी । तेणें नाम आलें मुखासीं । स्मरतां हरी हृषीकेशी । सकळ पूर्वजा उद्धार ३ नामा जपे ध्यानीं मनीं । अखड विठ्ठल हरीकीर्तनीं । तेणें जपें ये मेदिनीं । कोटि यज्ञ घडले ॥ ४ ॥

२०० तरले तरती हा भरंवसा । पुढती न येती गर्भवासा १ वाट सांपडली निकी । विठ्ठल नाम ज्याचे मुखीं २ तीर्थें इच्छिती चरणींचे । रज नामधारकांचे ३ प्रायश्चित्तें सांडोनि प्रौढी । झाली दीनरूपें बापुडीं ४ ऋद्धि सिद्धी महाद्वारी । मोक्ष वोळंगण करी ५ नामा म्हणे सुखनिधान । नाम पतित पावन ॥ ६ ॥

२०१ नामें तो सरता नामें तो परता । नामें पंढरिनाथा भेटविलें १ नाम हेंचि तारी नाम हेंचि भवसागरीं । उतरी पैलतिरीं नाम तुझें २ नाम तें अंजन नामें बोधे मन । नामेंचि निधान चांगया झाला ३ मार्गीं जातां तुम्हीं उगेंचि नसावें । वाचेसीं म्हणावें रामकृष्ण ४ राम कृष्ण हरि मुकुंद मुरारी । केशव नरहरी नारायण ५ ऐसा हा सतत आठव नामाचा । नामा म्हणे कैंचा दोष तया ॥ ६ ॥

२०२ तुटे मायाजाळ विघडे भवसिंधु । जरी लागे छंदु हरिनामाचा १ येर कर्मधर्म करितां या कळीं । माजीं कोण बळी तरला सांगा २ न पढवे वेद नव्हे शास्त्र बोध । नामाचे प्रबंध पाठ करा ३ नव्हे अनुष्ठान न कळे ब्रह्मज्ञान । करावी सोपान कृष्ण कथा ४ न साधे हा योग न करवे

वैराग्य । साधा भक्तिभाग्य संतसंगें ५ नामा म्हणे साधन न लगे आणिक दिधली मज भाक पांडुरंगें ॥ ६ ॥

२०३ भवाब्धितारक रामकृष्ण नाव । रोहिणीची माव सकळ दिसे १ नाम हेंचि थोर नाम हेंचि थोर । वैकुंठीं बिढार रामनामें २ राम हें निर्वाणीं जपतांचि अढळ । वैकुंठ तत्काळ तया जीवा ३ नामा म्हणे वैकुंठ नामेंचि जोडेल । अंतीं तुज पावेल नाम एक ॥ ४ ॥

२०४ सुखाचा सोहळा वाटतसे जीवा । भेटणें केशवालागी आजी १ पाउलापाउलीं ययाचिया वाटे । पताकांचे थाट दिसताती २ पैल तो कळस पाहें पां साजणी । नामघोष कानीं पडतसे ३ नामा म्हणे नामीं पारणें जो करी । तयांसी श्रीहरी उपेक्षीना ॥ ४ ॥

२०५ व्रत तप दान हवन पूजन । न चले साधन नाम म्हणतां १ रामकृष्ण हरी मुकुंदा मुरारी । जिव्हे क्षणभरीं न विसंबे २ कळिकाळ दारुण करीतसे विघ्न । परजीं नारायण नाम जिव्हे ३ शरण आलों जिव्हे तुवां नुपेक्षावें । नामा म्हणे गावें हरिनाम ॥ ४ ॥

२०६ आणीक ही मंत्र मोक्षदानी खरे । अशौचाचा थार असूं नये १ नाममंत्र कांहीं बाधीना कोणासी । जया अहर्निशीं रामकृष्ण २ तपाची मांडणी आकाशाचें खेंव । इंद्रियांची हांव राहे तरी ३ यज्ञ तो आचार धनाचें सांकडें । तरी जाण द्वाड स्वर्गसुख ४ नामा म्हणे नाम साधकाची माता । जैसें तैसें घेतां भक्ति जोडे ॥ ५ ॥

२०७ तीर्थ तपराशी जप हृषिकेशी । नाम अहर्निशीं रामराम १ तीर्थांचें पै तीर्थ नाम हें समर्थ । होईल कृतार्थ रामनामें २ साधेल साधन तुटेल बंधन । वाचे जनार्दन सुफळ सदा ३ नामा म्हणे हरी उच्चार तूं करी । उद्धरसी निर्धारीं इहलोकीं ॥ ४ ॥

२०८ तप तीर्थ दान हें सर्व कुवाडे । नाम एक वाड केशवाचें १ मुमुक्षु साधकीं सदा नाम गावें । तेणेंचि या व्हावें अखंडित २ विपत्तीचें बळें न होतां विन्मुख । नाममात्र एक धरा वाचे ३ जीवन्मुक्त शुक मुनि ध्रुवादिक । तयासी आणिक ध्यास नाहीं ४ नामयाची वाणी अमृताची खाणी । घ्यावी आतां धणी सर्वत्रांही ॥ ५ ॥

२०९ पवित्र परिकर नाम हा उच्चार । उद्धरण साचार जगा यया १ गोविंद केशव उच्चारी श्रीराम । न लगती नेम असूप जप २ तें हें विठ्ठल रूप पिकलें पंढरीं । नाम चराचरीं विठ्ठल ऐसें ३ नामा म्हणे विठ्ठल सर्वांत सखोल । उच्चारितां मोल नलगे तुज ॥ ४ ॥

२१० हडबंडली पातकें । घेतां रामनाम एक १ नाम घेतां तत्क्षणीं । चित्रगुप्तें सांडिली लेखणी २ घेऊनि पूजेचा संभार । ब्रह्मा येतसे समोर ३ नामा म्हणे जरी ये लटकें । तरी माझें छेदावें मस्तक ॥ ४ ॥

२११ हरिनाम गातां पवित्र । सेविती हरिहर ब्रह्मादिक १ नाम तारी नाम साहाकारी । नामें उच्चारीं रूपें तुझीं २ ऐसीं अनंत नामें तुझीं न वर्णवती देवा । नामा म्हणे केशवा विनवीतसे ॥ ३ ॥

२१२ जप तप अनुष्ठान हरी । एकचि तो नमस्कारी । भूतद्वेष कदा न करी । तप सामुग्री हेचि तुझी १ हरी माधव यादवा । कृष्णा गोविंदा केशवा । येणें करोनियां जीवा । सर्व काळ रंजवी २ स्मरता हरीचें नाम । पळोमी जाति काळ यम । तुटती नाना योनि जन्म । गर्भवासा मग नये ३ नामा जपे नामावळी । अखंड तप हेंचि सदा काळीं । हरीनामें पिटोनि टाळी । हाचि तरणोपाय सकळांचा ॥ ४ ॥

२१३ हाचि नेम सारी साधेल तो हरि । नाम हे मुरारी अच्युताचें १ गोविंद गोविंद श्रीहरे मुरारे । यादव मोहरे रामनामें २ न लगती कथा नानाविध वार्ता । नामचि स्मरतां राघवाचें ३ नामा म्हणे राम आम्हां हाचि नेम । नित्य तो सप्रेम जप आम्हां ॥ ४ ॥

२१४ असत्याचे मळ बैसलेया वाचें । ते न फिटती साचें तीर्थोदकें १ हरीनामामृतें प्रक्षाळी जिव्हेतें । पाणिये बहुतें काय करितीं ॥ २ ॥ गंगा-सागरादी तीर्थें कोटीवरीं । हरिनामाची सरी न पवतीं ३ हरिनाम गंगे सुस्नात पैं झाला । नाम्याजवळीं आला केशिराज ॥ ४ ॥

२१५ सद्गुरुवांचूनि नाम नये हातां । साधन साधितां कोटीगुणें १ जैसा कांतेविण करणें संसार । तैसा हा व्यापार साधनाचा २ जंव सद्गुरु नाहीं केला भ्रतार । साधन विचार व्यर्थ गेला ३ नामदेव म्हणे सद्गुरुपासोनी । नाम घ्या जाणोनी नाना कांहीं ॥ ४ ॥

२१६ शेतीं बीज नेतां थोडें । मोटे आणिताती गाडे १ एक्या नामें हरि जोडे । फिटें जन्मांचें सांकडें २ बाळें भोळी जनें । सर्व तरती कीर्तनें ३ नामा म्हणे नेणति मूढें । नाम स्मरावें सावडें ॥ ४ ॥

२१७ चिंतातुर देहीं न साहे काजळी । मनाची पाजळी उभयदिवीं १ प्रकाश पडेल ब्रह्म हें दिसेल । वैकुंठ जोडेल भजनभक्तीं २ नाहीं याती वर्ण नाहीं वेद उक्ती । नामेंचि संतृप्ति होती जीव ३ नामा म्हणे नाम हेंचि बीजसार । तुटेल येरझार भवबंधाची ॥ ४ ॥

२१८ साधनांत सोपें नाम हें केवळ । यावीण सकळ सीण वायां १ धरारे धरा रे नाम विठोबाचें । तेणें अज्ञानाचें मूळ नासे २ नामें तारीले अपार पुराणीं वर्णिले । नामचि केवळ आत्मसत्ता । नामा म्हणे नामीं रंगला सुरंग । अंगें स्वयंमेव पांडुरंग ॥ ४ ॥

२१९ नामें सदां शुद्धि प्राणिया होतसे । नामापाशीं असे भुक्ति मुक्ति १ नामा ऐसें सोपें नाहीं त्रिभुवनीं । नाम संजीवनी साधकांसी २ नामें भक्ति जोडे नामें कीर्ति वाढे । नामें सदा चढे मोक्ष हातां ३ यज्ञ दान तप नामें आलीं हातां । नामें सर्व सत्ता प्राप्त होय ४ नामा म्हणे सदा नाम ज्याचें मुखीं । नाहीं याच्या तुकीं दुजा कोणीं ॥ ५ ॥

२२० भक्ति करूनियां कोण वायां गेलां । सांगा हो विठ्ठला निवडूनी १ द्वापाराचे अंतीं नामची सुकृत । अद्यापि निश्चित चालतसे २ नाम ऐकतां तरती निर्धारीं । व्याख्यान श्रीधरी टीकाकार ३ नामा म्हणे राम नाहीं त्रिभुवनीं । नाम तें निधानीं कलियुगीं ॥ ४ ॥

२२१ मायेचे भूत्रर रजतम सात्विक । रामनाम एक सोडवण १ राम हेंचि स्नान राम हेंचि ध्यान । नामें घडे यज्ञ कोटी देखा २ न लगती साधनें नाना मंत्र विवेक । रामनामीं मुख रंगीं कां रे ३ नामा म्हणे श्रीराम हेंचि वचन आम्हां । नित्य ते पौर्णिमा सोळा कळी ॥ ४ ॥

२२२ सर्वांभूतीं हरि आहे हेंचि साचें । मायाजाळ कैसें भाविकांसी १ सर्व ब्रह्म ऐसें वेद बोले गाढा । ब्रह्मीचा पवाडा अगम्य तो २ जाणतां नेणतां हरिनाम उच्चार । मार्ग तो साचार सुफल सदा ३ नामा म्हणे कारण जिव्हा होय स्मरण । सर्व नारायण हरी दिसे ॥ ४ ॥

२२३ एकांत एकला सर्व आहे हरी । ऐसेंचि अहर्निशीं ध्याइजे तूं १ सर्वांभूतीं विठ्ठल आहे साचे । हें तंव वेदींचें वचन जाण २ मार्ग हाचि सोपा गेले मुनिजन । जनीं जनार्दन हाचि भावो ३ नामा म्हणे नाम प्रेम उच्चारण । सर्व ही कारण होईल तुझें ॥ ४ ॥

२२४ नामंचि हें आहे पंचतत्वां ठाव । नाहीं दुजा भाव देखावया १ देखणारा जाहाली कर्पुराची वाती । नामाग्नि विश्रांति ठाई जाहाली २ द्वैताद्वैत तेथें नेणें जाणपण । गेलें हारपोन नामें सर्व ३ नामदेव म्हणें अनाम तें नाम । नाना नाम भ्रम तेथें दुजा ॥ ४ ॥

२२५ नांदतसें नाम आकाश पाताळीं । सर्व भूमंडळीं घनदाट १ पाताळ फोडोनि किती आहे पुड । नाहीं अंत वाड नभवरीं २ चौऱ्यांसी

भोगिती दुर्मति पामर। नाहीं सारासार जाणत ते ३ नामदेव म्हणे नाम अविनाश। तेथें नाना वेष नाम सर्व ॥ ४ ॥

२२७ करीं घेऊनि ब्रह्मविणा। नारद बोळगे नारायणा १ हेंचि हेंचि तत्वसार। नाम म्हणे निरंतर २ आपण शिव आणि शक्ति। राम नाम ते जपती ३ गात नाचत प्रल्हाद वीर। खांबीं केलासे अवतार ४ कुंटिणी पक्षिया म्हणे रामा। तिसी नेलें निजधामा ५ अहल्येसी लागतां चरण। तिसीं आलें मनुष्यपण ६ अजामेळ पातकी अपार। नामें पावला पैल पार ७ केलें गजेंद्रे स्मरण। त्याचें तोडीलें बंधन ८ द्रौपदी स्मरे हृषिकेशी। वस्त्रें पुरविलीं तियेसीं ९ परिक्षितीसीं घडलें स्मरण। त्यासी झाले सुलभ चरण १० नामा म्हणे निरंतरु। गगनीं अढळ केला धुरु ॥ ११ ॥

२२७ अग्नी जाळी तरी न जळती पांडव। हृदयीं माधव म्हणोनिया १ अग्नी जाळी तरी न जळती गोपाळ। हृदयीं देवकी बाळ म्हणोनिया २ अग्नी जाळी तरी न जळे हनुमंत। हृदयीं सीताकांत म्हणोनियां ४ अग्नी जाळी तरी न जळे प्रल्हाद। हृदयीं गोविंद म्हणोनिया ५ अग्नी जाळी तरी न जळे पै सीता। हृदयीं रघुनाथ म्हणोनिया ६ लंकेसी उरलें बिभीषणाचें घर। हृदयीं सीतावर म्हणोनियां ७ नामा म्हणे तुम्ही स्मरावें गोविंदा। चुके भवबाधा संसाराची ॥ ८ ॥

२२८ जीव शिव ग्रामीं मीतूंपण पाहीं। हा गौरव कांहीं नाहीं नामीं १ नाहीं चतुर देह तूर्या हे उन्मनी। स्वयंभु ते खाणी निजनामाची २ नामीं जडे चित्त तेथें काय उणें। लज्जित साधनें नाना जाहलीं ३ नामा म्हणे नामीं मीतूंपण। नाहीं कांहीं आन सर्व तेंची ॥ ४ ॥

२२९ कांसवीचे दृष्टी जैं होईजे भेटी। तैं अमृताची वृष्टी घडे त्यासी १ तैसें हें भजन श्रीरामाचें ध्यान। वाचे नारायण अमृतमय २ धन्य त्याचे कुळ सदा पैं सफळ। दिननिशीं पळ राम नाम ३ नामा म्हणे चोखटु भक्त तो उत्तमु। वाचेसी सुगमु रामनाम ॥ ४ ॥

२३० गोविंद गोपाळ वाचेसी निखळ। तो उद्धरे तात्काळ कळीमाजीं १ नारायण नारायण हेंचि पारायण। तो उद्धरेल जन इहलोकीं २ तुटती यातना कर्मांच्या भावना। जीवा उद्धरणा नाम स्मरा ३ नामा म्हणे राम हा जप परम। न लगती नेम नाना मतें ॥ ४ ॥

२३१ सोयरा सुखाचा विसांवा भक्तांचा। विठोबा निजाचा मायबाप १ कृपाळू दीनाचा पडिभर नामाचा। तोडर ब्रीदाचा साच तया २ काया मनें वाचा संग करा त्याचा। अनंत जन्माचा हरेल शीण ३ नामा म्हणे आम्हां दीनांचें माहेर। हरी निरंतर न विसंबे ॥ ४ ॥

२३२ देव दयानिधि भक्तांचा कैवारी । नाममात्रें तारीं सर्वांलागीं १ तया देवराया गावें हो आवडी । लागे मनीं गोडी सर्वकाळ २ नाहीं यातिकूळ उंच नीच भेद । भाव एक शुद्ध पहातसे ३ नामा म्हणे काय सांगावें नवल । अखंड दंडलें व्योमाकार ॥ ४ ॥

२३३ रुपासीं रूपस नाम हृषिकेश । पंढरी निवास जप करी १ विठ्ठल श्रीहरी मुकुंद श्रीहरी । नामेंचि बोहरीं प्रपंचाची २ विठ्ठल नामामृत हेंचि जीवन हेत । नाम हें मुखांत केशवाचे ३ नामा म्हणे देव अमृताचा लाटा । मुखामाजीं पैठा होत नामें ॥ ४ ॥

२३४ अनंत जन्मेंसि मिळाले दुर्लभ । तो प्राणवल्लभ शंकराचा १ वेदशास्त्र मंथुनी काढियेलें सार । ब्रह्मादिकां पार रामनामें २ स्वर्गिचे देव चिंतिती मानसीं । भेटी आम्हां कैसी पांडुरंगी ३ नामा म्हणे केशवाचें नाम उच्चारितां । विघ्नासी भंगितां नवल काय ॥ ४ ॥

२३५ ज्ञान व्हावें आधीं ओळखावें नांवा । मज जावें गांवा तयाचिया १ या नामाचें मूळ त्यामाजी जो धाला । प्रपंचाचा घाला मग नाहीं २ नाम गावें प्रपंच सर्व आहे नाम । ब्रह्मानंदें प्रेम घनदाट ३ नामदेव म्हणे नंदाचिया घरीं । होता एक हरी दुजें नाम ॥ ४ ॥

२३६ हरिविण देह मळीण सर्वथा । मंगळाची कथा रामकृष्ण १ कथा करी कोणी ऐकती जे जन । वैकुंठभुवन हातां आलें २ वेदशास्त्रां सार नामाचा उच्चार । अंतीं पैल पार पाववितो ३ जन्मोनियां जगीं अलिप्त असावें । नाम तें स्मरावें म्हणे नामा ॥ ४ ॥

२३७ दृग्धही होतसे आलें जें आकारा । असोनि निर्धारा नाम नाहीं १ नाम अनुभवें प्रपंचचि ब्रह्म । जाहला सर्वोत्तम संतकृपें २ म्हणोनिया संता जाऊनि शरण । साधावें निधान नामब्रह्म ३ नामदेव म्हणे संताचिया कृपें । माजी नाम सोपें नांदतसे ॥ ४ ॥

२३८ गोक्षीर लाविलें अंधळिया मुखीं । तेथील पारखी जिव्हा जाणे १ तैसें देवा तुझें नाम निरंतर । जिव्हेसी पाझर अमृताचे २ सोलूनिया केळ साखरें घोळिलें । अंधारीं खादलें तरी गोड ३ द्राक्ष फळा घड सेवितां चोखड । तयाहूनि गोड नाम तुझें ४ आळूनिया क्षीर तुपाचिया आळें । कालविलें गुळें गोड जैसें ५ जाणोनियां नामा करी विनवणी । अमृताची खाणी नाम तुझें ॥ ६ ॥

२३९ ज्ञान ध्यान जप तप साधन । तें नाम प्रत्ययातें नये कोणा १

गुरुपदीं जावें आधीं हो शरण। मी हें माझें ओळखून घ्यावें नाम २ तें मूळ पाहोनिया त्यातें। मिळवावे द्वैत अद्वैतीते ३ तयाचें द्वैत द्वैतातीत स्वयंभू संचलें। तेचि नाम आलें त्रिभुवनीं ४ नामदेव म्हणे परब्रह्म तें नाम। द्वैत क्रियाकर्म नाहीं तेथें ॥ ५ ॥

२४० अनंत ब्रह्मांडें व्यापक तें नाम। अनादि निष्काम विश्वंभर १ तोचि कृष्ण परब्रह्म द्वारकेसी। पांडवां मानसीं ठसावला २ ठसावला तोचि पाहावा अनुभव। पांचा लागीं ठाव मग कैंचा ३ नामदेव म्हणे संपूर्ण आघवा। नामाचिया गांवां सीव नाहीं ॥ ४ ॥

२४१ शिव हलाहलें तापला। तोहि नामें शीतळ झाला १ नाम पावन पावन। याहूनि पवित्र आहे कोण २ नाम सर्वांसी आधार। केला कळिकाळ किंकर ३ मरण झालें काशीपुरीं। तेथें नामचि उद्धरी ४ अठरा पुराणांची पोथी। नामाविण नाहीं रीती ५ नामा म्हणे अवघीं चोरें। एक हरिनाम सोइरें ॥ ६ ॥

२४२ तूं तंव नेणता परी हरि जाणता। आहे तो समता सर्वांभूतीं १ सर्व ब्रह्म हरी येकचि निर्धारी। होसील झडकरी ब्रह्म तूंचि २ अच्युत माधव अमृताच्या पाठें। लागतांची वाटे वंदी यम ३ नामा म्हणे होसील जिवलग विष्णूचा। दास त्या हरीचा अंतरंगु ॥ ४ ॥

२४३ म्हणे दीनबंधु तुम्ही सावध व्हावें। संतांशीं नमन नाम घाचे वदावें १ नामापरतें साधन नाहीं या कलियुगांत। व्यर्थ श्रम होती पाहतां आणीक मत २ मताभिमान धरोनी तुम्ही जाल आडवाटां। अभिमानें ठकविलें नारदादि श्रेष्ठां ३ आलिया जन्मास आतां न करीं आळस। नामदेवालागीं सांगे जगन्निवास ॥ ४ ॥

२४४ देवाचें हें गुज सकळ मंत्रमय। जें कां निज ध्येय शंकराचें १ तें हें रामनाम सेवितां सर्वभावें। रामरूप व्हावें निश्चयेंसी २ नग्न अजामेळाचें पतितत्व गेलें। दिव्य रूप झाले वाल्मिकाचें ३ शरीर संपत्ति बळीनें देऊनि सकळ। केला द्वारपाळ नारायण ॥ ४ ॥ कृष्णाविण दुजें नेणती कायावाचा। झाला पांडवांचा साहाकारी ५ नामा म्हणे केशव भावाचा लंपट। भक्तांसी निकट रातलासे ॥ ६ ॥

२४५ कां करिसी सोय मायेचा असोस। नव्हे तुज सौरस नामेंविण १ नामचि हा मंत्र नामचि हो तंत्र। नामेंविण पवित्र न होसी देखा २ तिहीं लोकीं पाहतां नामेंविण सर्वथा। अच्युत म्हणतां पुण्य कोटी ३ नामा म्हणे ब्रह्म आदि अंतीं नेम। ते विटेवरी सम उभें असे ॥ ४ ॥

२४६ कृष्णकथा सांग जेणें फिटे पांग। न लगे तुज उद्वेग करणें कांहीं १ समर्थ सोईरा राम हा निधान। जनीं जनार्दन एक ध्याई २ नाम हेंचि सार नाम हेंचि सार। तराल निर्धार श्रुति सांगे ३ नामा म्हणे उच्चार रामकृष्ण सार। तुटेल येरझार भवाब्धीची ॥ ३ ॥

२४७ सर्वांभूतीं भज नमन करीं संतां। नित्य त्या अच्युता स्मरण करीं १ ऐसें भजनीं विनट सांपडेल वाट। रामकृष्ण नीट वैकुंठींची २ न लगती साधनें वायांचि बंधनें। एका नामें होणें चतुर्भुज ३ नामा म्हणे थोर नामेंचि सधर। वैकुंठी बिढार तया भक्तां ॥ ४ ॥

२४८ भजन करारे हरिहरा। नारायण शिवशंकरा। माझें बोलणें अवधारा। भेद न करा दोघांचा १ तुम्हांसी सांगेन सत्य वृत्तांत। पाहें पा तेथींचा दृष्टांत। नारायणें सेविलें अमृत। श्वेत झाला महादेव २ शंभूनें गिळिलें हलहला। म्हणोनि विष्णु झाला निळा। देखत देखत आंधळा। झणीं होसी गव्हारा ३ लक्ष्मी रूपें आपण हरू। देवें धरिला शारंगधरू। गरूड-रूपें महेश्वरू। वाहन झाला विष्णुचें ४ शक्तिरूपें शारंगपाणी। नारायण झाला भवानी। शारंगधर नंदी होऊनि। सन्मुखारुनीं बैसला ५ एक तो एका वेगळा नाहीं। दृष्टांत तूं आगमीं पाहीं। नामा म्हणे एक केशव ध्यायीं। हरिहर पाहीं ज्याचे अवतार ॥ ६ ॥

२४९ आकारिक नाम जीवानें ठेविलें। शिवानें तें केलें निर्विकल्प १ जीवशिव दोन्ही विराले ज्यामाजीं। तें नाम सहजीं आद्य आहे २ तया नामाविण जावयासीं ठाव। नाहीं दुजा भाव तिळभरी ३ नामदेव म्हणे नाम घनदाट। प्रपंच निघोंट नानापरी ॥ ४ ॥

२५० आपुली पदवी सेवकासी द्यावी। तो एक गोसावी पांडुरंग १ भावाचा आळुका भुलला भक्तिसुखा। सांपडला फुका नामासाटीं २ प्रेमाचा जिव्हाळा नामाची आवडी। क्षण एक न सोडी संग त्याचा ३ नामा म्हणे आम्हां दीनांचें माहेर। तो एक उदार पांडुरंग ॥ ४ ॥

२५१ विठ्ठल नामीं आळस न करी गव्हारा। वांयांचि यरझारा शिणतासी १ हरी उच्चारण करी हा विचार। नामेंचि साचार उद्धरण २ मी म्हणतां अहंता वाढे हे सर्वथा। परी भजना परता नाहीं मार्ग ३ मायाजाळ विषय तोडी तोडी सांठा। विठ्ठल नाम पाठा बोळगे जना ४ सर्व हें लटिकें मोहजाळ फिकें। नामेंविण एक नाहीं दुजें ५ नामा म्हणे उपदेश भजे केशवास। वैकुंठ निवास बोळगे तुज ॥ ६ ॥

२५२ अवघे ते दैवाचे विठ्ठल म्हणती वाचे। अवघें कुळ त्याचे पुण्य-

वंत १ अवघेचिं संसारी जाणावे ते धन्य । ज्यांचें प्रेम पूर्ण पांडुरंगीं २ अवघा विठ्ठल भोगिती दिनराती । वोळगे किंकरवृत्ती नामा त्यांतें ॥ ३ ॥

२५३ आम्ही विठोबाचे दूत । यम आणूं शरणांगत १ मुखें नाम हातीं टाळी । महा पापा करूं होळी २ करूं हरिनामाचा घोष । कुंभपाक पाडूं वोस ३ करूं कथा कीर्तन । तोडूं यमाचें बंधन ४ एवढा प्रताप नामाचा । रीघ नोहे कळिकाळाचा ५ ऐसा नामा यशवंत । विठोबाचा शरणांगत ॥ ६ ॥

२५४ ब्राह्मण व शूद्र वैश्य नारीनर । सर्वांसी आधार नाम सत्य १ नामाविण गति नाहीं हो आणिक । वैकुंठनायक बोले मुखें २ षरी तेंचि नाम पहावें शोधुनी । चौऱ्यांशीची खाणी तेव्हां चुके ३ नामा म्हणे आतां सद्गुरु वंदुनी । नाम घ्या शोधूनि सत्य मुक्त ॥ ४ ॥

२५५ ब्राह्मणा न कळे आपुलें तें वर्म । गवसे परब्रह्म नामें एका १ लहान थोरांसी करितों प्रार्थना । दृढ नारायणा मनीं धरा २ सर्वांप्रति माझी हेचि पै विनंती । आठवा श्रीपती आपुले मनीं ३ केशव नारायण करावें आचमन । तेचीं संध्यास्नान कर्म तया ४ नामा म्हणे हेचि करा नित्य भजन । ब्रह्मार्पण साधन याचे पायीं ॥ २ ॥

२५६ गीता हेचि गंगा गुह्यभाव पैं गा । नाम हेंचि जगा सोडवण १ सर्व ब्रह्म हरी सांगतसे मुरारी । विश्वरूप श्रीहरी आपण झाला २ उपदेश अर्जुना जनीं जनार्दना । अखंड भावना भूतदया ३ नामा म्हणे सर्व आहे हाचि देव । उदार माधव सर्वांभूतीं ॥ ४ ॥

## श्रीजनाबाई

२५७ गातां विठोबाची कीर्ती । महा पातकें जळती १ सर्व सुखाचा आगर । उभा असे विटेवर २ आठवितां पाय त्याचे । मग तुम्हा भय कैचें ३ काया वाचा मनें भाव । जनी म्हणे गावा देव ॥ ४ ॥

२५८ एक नाम अवघें सार । वरकड अवघें तें असार १ म्हणोनियां परतें करा । आधीं विठ्ठल हें स्मरा २ जनी देवाधिदेव । एक विठ्ठल पंढरीराव ॥ ३ ॥

२५९ काय हें करावें । धनवंतादि आघवे १ तुझें नाम नाहीं जेथें । नको माझी आस तेथें २ तुजविण बोल न मानी । करी ऐसें म्हणे जनी ॥ ३ ॥

२६० नाम विठोबाचें घ्यावें । मग पाउल टाकावें १ नाम तारक हें

थोर। नामे तारिले अपार २ आजामेळ उद्धरिला। चोखा मेळा मुक्तीस नेला ३ नाम दळणीं कांडणीं। म्हणे नामयाची जनी ॥ ४ ॥

२६१ नाम विठोबाचें थोर। तरला कोळी आणि कुंभार १ ऐसी नामाची आवडी। तुटे संसाराची बेडी २ नाम गाय वेळोवेळां। दासी जनीस नित्य चाळा ॥ ३ ॥

२६२ हरिहर ब्रह्मादिक। नामें तरले तिन्हीं लोक १ ऐसा कथेचा महिमा। झाली बोलायाची सीमा २ जपें तपें लाजविलीं। तीर्थें शरणागत आलीं ३ नामदेवाचे कीर्तनीं। ध्वजा आल्या स्वर्गाहुनी ४ वेद श्रुती देती ग्वाही। जनी म्हणे सांगू कायी ॥ ५ ॥

२६३ तो हा भक्तांचे तोडरीं। वाचे उच्चारितां हरी १ काम होऊनि निष्काम। काम भावभक्ति प्रेम २ तो हा पूर्ण काम होय। अखंडित नाम गाय ३ काम निष्काम झाला मनीं। वंदी नाचे दासी जनी ॥ ४ ॥

२६४ जन्मा येऊनियां देख। करा देहाचें सार्थक १ वाचे नाम विठ्ठलाचें। तेणें सार्थक देहाचें २ ऐसा नामाचा महिमा। शेषा वर्णितां झाली सीमा ३ नाम तारक त्रिभुवनीं। म्हणे नामयाची जनी ॥ ४ ॥

२६५ नाम फुकट चोखट। नाम घेतां नये वीट १ जड शिळा ज्या सागरीं। आत्मारामें नामें तारी २ पुत्रभावें स्मरण केलें। तया वैकुंठासीं नेलें ३ नाममहिमा जनी जाणे। ध्यातां विठ्ठलचि होणें ॥ ४ ॥

२६६ विठ्ठल नामाची नाहीं गोडी। काळ हाणोनि तोंड फोडी १ गळां बांधोनि खांबासी। विंचू लाविती जिव्हेसी २ ऐसा अभिमानी मेला। नर्क कुंडीं थारा त्याला ३ नामा बोध करी मना। दासी जनी लागे चरणा ॥ ४ ॥

२६७ निराकारीचें नाणें। शुद्ध ब्रह्मीचें ठेवणें १ प्रयत्नें काढिलें बाहेरी। संत साधु सवदागरीं २ व्यास वसिष्ठ नारद मुनी। टांकसाळ घातली त्यांनीं ३ उद्धव अक्रुर स्वछंदीं। त्यांनीं आटविली चांदी ४ केशव नामयाचा शिक्का। हारप चाले तिन्ही लोकां ॥ ५ ॥ पारख नामयाची जनी। वरती विठोबाची निशाणी ॥ ६ ॥

## श्रीभानुदासमहाराज

२६८ जपतां नाम विठ्ठलाचें। भय नाहीं हो काळाचें १ नाममंत्र त्रिअक्षर। करी सदा तो उच्चार २ विठ्ठल नामें सुख आनंद। भानुदासा परमानंद ॥ ३ ॥

२६९ नामाचा महिमा शुक सांगे। परीक्षिती राजा जाणे अंगें १ जपतांचि रामकृष्ण नामें। दहन होती कर्माकर्मे २ नामें दया शांति क्षमा। नामें शीतळ-शंकर उभा ३ नाम जप ध्यानीं मनीं। भानुदास वंदितो चरणीं ॥ ४ ॥

२७० तारक नाम सोपें साचें। विठ्ठल विठ्ठल वदतां वाचे १ जन्म मृत्यूचें खंडन। पापा तापाचें दहन २ नामें निजध्यास देखा। भानुदासा सुखें सुखा ॥ ३ ॥

२७१ एक नामापरतें साधन। नाहीं नाहीं दुजें आन १ वांयां धावती बराडी। करती संसाराची जोडी २ न चुके जन्ममरण वेरझारा। हें तो नकळे पामरा ३ नामावांचुनी जें जें कर्म। अवघा जाणा तो अधर्म ४ भानुदास प्रेमें नाचे। सदा नामघोष वाचे ॥ ५ ॥

२७२ चार युगांमाजीं पावन। कलिमाजी सोपें भजन १ मना दृढ करुनि साचा। विठ्ठल विठ्ठल वदे वाचा २ संकल्प नको भिन्न। तेणें पावे हरिचरण ३ नामें जिवींचा जिव्हाळा। भानुदासा जीवनकळा ॥ ४ ॥

२७३ तुमचें नाम गोड नाम गोड। पुरवी कोड जीवाचें १ वाचे सुलभ नामावळी। महा दोषां होय होळी २ सुख अनुपम्य गातां नाम। भानुदास म्हणे आम्हा विश्राम ॥ ३ ॥

२७४ कल्पना अविद्या सांडोनियां गोडी। रामनाम जोडी करी बापा १ येर ते मायीक नको पडूं छंदा। आठवी गोविंदा एकपणें २ द्वैताचि ते वाढी छेदूनियां काढी। नामाची तूं गुढी उभवी सदा ३ भानुदास म्हणे सांडोनि कल्पना। चिंती तूं चरणा विठोबाच्या ॥ ४ ॥

## श्रीएकनाथमहाराज

२७५ ऐका नामाचें महिमान। नाम पावन तें जाण १ हास्य विनोदें घेतां नाम। तरती जन ते अधम २ एकाजनार्दनीं धरीं विश्वास। नामें नासती दोष कळिकाळाचे ॥ ३ ॥

२७६ नामाचें महिमान सादर ऐका। तारियेले देखा महा पापी १ पापाची ते राशी अजामेळ जाण। जपतांचि पावन नामें जाहला २ गणिका पांखिरूं नाम जपे सदा। नोहे तिसी बाधा गर्भवासा ३ एकाजनार्दनीं कलीमाजी नाम। उत्तम उत्तम जपा आधीं ॥ ४ ॥

२७७ दोषी पापराशी नामाचे धारक। होतां तिन्ही लोक वंदिती

माथां १ नामाचें महिमान नामाचें महिमान । नामाचें महिमान शिव जाणे २ जाणती ते ज्ञानी दत्त कपिल मुनी । शुकादिक जनीं धन्य जाहले ३ एका जनार्दनीं नाम परिपूर्ण । सांपडली खूण गुरुकृपें ॥ ४ ॥

२७८ जगासी तारक हरि हा उच्चार । सर्व वेरझार खुंटे जेणें १ पाहतां ब्रह्मांडीं व्यापक तो हरी । सबाह्य अभ्यंतरीं भरलासे २ एकाजनार्दनीं रिता ठाव कोठें । पुंडलिक पेठे उभा नीट ॥ ३ ॥

२७९ नाम तारक ये मेदिनीं । नाम सर्वांचें मुगुटमणी । नाम जपे शूळपाणी । अहोरात्र सर्वदा १ तें हें सुलभ सोपारें । काम क्रोध येणें सरे । मोह मद मत्सर नुरे । नाममात्रें त्रिजगतीं २ घेउनी नामाचें अमृत । एकाजनार्दनीं झाला तृप्त । म्हणोनी सर्वांतें सांगत । नाम वाचे वदावें ॥ ३ ॥

२८० नाम तारक हें क्षितीं । तरले आणि पुढें तरती १ न लगे साधन मंडण । नामें सर्व पाप दहन २ योगयागांची परवडी । नामापुढें वांयां गोडी ३ नाम वाचे आवडी धोका । म्हणे जनार्दन एका ॥ ४ ॥

२८१ नाम पावन पावन । नाम दोषांसि दहन । नाम पतित पावन । कलीमाजी उद्धार १ गातां नित्य हरीकथा । पावन होय श्रोता वक्ता । नाम गाऊनि टाळी वाहतां । नित्यमुक्त प्राणी तो २ एका जनार्दनीं नाम । भवसिंधु तारक नाम । सोपें सुगम वर्म । भाविकांसी निर्धारें ॥ ३ ॥

२८२ येणेंचि नामें तारिलें बहुतां । दोषी तो पुरता अजामेळ १ गणिका आणि वाल्हा अजामेळ भिल्लणी । गोपाळ गौळणी तारियेल्या २ गजेंद्र तो पशु नाडिता जळचरें । धांवे देव त्वरें ब्रीदासाठीं ३ प्रल्हादा संकट पडतां निवारी । चोखियाचें करी बाळंतपण ४ दामाजीचा महार होऊनिया ठेला । उणेंपण त्याला येवों नेदी ५ एकाजनार्दनीं भक्तांचा अंकित । उभाचि तिष्ठत विटेवरी ॥ ६ ॥

२८३ नाम पावन तिहीं लोकीं । मुक्त जहाले महापातकी १ नाम श्रेष्ठांचें हें श्रेष्ठ । नाम जपे तो वरिष्ठ २ नाम जपे नीळकंठ । वंदिताती श्रेष्ठ श्रेष्ठ ३ नाम जपे हनुमंत । तेणें अंगीं शक्तिवंत ४ नाम जपे पुंडलीक । उभा वैकुंठ नायक ५ नाम ध्यांनीं मनीं देखा । जपे जनार्दनीं एका ॥ ६ ॥

२८४ नाम गाये तो पवित्र क्षितीं । नामें उद्धार त्रिजगतीं १ ज्याचें उच्चारितां नाम । निवारे क्रोध आणि काम २ वेदशास्त्री विवेकी संपन्न । नामें होताती पावन ३ नामें उत्तम अधमा गती । एकाजनार्दनीं ध्याये चित्तीं ॥ ४ ॥

२८५ हरिनामें तरले । पशुपक्षी उद्धरले १ ऐशी व्याख्या वेदशास्त्रीं ।

८४८ शिकल्या शब्दाचें उत्पादितों ज्ञान। दर्पणींचें धन उपर घायां १ अनुभव कई होईन भोगितां। स्वांकडें तें आतां हेंचि आलें २ गायें नाचें करीं शरीराचे धर्म। बीजनाम वर्म तुझें दान ३ तुका म्हणे केला उशीर न साहे। घाल तरी आहे सर्व सिद्ध ॥ ४ ॥

८४९ नित्य मनासी करितों विचार। तों हें अनावर विषयलोभी १ आतां मज राखें आपुलिया बळें। न देखें हें जाळें उगवतां २ सांपडला गळीं नाहीं त्याची सत्ता। उगळीं मागुता घेतला तो ३ तुका म्हणे मी तों अज्ञानचि आहे। परि तुझी पाहें वास देवा ॥ ४ ॥

८५० काय पुण्य ऐसें आहे मजपाशीं। तांतडी धांवसी पांडुरंगा १ काय ऐसा भक्त घायां गेलों थोर। तूं मज समोर होसी वेगां २ काय नष्ट माझी देखिली चाकरी। तो तूं झडकरी पाचारिशी ३ कोण मी नांवाचा थोर गेलो मोठा। अपराधी करंटा नारायणा ४ तुका म्हणे नाहीं ठाऊकें संचित। येणें जन्में हित नाहीं केलें ॥ ५ ॥

८५१ उदार तूं हरी। ऐसी कीर्ति चराचरीं। अनंत हे थोरी। गर्जताती पवाडे १ तुझे पायीं माझा भाव। पुसी जन्ममरण ठाव। देवाचा तूं देव। स्वामी सकळां ब्रम्हांडां २ मागणें तें तुज मागों। जीवभाव तुज सांगों। लागों तरी लागों। पायां तुमच्या दातारा ३ दिसों देसी किविलवाणें। तरी तुजचि हें उणें। तुका म्हणे जिणें। माझें तुज अधीन ॥ ४ ॥

८५२ सुकलिया कोंभा अत्यंत जळधरें। तेणेंचि प्रकारें न्याय असे १ न चले पाउलीं सांडी गरुडासन। मनाचें हीं मन त्वरेलागीं २ तुका म्हणे भूक न साहावे काळा। जीवनाची कळा ओढलीसे ॥ ३ ॥

८५३ असोनि न कीजे अलिप्त अहंकारें। उगीच का भारें कुंथाकुंथी १ धांवा सोडवणें वेगीं लवकरीं। मी तों जालों हरी शक्तिहीन २ भ्रमल्यानें दिसें बांधल्याचे परी। माझें मजवरीं वाहोनियां ३ तुका म्हणे धांव घेतलीसे सोई। आतां पुढें येई लवकरीं ॥ ४ ॥

८५४ कृपावंत दुजें नाहीं तुम्हांपोटीं। लाडें बोलें गोठी सुख मातें १ घेउनि भातुकें लागसील पाठी। लाविसील ओंठीं ब्रम्हरस २ आपुलिया पांखें घालिसी पाखर। उदार मजवर कृपाळु तूं ३ तुका म्हणे आम्हांकारणें गोविंदा। वागविसी गदा सुदर्शन ॥ ४ ॥

८५५ आतां नये बोलों अव्हेराची मात। बाळावरीं चित्त असों द्यावें १ तुज कां सांगणें लागे हा प्रकार। परि हें उत्तर आवडीचें २ न वंची वो कांहीं एकहा प्रकार। आपणां अंतर नका मज ३ तुका म्हणे मोहो राखावा सतत। नये पाहों अंत पांडुरंगा ॥ ४ ॥

८५६ मायबापापुढें लेंकराची आळी । आणीक हे पाळी कोण ळळे १ सांभाळा जी माझीं विषमें अनंता । जवळीं असतां अव्हेरू कां २ आणिकांची चाले सत्ता आम्हावरीं । तुमची ते थोरी काय मग ३ तुका म्हणे आलों दुरोनि जवळीं । आतां टाळाटाळी करूं नये ॥ ४ ॥

८५७ पाहें मजकडे भरोनियां दृष्टीं । बहुत हिंपुटी जालों माते १ करावेंसें वाटे जीवा स्तनपान । नव्हे हें वचन शृंगारिक २ सत्यासाठीं माझी शब्दविवंचना । जोडिल्या वचनाचें तें नव्हे ३ तुका म्हणे माझी कळवळ्याची कींव । भागलासे जीव कर्तव्यानें ॥ ४ ॥

८५८ जीव जायवरी सांडी करी माता । हें तों आश्चर्यता बाळकाची १ दुर्बळ कीं नाहीं आइकत कानीं । काय नारायणीं न्यून जालें २ क्षणक्षणां माझा नेघावा सांभाळ । अभाग्याचा काळ ऐसा आला ३ तुका म्हणे नाहीं वचनासी रुचि । फलकट वेंचि तें तें होय ॥ ४ ॥

८५९ पडियेलों वनीं थोर चिंतवनीं । उसीर कां अझुनि लावियेला १ येईं गा विठ्ठला येईं गा विठ्ठला । प्राण हा फुटला आळवितां २ काय तुज नाहीं लौकिकाची शंका । आपुल्या बाळका मोकलितां ३ तुका म्हणे बहु खंती वाटे जीवा । धरियेलें देवा दुरी दिसे ॥ ४ ॥

८६० तरी आम्ही तुम्ही धरियेली कास । नाहीं कोणी दास वांयां गेला १ अगा पंढरीशा उभा विटेवरीं । येईं लवकरीं धांव नेटें २ पालवितों तुज उभारोनि बाहे । कृपावंता पाहें मजकडे ३ तुका म्हणे तुज बहु कान डोळे । कां हे माझे वेळे ऐसी परी ॥ ४ ॥

८६१ उचिताचा दाता । कृपावंता तूं अनंता १ कां रे न घालिसी धांव । तुझें उच्चारितां नांव २ काय बळ युक्ति । नाहीं तुझे अंगीं शक्ति ३ तुका म्हणे तूं विश्वंभर । वोस माझें कां अंतर ॥ ४ ॥

८६२ क्षुधार्थी दुष्काळें अन्नें पीडियले । मिष्टान्न देखिलें तेणें जैसें १ तैसें तुझे पायीं लांचावलें मन । झुरे माझा प्राण भेटावया २ मांजरें देखिला लोणियाचा गोळा । लावुनिया डोळा बैसलेंसें ३ तुका म्हणे आतां झडी घालूं पाहे । पांडुरंगे माय तुझे पायीं ॥ ४ ॥

८६३ जे जे कांहीं मज होईल वासना । ते ते नारायणा व्हावें तुम्हीं १ काय भाव एक निवडूं निराळा । जाणसी तूं कळा अंतरींची २ तुजविण मज कोण आहे सखा । जें सांगों आणिकां जीवभाव ३ अवघे पिशुन झाले असे जन । आपपर कोण नाठवे हें ४ तुका म्हणे तूंचि जीवांचें जीवन । माझें समाधान तुझे हातीं ॥ ५ ॥

८६४ तुझा म्हणवूनि दिसतों गा दीन। हाचि अभिमान खरे तुझा १ अज्ञान बाळका कोपली जननी। तयासी निर्वाणीं कोण पावे २ तैसा घिठो तुजविण परदेशी। नको या दुःखासी गोवूं मज ३ तुका म्हणे मज सर्व तुझी आशा। अगा जगदीशा पांडुरंगा ॥ ४ ॥

८६५ कांगा कोणी न म्हणे पंढरीची आई। बोलाविते पाहीं चाल नेटें १ तेव्हां माझ्या मना होय समाधान। जाय सर्व सीण जन्मांतरींचा २ तुका म्हणे माझी होईल माउली। घोरसोनि घाली प्रेमपान्हा ॥ ३ ॥

८६६ संतांचा पढियावा कैशापरी लाहो। नामाचा आठवो कैसा राहे १ हेचि थोर चिंता लागली मनासीं। निजतां निद्रेसी नलगे डोळा २ जेवित जेवणीं नलगे गोड धड। वाटतें काबाड विषयसुख ३ पडिया संकटीं पावें कृपानिधी। लावीं संतपदीं प्रेमभावें ४ तुका म्हणे आम्हीं नेणों कांहीं हित। तुजविण अनाथ पांडुरंगा ॥ ५ ॥

८६७ जेणें तुझी कास भावें धरियेली। त्याची नाहीं केली सांडी देवा १ काय माझा भोग आहे तो न कळे। सुखें तुम्ही डोळे झांका देवा २ राव रंक तुम्हां सारिखेची जाणा। नाहीं थोर साना तुम्हांपासीं २ तुका म्हणे तुम्हीं आपंगिलें भक्तां। माझिया संचिता कृपा नये ॥ ४ ॥

८६८ कोठें आम्ही आतां वेंचावी हे वाणी। कोण मना आणी जाणो-नियां १ न करावी सांडी आतां टाळाटाळी। दैन्य हें कळीं होईल माजी २ घरोघरीं झाल्या ज्ञानाचिया गोष्टी। सत्यासवें गांठी न पडावी ३ तुका म्हणे आम्ही भाकितां करुणा। भलताचि शहाणा शोध काढी ॥ ४ ॥

८६९ कोणाचें चिंतन करूं पेशा काळें। पायांचिया बळें कंठातसें १ पाहातसें वाट येईगा विठ्ठला। मज कां हा केला परदेश २ बहुतांचे सस्तें झालों कासावीस। जाय रात्रंदिवस वैरियांचा ३ तुका म्हणे बैसे मनाचिये मुळीं। तरीच हीं जाळीं उगवतीं ॥ ४ ॥

८७० आइकावीं माझीं कवतुक उत्तरें। देउनी सादर चित्त देवा १ वोरसें आवडीं आलों पायापाशीं। होय तें मनेंसी सुख कीजे २ तुमचें न भंगे सर्वोत्तमपण। करितां समाधान लेंकराचें ३ तुका म्हणे आम्ही बोलतों बोबडें। तरी लाडें कोडें कवतुकें ॥ ४ ॥

८७१ तुझिया दासांचा हीन झालों दास। न धरी उदास मायबापा १ तुजविण प्राण कैसा राहों पाहे। वियोग न साहे क्षणभरी २ आणिक माझ्या जीवें मोकलिली आस। पाहे तुझी वास पांडुरंगा ३ सर्वभावें तुज आणिला उचित। राहिलों निश्चित तुझे पायीं ४ तुका म्हणे तुज असो माझा भार। बोलतों मी फार काय जाणें ॥ ५ ॥

८७२ आतां पाहाशील काय माझा अंत। आलों शरणागत तुज देवा १ करीं अंगीकार राखें पायांपाशीं। झणीं दिसों देसी किविलवाणें २ नाहीं आइकिली मागें ऐसी मात। जे त्वां शरणागत उपेक्षिले ३ तुका म्हणे आतां धरीं अभिमान। आहेसी तूं दानशूर दाता ॥ ४ ॥

८७३ शरण आले त्यासी नेदावी जी पाठी। ऐका जगजेठी विज्ञापना १ आळवी तयासी उत्तर झडकरी। द्यावें परिसा हरी विज्ञापना २ गांजिलियाचें करावें धांवणें। विनंती नारायणें परिसावी हे ३ भागलियाचा होईं रे विसावा। परिसावी केशवा विज्ञापना ४ अंकिताचा भार वागवावा माथां। परिसावी अनंता विज्ञापना ५ तुका म्हणे आम्हां विसरावें ना देवा। परिसावी केशवा विज्ञापना ॥ ६ ॥ •

८७४ जीवनावांचूनी तळमळी मासा। प्रकार हा तैसा होतो जीवा १ न संपडेसें झालें भूमिगत धन। चरफडी मन तयापरी २ मातेचा वियोग झालिया हो बाळा। हा तो कळवळा जाणा देवा ३ सांगावें ते किती तुम्हांसी प्रकार। सकळाचें सार पाय दावीं ४ येचि चिंतें माझा करपला भीतर। कां मेणों विसर पडिला माझा ५ तुका म्हणे तूं हें जाणसी सकळ। थांवरीं कृपाळ होईं देवा ॥ ६ ॥

८७५ करिसी कीं न करिसी माझा अंगीकार। हा मज विचार पडिला देवा १ देसी कीं न देसी पायांचें दर्शन। म्हणऊनी मन स्थिर नाहीं २ बोलसी कीं न बोलसी मजसवें देवा। म्हणोनियां जीवा भय वाटे ३ होईल कीं न होय तुज माझा आठव। पडिला संदेह हाचि मज ४ तुका म्हणे मी तों कमाईचा हीण। म्हणऊनी सीण करी देवा ॥ ५ ॥

८७६ तुज न करितां काय नव्हे एक। हे तों सकळिक संतवाणी १ घेईं माझा भार करीं कइवार। उतरीं हा पार भवसिंधु २ उचित अनुचित पापपुण्यकाला। हा तों नये मला निवडितां ३ कुंठित राहिली बोलतां बोलतां। पार न पवतां वाणी पुढें ४ पुसतांही कोणां नकळे हें गुज। राखें आतां लाज पांडुरंगा ५ तुका म्हणे बहु पाहिलें या जीवें। वर्म झालें जी ठावें नाम तुझें ॥ ६ ॥

८७७ बाळाचें जीवन। माता जाणें भूक ताहान १ काय करूं विनवणी। असो मस्तक चरणीं २ ठेविलिये ठायीं। चित्त ठेवूनि असे पायीं ३ करितों हे सेवा। चिंतन सर्वां ठायीं देवा ४ न्यून तेंचि पुरें। घ्यावे करोनि दातारें ५ तुका म्हणे बुद्धि। अल्प असे अपराधी ॥ ६ ॥

८७८ उशीर कां केला। कृपाळुवा जी विठ्ठला १ मज दिलें कोणा-

हातीं । काय मानिली निश्चिंती २ कोठवरी धरूं धीर । आतां मन करूं स्थिर ३ तुका म्हणे जीव । ऐसी भाकितसे कींव ॥ ४ ॥

८७९ मज अनाथाकारणें । करीं येणें केशवा १ जीव झुरे तुजसाठीं । वाट पोटीं पहातुसे २ चित्त रंगलें चरणीं । तुजवांचूनि न राहे ३ तुका म्हणे कृपावंता । माझी चिंता असावी ॥ ४ ॥

८८० पदोपदीं पायां पडणें । करुणा जाण भाकावी १ ये गा ये गा विसांविया । करुणा-दयासागरा २ जोडोनियां करकमळ । नेत्रीं जळ भरोनी ३ तुका उभा दानपात्र । पुरवी आर्त विठोबा ॥ ४ ॥

८८१ हेंचि जतन करा दान । धरुनि चरण राहिलों ते १ द्यावी माझ्या हातें सेवा । हेंचि देवा विनवणी २ आणीक कांहीं न घालीं भार । बहुत फार सांकडें ३ तुका तुमचा म्हणवी दास । त्याची आस पुरवावी ॥४॥

८८२ पसरूनि राहिलों बाहो । सोयी अहो तुमचीये १ आतां यावें लागवेगें । पांडुरंगे धांवत २ बैसायाची इच्छा कडे । चालीं खडे रुपताती ३ तुका म्हणे कृपाळुवा । करणें सेवा लागली ॥ ४ ॥

८८३ जोडोनियां कर । उभा राहिलों समोर १ हेंचि माझें भांडवल । जाणें कारण विठ्ठल २ भाकितों करुणा । आतां नुपेक्षावें दीना ३ तुका म्हणे डोई । ठेवी वेळोवेळां पायीं ॥ ४ ॥

८८४ क्षेम देयाला हो । स्फुरताती दंड बाहो १ आतां झडझडां चाले । घेई उचलोनी पाउलें २ सांडीं हंसगती । बहु उत्कंठा हे चित्तीं ३ तुका म्हणे आई । श्रीरंगें विठाबाई ॥ ४ ॥

८८५ पंढरीच्या राया । माझें दंडवत पायां १ तुमचे कृपेचें पोसणें । माझा समाचार घेणें २ नाम धरियलें कंठीं । असे आर्तभूत पोटीं ३ जीवींचें तें जाणा । तुका म्हणे नारायणा ॥ ४ ॥

८८६ पतितपावना । दिनानाथां नारायणा १ तुझें रूप माझें मनीं । राहो नाम जपों वाणी २ ब्रह्मांडनायका । विश्वजनाच्या पाळका ३ जीवींचिया जीवा । तुका म्हणे देवदेवा ॥ ४ ॥

८८७ आळवीन स्वरें कैशा मधुरा उत्तरें १ ये वो ये वो पांडुरंगें । प्रेमपान्हा मज दे गे २ पसरूनि चोंची । वचनें ही करुणेचीं ३ तुका म्हणे बळी । आम्ही लडिवाळें आळी ॥ ४ ॥

८८८ अल्प माझी मती । म्हणोनि येतो काकुलती १ आतां दाखवा दाखवा । तुमचीं पाउलें केशवा २ धीर माझ्या मना । नाहीं नाहीं नारायणा ३ तुका म्हणे दया । मज करा अभागिया ॥ ४ ॥

८८९ धांवा केला धांवा । श्रम होऊं नेदी जीवा १ वर्षे अमृताच्या

धारा । घेईं वोसंगा लेंकुरा २ उशीर तो आतां । न करावा हेचि चिंता ३ तुका म्हणे त्वरें । वेग करीं विश्वंभरे ॥ ४ ॥

८९० वाहावतो पुरीं । आतां उचित तें करी १ माझी शक्ति नारायणा । कींव भाकावी करुणा २ आम्हां ओढी काळ । तुझें क्षीण झालें बळ ३ तुका म्हणे गोडी । जीवा मातेचिया ओढी ॥ ४ ॥

८९१ तूं श्रियेचा पती । माझी बहु हीन याती १ दोघे असों एके ठायीं । माझा माथा तुझे पायीं २ माझ्या दीनपणा पार । नाहीं बहु तूं उदार ३ तुका म्हणे पांडुरंगा । मी ओहोळ तूं गंगा ॥ ४ ॥

८९२ नेणें करूं सेवा । पांडुरंगा कृपाळुवा १ धांवे बुडतों मी काढी । सत्तां आपुलिया ओढी २ क्रियाकर्महीन । जालों इंद्रिया अधीन ३ तुका विनंति करी । वेळोवेळां पाय धरी ॥ ४ ॥

८९३ न संडवे अन्न । मज न सेववे वन १ म्हणउनी नारायणा । कींव भाकितों करुणा २ नाहीं अधिकार । कांहीं घोकाया अक्षर ३ तुका म्हणे थोडें । आयुष्य अवघेंचि कोडें ॥ ४ ॥

८९४ आतां न म्हणे मी माझें । नेघें भार कांहीं ओझें १ तूंचि तारिता मारिता । कळों आलासी निरुता २ अवघा तूंचि जनार्दन । संत बोलती वचन ३ तुका म्हणे कांहीं । माझें तिळभरी नाहीं ॥ ४ ॥

८९५ हेंचि माझें धन । तुमचे वंदावे चरण १ येणें भाग्यें असो जीत । एवढें समर्पूनी चित्त २ सांभाळिले देवा । मज अनाथा जी जीवा ३ जोडु-नियां कर । तुका विनवितो किंकर ॥ ४ ॥

८९६ आधार तो व्हावा । ऐसी आस करी देवा १ तुम्हांपाशीं काय उणें । काय वेचे समाधानें २ सेवेच्या अभिळासें । मन बहु जालें पिसें ३ अरे भक्तपराधीना । तुका म्हणे नारायणा ॥ ४ ॥

८९७ अगा करुणाकरा करितसें धांवा । या मज सोडवा लवकरी १ ऐकोनिया माझीं करुणेचीं वचनें । व्हावें नारायणें उतावीळ २ मागें पुढें अवघा दिसे रिता ठाव । ठेवूनि पायीं भाव वाट पाहे ३ उशीर तो आतां न पाहिजे केला । अहो जी विठ्ठला मायबापा ४ उरलें तें एक हेंचि मज आतां । अवघें विचारितां शून्य जालें ५ तुका म्हणे आतां करीं कृपादान । पाउलें समान दावीं डोळां ॥ ६ ॥

८९८ मी तों दीनाहूनि दीन । माझा तुज अभिमान १ मी तों आलों शरणागत । माझें करावें स्वहित २ दिनानाथा कृपाळुवा । सांभाळावें आपुल्या नांवा ३ तुका म्हणे आतां । भलें नव्हे मोकलितां ॥ ४ ॥

८९९ घालूनी लोळणी पडलों अंगणीं । सिंचा सिंचवणी तीर्थवरी १

वोल्हावेल तनु होईल शीतळ। झाली हळहळ बहु तापें २ पावेन या ठायां कई झालें होतें। आलों अवचितें उष्ट्यावरीं ३ तुका म्हणे कोणी जाणवा राउळीं। येईल जवळीं पांडुरंग ॥ ४ ॥

९०० अगा पंढरीशा पतीत पावना। एक विज्ञापना पायांपासीं १ अनाथ जीवांचा तूं काज कैवारी। ऐसी चराचरीं ब्रीदावळी २ न सांगतां कळें अंतरींचें गुज। आतां तुझी लाज तुज देवा ३ आळि करी त्याचें करिसी समाधान। अभयाचें दान देउनीयां ४ तुका म्हणे तूंचि खेळे दोहिं ठायीं। नसेल तो देई धीर मना ॥ ५ ॥

९०१ स्वमुखेंचि तुम्ही सांगा मज सेवा। ऐसे माझे देवा मनोरथ १ नेघों आम्ही कांहीं आपल्या उदारें। चित्तवित्त घरें जीवावरीं २ बोलें परस्परें वाढवावें सुख। पाहावें श्रीमुख डोळेभरीं ३ तुका म्हणे सत्य बोलतों वचन। करूनी चरण साक्ष तुझे ॥ ४ ॥

९०२ बैसो पाठिमोरी। मना वाटे तैसें करी १ परि तूं जाणसी आवडी। बाळा बहुतांची परवडी २ आपुलाल्या इच्छा। मागों जया व्हावें तैसा ३ तुका म्हणे आई। नव्हेसी उदास विठाई ॥ ४ ॥

९०३ न्यावयासी मूळ पाठवील कधीं। मज कृपानिधी पांडुरंग १ प्राण फुटे माझा त्याचिया वियोगें। घडी जाय युगें येकी येकी २ त्याचिये गांवींची आवडती जीवा। जीव हा सांडावा वोवाळुनी ३ दिनो दिन चिंता वाटते बहुत। नावडे संचित करावेंसे ४ तुका म्हणे आतां आहे तेंचि सरो। कोण करी भरोवरीं मग ॥ ५ ॥

९०४ सकळ कल्याण तूं माझे अंतरीं। अगा विटेवरीं ठाकलिया १ मायबापा माझ्या सखया पांडुरंगा। लवकरीं येगा वाट पाहें २ तीर्थ तुळसी हेंचि औषध पाचन। अंतरीं जीवन प्रेम तुझें ३ तुका म्हणे ज्याचें नाम विश्वंभर। त्याचें निरंतर ध्यान करीं ॥ ४ ॥

९०५ म्हणवूनि दास नव्हे ऐसा झालों। अनुभवें बोलों स्वामीपुढें १ कां नाहीं वचन प्रतिउत्तराचें। मीच माझ्या वेचें अट्टाहासें २ कासयानें गोडी उपजावा विश्वास। प्रीती कांहीं रस वांचुनियां ३ तुका म्हणे अगा चतुराशिरोमणी। विचारावें मनीं केशीराजा ॥ ४ ॥

९०६ आसावलें मन जीवनाचे ओढीं। नामरूपीं गोडी लावियेली १ काय तुझे पायीं नाहीं भांडवल। माझे मिथ्या बोल जाती ऐसे २ काय लोखंडाचे पाहे गुणदोष। सिवोन परीस सोनें करी ३ तुका म्हणे माझें अवघें असों द्यावें। आपुलें करावें ब्रीद साच ॥ ४ ॥

९०७ जाणता नेणता नाहीं पांडुरंगा। कां जी मज सांगा उपेक्षिलें १

तुज ठावें होतें पातकी मी खरा । आधींच कां थारा दिल्हा पायीं २ अंक तो पडिला हरिचा मी दास । भेद पंगतीस करूं नये ३ तुका म्हणे आर्जी जिंतिलें तें खरें । आतां उणें पुरें तुम्हालागीं ॥ ४ ॥

९०८ फिरविलें देऊळ जगामाजीं ख्याती । नामदेवाहातीं दूध प्याला १ भरियेली हुंडी नरसींमेहत्याची धनाजी जाटाचीं शेतें पेरी २ मिराबाई-साठीं प्याला तो विषाचा । लाख्या कोलाटयाचा ढोल पिटी ३ कबिराचें मार्गी विणूं लागे शेले । मूल उठविलें कुंभाराचें ४ आतां तुम्ही दया करा पंढरिराया । तूका विनवी पायां वेळोवेळां ॥ ५ ॥

९०९ वांयां जाय पेसा । आतां उगवावा फांसा १ माझें परिसावें गाऱ्हाणें । सुखदुःखाचीं वचनें २ हाति आम्हां ठाव । पायीं निरोपाया भाव ३ तुका म्हणे जार । तुझा तुज देवा भार ॥ ४ ॥

९१० केलियाचें दान । करा आपुलें जतन १ माझी बुद्धि स्थिर देवा । नाहीं विषयांचा हेवा २ भावा अंतराय । येती अंतरती पाय ३ तुका म्हणे जोडी । आदीं अंतीं राहो गोडी ॥ ४ ॥

९११ विनवितों शेवटीं । आहे तैसें माझें पोटीं १ कंठीं राहावें राहावें । होंचि मागतसें भावें २ पुरली वासना । येणें होईल नारायणा ३ तुका म्हणे जो देहाडा । तोचि वर्णीन पवाडा ॥ ४ ॥

९१२ धांव पाव करी साह्य । देवा तूंचि बापमाय १ तुजवीण प्रार्थू कोणा । आसरा नाहीं नारायणा २ माझ्या जीवींची कांचणी । दूर करा चक्रपाणी ३ तुका म्हणे झालों वेडें । तुम्हां घातलें सांकडें ॥ ४ ॥

९१३ तुझा म्हणऊनि जालों उतराई । त्याचें धर्म काई तें मी नेणें १ हातीं धरोनिया दावीं मज वाट । पुढें कोण नीट तेंचि देवा २ देवभक्तपण करावें जतन । दोहीं पक्षीं जाण तूंचि बळी ३ अभिमानें तुज लागली हे लाज । शरणगतां काज करावया ४ तुका म्हणे बहु नेणता मी फार । म्हणऊनि विचार जाणविला ॥ ५ ॥

९१४ कां हो देवा कांहीं न बोलाची गोष्टी । कां मज हिंपुटीं करि-तसा १ कंठीं प्राण पाहे वचनाची वास । तों दिसे उदास धरिलें ऐसें २ येणें काळें बुंथी घेतलीसे खोळ । कां नये विटाळ होऊं माझा ३ लाज वाटे मज म्हणवितां देवाचा । न पुसती फुकाचा तुका म्हणे ॥ ४ ॥

९१५ आतां सोडवणें न या नारायणा । तरि मी वांचेना काळाहातीं १ ऐसें सांगोनियां जालों उतराई । आर्णीक तें काई माझे हातीं २ केलि-याचें माप न ये सेवटासी । करितील नासी अंतराय ३ तुका म्हणे भय वाटतसे जीवा । धांवणियां धांवा लवकरीं ॥ ४ ॥

९१६ सर्वांपरी तुझे गुण गा उत्तम। तुझे ठायीं प्रेम राहो माझें १ माउलीपरिस आहेसी उदार। तरि कां निष्ठुर मन केलें २ गजेंद्राकारणें केलें त्वां धांवणें। तरि कां निर्वाण पाहातोसी ३ प्रल्हादा संकटीं रक्षिलें त्वां देवा। तरि कां केशवा सांडी केली ४ अन्यायी अजामेळ तो झाला पावन। ऐसें हें पुराण हाका मारी ५ तुका म्हणे माझे थोर अपराध। नाम करी छेद क्षणमात्रें ॥ ६ ॥

९१७ तुम्हांसी हें अवघें ठावें। किती द्यावें स्मरण १ कां बा ऐसें नेणें। निष्ठुरपणें टाळितसां २ आळवितां मायबापा। नये कृपा अझूनी ३ तुका म्हणे जगदीशा। काय असां निजले ॥ ४ ॥

९१८ करीन कोल्हाळ। आतां हाचि सर्वकाळ १ आतां ये वो माझे आई। देई भातुकें विठाई २ उपायासी नाम। दिलें याचि पुढें क्षेम ३ बीज आणि फळ। हेंचि तुका म्हणे मूळ ॥ ४ ॥

९१९ तुझा म्हणवून तुज नेणें। ऐसें काय माझें जिणें १ तरि मज कवणाचा आधार। करोनियां राहों धीर २ काय शब्दींची ऐकिला। भेटी नव्हतां गा विठ्ठला ३ तुका म्हणे आतां। अभय देई पंढरीनाथा ॥ ४ ॥

९२० नाहीं गुणदोष लिंपों देत अंगीं। झाडितां प्रसंगीं बरावरी १ निकटवासिया आळवितों धांवा। येथूनियां देवा सोडवावें २ उमटे अंतरीं तें करूं प्रगट। कळोनी बोभाट धांव घाली ३ तुका म्हणे तरि वांचलों या काळें। समर्थाचें बळें सुखी असों ॥ ४ ॥

९२१ आणीक कांहीं नेणें। असें पायांच्या चिंतनें १ माझा न व्हावा विसर। नाहीं आणीक आधार २ भांडवल सेवा। हाचि ठेवियेला ठेवा ३ करीं मान भावा। तुका विनंती करी देवा ॥ ४ ॥

९२२ जे दोष घडले न फिटे करितां कांहीं। सरते तुझ्या पायीं जाले तैसे १ माझा कां हो करूं नये अंगीकार। जालेती निष्ठुर पांडुरंगा २ यातिहीन नखे ऐकों ज्यां वेद। तयां दिलें पद वैकुंठींचें ३ तुका म्हणे कां रे एकाचा आभार। घेसी माथां भार वाहोनियां ॥ ४ ॥

९२३ भागल्यांचा तूं विसांवा। करीन नांवा निंबलोण १ परमानंदा पुरुषोत्तमा। हरी या श्रमापासूनी २ अनाथांचा अंगीकार। करितां भार न मनिसी ३ तुका म्हणे इच्छा पुरे। ऐसी धुरे हे विठ्ठले ॥ ४ ॥

९२४ एकाएकीं हातोफळी। ठायां बळी पावले ते १ आम्ही देवा शक्तिहीनें। भाकूं तेणें करुणा २ पावटणी केला काळ। जया बळ होतें तें ३ तुका म्हणे वीर्यावीर। संतधीर समुद्र ॥ ४ ॥

९२५ शेवटींची हे विनंती । पाय चित्तीं रहावे १ ऐसें करा कृपादान । तुम्हां मन सन्निध २ भाग्येंविण कैंची भेटी । नव्हे तुटी चिंतनें ३ तुका म्हणे फळसा आलें । हे विठ्ठलें परिसावें ॥ ४ ॥

९२६ कृपा करुनि देवा । मज साच तें दाखवा १ तुम्ही दयावंत कैसे । कीर्ति जगामाजीं वसे २ पाहोनिया डोळां । हातीं ओढवाल काळा ३ तुका म्हणे देवा । माझा करावा कुढावा ॥ ४ ॥

९२७ सकळिकांचें समाधान । नव्हे देखिल्यावांचून १ रूप दाखवी रे आतां । सहस्रभुजांच्या मंडिता २ शंखचक्रपद्मगदा । गरुडासहित गोविंदा ३ तुका म्हणे कान्हा । भूक लागली नयनां ॥ ४ ॥

९२८ नाहीं तुम्ही केला । अंगीकार तो विठ्ठला १ सोंगें न पवीजे थडी । माजीं फुटकी सांगडी २ प्रेम नाहीं अंगीं । भले म्हणविलें जगीं ३ तुका म्हणे देवा । मज वांयां कां चाळवा ॥ ४ ॥

९२९ कोण दुजें हरी सीण । शरण दीन आल्याचा १ तुम्हांविण जगदिशा । उदार ठसा त्रिभुवनीं २ कोण ऐसें वारी पाप । हरि ताप जन्माचा ३ तुका म्हणे धांव घाली । कोण चाली मनाची ॥ ४ ॥

९३० आतां माझा सर्वभावें हा निर्धार । न करीं विचार आणिकांसी १ सर्वभावें नाम गाईन आवडीं । सर्व माझी जोडी पाय तुझे २ लोटांगण तुझ्या घालीन अगणीं । पाहेन भरोनि डोळे मुख ३ निर्लज्ज होऊनि नाचेन रंगणीं । येऊं नेदी मनीं शंका कांहीं ४ अंकित अंकिला दास तुझा देवा । संकल्प हा जीवा तुका म्हणे ॥ ५ ॥

९३१ करावें गोमटें । बाळा मातें तें उमटे १ आपुलिया जीवाहुनी । असे वाल्हें तें जननी २ वियोग तो तीस । त्याच्या उपचारें विष ३ तुका म्हणे पाय । डोळा सुखावे त्या न्यायें ॥ ४ ॥

९३२ आणीक कोणापुढें वासूं मुख सांग । माझें अंतरंग कोण जाणें १ पाहें तुजकडे येऊनी जाऊनी । पांडुरंगा मनीं विचारावें २ भय चिंता अवघे उद्योग सांडिले । आठवुनी पाउलें असें तुझी ३ नका विसरूं मज वैकुंठनायका । विनवीतसे तुका बंदीजन ॥ ४ ॥

९३३ माय लेंकरांत भिन्न । नाहीं उत्तराचा सीण १ धाडीं धाडीं वो भातुकें । रंजविल्याचें कौतुकें २ करुनि नवल । याचे बोलिलों ते बोल ३ तुका म्हणे माते । पांडुरंगे कृपावंते ॥ ४ ॥

९३४ पूर्वी अढळपद दिधलें एकासी । क्षीरसिंधूवासी केलें एका १ एकाचे साहीले गर्भवास अंगें । तैसें मी न मागें संकटाचें २ न घाली संकट

संसाराचें कांहीं। स्वर्ग मोक्ष तेही नलगती ३ तुका म्हणे चरण दाखवी डोळेभरीं। पावलों श्रीहरी मग सर्व ॥ ४ ॥

९३५ आतां माझ्या दुःखा कोण हो सांगाती। रखुमाईचा पति पावेचि ना १ काय विधात्यानें घातलीसे रेखा। सुटका या दुःखा न होयची २ तुका म्हणे माझी विसरूं नको चिंता। अगा पंढरीनाथा पाव वेगीं ३

९३६ जाळा तुम्ही माझें मीपण। येणें माझा खून मांडियेला १ खादलें पचें तरिच तें हित। ओकलिया थीत पिंड पाडी २ तरि भलें भोग जोडिलें तें धन। पडिलिया खाण जीवनासी ३ तुका म्हणे मज तारी गा विठ्ठला। नेणताचि भला दास तुझा ॥ ४ ॥

९३७ कोण्या काळें येईल मना। नारायणा तुमचिया १ माझा करणें अंगिकार। सर्व भार फेडुनी २ लागलीये तळमळ चित्ता। तरी दुश्चिता संसारीं ३ मुखाचीच पाहे वास। मागें दास सांभाळीं ४ इच्छा पूर्ण जाल्या-विण। कैसा सीण वारेल ५ लाहो काया मनें वाचा। दिवसाच्या भेटीचा ६ कंटाळा तो न धरावा। तुम्ही देवा दासाचा ७ तुका म्हणे माझे वेळे। न कळे कां हें उफराटें ॥ ८ ॥

९३८ आर्त माझ्या बहु पोटीं। व्हावी भेटी पायांसी १ यासी तुम्ही कृपावंता। माझी चिंता असों द्या २ तळमळ करी चित्त। अखंडित वियोगें ३ तुका म्हणे पंढरिनाथा। जाणे व्यथा अंतरिची ॥ ४ ॥

९३९ कराल तें काय नव्हे जी विठ्ठला। चित्त द्यावें बोला बोबडिया १ सोडवूनि न्यावें काळचक्राहातीं। बहुत विपत्ति भोगविल्या २ ज्यालें जीवों नेदी मारिलेंचि मरे। प्रारब्ध तें उरे मागुतालें ३ तुका म्हणे दुजा खुंटला उपाय। म्हणवूनि पाय आठविले ॥ ४ ॥

९४० सांग पांडुरंगा मज हा उपाव। जेणें तुझे पाव आतुडती १ न कळे हा निर्धार ब्रम्हादिकां पार। कायसा विचार माझा तेथें २ तुका म्हणे आतां धरूनिया धीर। राहूं कोठवर मायबापा ॥ ३ ॥

९४१ काय देवा कांहीं न बोलसी गोष्टी। कां मज हिंपुटी करितोसि १ कंठीं प्राण पाहे वचनाची आस। त्वां दिसे उदास धरियेलें २ येणें काळें बुद्धी घेतलीसे थार। कां नये विठ्ठल होऊं माझा ३ लाज वाटे मज म्हणती देवाचा। न पुससी फुकाचा तुका म्हणे ॥ ४ ॥

९४२ काय माझे वेळे सरलें भांडवल। नव्हेची मुद्दल तुटी आलें १ ऐसें मज तरी कळलियावरी। मग तुम्हा हरी आळवीं ना २ काय दिलें धन राज्य माल वित्त। तेणें झालें चित्त समाधान ३ तुका म्हणे कांरे धरीला अबोला। सांगा जी विठ्ठला मायबापा ॥ ४ ॥

९४३ अवधींच कैसी झालींत कठीण । माझा भागहीण कोण सांगे १ येती माय बापें लोकांचीं भेटाया । तुम्ही माझी माया सांडियेली २ बापें नारायणें धरिला अबोला । काय राग धरिला नकळे मज ३ तुका म्हणे रात्रंदिस वाटे खंती । नये तुमचे चित्तीं कृपा कांहीं ॥ ४ ॥

९४४ सलगी केली तोंडपिटी । आम्ही लडिवाळ धाकुटीं १ बोलूं नये तेंचि बोलें । देवा पाहिजे साहिलें २ अवस्थामध्यें एकचि वेडें । माय खेळवी त्यासी कोडें ३ तुका म्हणे मायबापा । आम्हांवरीं करी कृपा ॥ ४ ॥

९४५ गांवामार्गील ओहळ । गंगा न मनीं अमंगळ १ तैसें न मनी माझे आतां । गुणदोष पंढरीनाथा २ आपुल्या महिमानें । धातु परीस करी सोनें ३ तुका म्हणे माती । केली कस्तुरीनें सरती ॥ ४ ॥

९४६ भवाचिये भेणें भ्यालें माझें मन । तुम्हासि शरण आलों देवा १ अंकितासी राखों जाणसी तूं एक । अभय हस्तक देऊनियां २ पतीतासी तारी नाम तुझें एक । भवाब्धीतारक मायबापा ३ सुखाचें माहेर नाम तुझें हरी । तुका म्हणे तारी जडजीवां ॥ ४ ॥

९४७ किती तुझी वाट पाहूं रे विठ्ठला । कंठ हा सोकला आळवितां १ माझें हें निर्वाण किती बा पहासी । पाव हृषीकेशी मायबापा २ गजेंद्राकारणें सत्वर धांवसी । तैसा अनाथासी पावे मज ३ जीवनावेगळा तळमळी मासा । तैसें झालें दासा तुका म्हणे ॥ ४ ॥

९४८ मज टाकिलें वनवासी । पांडुरंगा दुरल्या देशीं १ काय करूं पंढरिनाथा । काळ साह्य नाहीं आतां २ कामक्रोध विषय झाला । तेणें नाडियेलें मला ३ हीन दीन तुझ्या पोटीं । तुका म्हणे द्यावी भेटी ॥ ४ ॥

९४९ काय विचाराचें पडिलें सांकडें । काय ऐसें कोडें उपजलें १ काय उपजलें न बोलावी गोष्टी । काय दया पोटीं आंवरिली २ काय आतां आमुची करिसी निरास । धरिली हे आस तुझे ठायीं ३ तुका म्हणे आम्ही झालों कीं गळीत । नको पाहूं अंत पांडुरंगा ॥ ४ ॥

९५० वांझा गाई दुभती । देवा ऐसी तुझी ख्याती १ ऐसें मागत नाहीं तुज । चरण दाखवावे मज २ चातक पाखरूं । त्यासी वर्षे मेघधारू ३ पक्षी राजहंस । अमोलिक मोतीं त्यास ४ तुका म्हणे देवा । कां गा खांचलासी जीवा ॥ ५ ॥

९५१ माझ्या बोबडिया बोला । चित्त द्यावें बा विठ्ठला १ तुझ्या नामाची न लाज । जनासवें काय काज २ मज हांसतील लोक । परी मी गाईन निःशंक ३ तुका म्हणे कमळापती । माझी परिसावी विनंती ॥ ४ ॥

९५२ देवाचिया देवा गोपिकांच्या पती । उदार हे ख्याति त्रिभुवनीं

१ पातकांच्या रासी नासितोसि नामें । जळतील कर्में महा दोष २ सर्व सुखें तुझ्या वोळगति पायीं । ऋद्धि सिद्धि ठायीं मुक्ति चारी ३ इंद्रासी दुर्लभ पाविजे तें पद । गीतीं गातां छंद वाहतां टाळी ४ तुका म्हणे जड जीव शक्तिहीन । त्याचें तूं जीवन पांडुरंगा ॥ ५ ॥

९५३ माझें जड भारी । आतां अवघे तुम्हांवरीं १ जालों अंकित अंकिला । तुमचा मुकलों मागिलां २ करितों जें काम । माझी सेवा तुझें नाम ३ तुका म्हणे पायां लागे । कांहीं नेदी ना न मागें ॥ ४ ॥

९५४ हातीं धरिल्याची असों द्यावी लाज । पांडुरंगा तुज मायबापा १ तुझा शरणांगत गांजितां आणिक । होय तरी सुख तुम्हा कैसें २ हातींच्या कांकणा नेलें जरी चोरीं । जतन इतरीं वस्तु केंवी ३ तैसें नको करूं राहों निश्चितीनें । सांभाळावें येणें पाडें आम्हा ४ तुका म्हणे बाहु अंगद ज्यापरी । सांभाळिती हरी दृष्टीखालीं ॥ ५ ॥

९५५ तुजवांचुनियां मज कोण आहे । दुजा कोण साह्य होय मज १ प्रेमभाव माझा असे तुझे पायीं । जीवभाव आई तूंचि आम्हा २ तुज वांचु-नियां देव नसे मज । साक्षी माझी तुज देत आहे ३ देह जड भारी रोग नाना भोग । विकार अव्यंग पडे जेथें ४ तेथें सांभाळावें वेगीं नारायणा । पतीतपावना तुम्ही मज ५ तुका म्हणे म्यां तो निवेदिला बोल । कृपाळू विठ्ठलें पायांपाशीं ॥ ६ ॥

९५६ मज नाहीं कृपा केली पांडुरंगें । संताचिया संगें पोट भरीं १ चतुराचे सभे पंडित कुशळ । मी काय दुर्बळ विष्णुदास २ तुका म्हणें नेणें करूं समाधान । धरिले चरण विठोबाचे ॥ ३ ॥

९५७ कधीं निजविसी हरी । आत्मसुखसेजेवरीं १ कधीं पाहीन मी डोळां । तुझें रूप घननीळा २ कधीं होईल विश्रांती । चुकतील यातायाती ३ कधीं संतसंग मिळे । नामरूप तुझें कळे ४ तुका म्हणे पांडुरंगा । जाणतोसी अंतरंगा ॥ ५ ॥

९५८ बोले बोले वो विठ्ठले । आम्ही तुझें काय केलें १ सांवता कां तुझा बाप । त्याचें पोटीं झाला गप्प २ एकनाथ तुझा काका । त्याचे पाणी वाहसी फुका ३ कबीर काय तुझा मामा । शेले विणसीं पुरुषोत्तमा ४ नामदेव तुझा मावसा । त्याच्या संगें जेविसी कैसा ५ कान्होपात्रा तुझी आत । तिसी मांडींत केलें गुप्त ६ मीराबाई तुझी आई । विष प्याला लवलाही ७ जनाबाई तुझी मावशी । तिच्या संगें तूं राबसी ८ तुका म्हणे घेतली आळ । सलगीनें बोले बाळ ॥ ९ ॥

९५९ नको माझे मानूं आहाच ते शब्द । कळवळयाचा वाद करीतसे

१ कासयानें बळ करूं पायांपासीं । भाकावी ते दासीं करुणा आम्ही २ काय मज चाड असे या लौकिकें । परी असे निकें अनुभवाचें ३ लांचावल्यासाठीं वचनाची आळी । टकळ्यानें घोळीं जवळीं मन ४ वाटतसे आस पुरविसी ऐसें । तरी अंगीं पिसें लावियेलें ५ तुका म्हणे माझा येथेंचि आवडी । श्रीमुखाची जोडी इच्छितसें ॥ ६ ॥

९६० दाटों कंठ लागों डोळियां पाझर । गुणाची अपार वृष्टि वरी १ तेणें सुखें छंदें घेईन सोहळा । होऊनि निराळा पापपुण्या २ तुझ्या मोहें पडों मागील विसर । आलाप सुस्वर करिन कंठ ३ तुका म्हणे येथें पाहिजे सोरस । तुम्हांविण रस गोड नव्हे ॥ ४ ॥

९६१ न कळे तो काय करावा उपाव । जेणें राहे भाव तुझ्या पायीं १ येऊनियां वास करिसी हृदयीं । ऐसें घडे कई कासयानें २ साच भावें तुझें चिंतन मानसीं । राहे हें करिसी कै गा देवा ३ लटिकें हें माझें करूनियां दुरी । साच तूं अंतरीं येउनि राहें ४ तुका म्हणे मज राखावें पतिता । आपुलिया सत्ता पांडुरंगा ॥ ५ ॥

९६२ कृपावंत कोप न धरावा चित्तीं । छळूं वक्रोक्ति स्तुति करूं १ आम्ही तुझा पार काय जाणों देवा । नेणों कैसी सेवा करावी ते २ अनंता अरूपा अलक्षा अच्युता । निर्गुणा सच्चिदा सर्वोत्तमा ३ चांगलीं हीं नामें घेतलीं ठेवून । जालासी लहान भक्तिकाजा ४ तुका म्हणे तुझ्या पायांवरी सदा । मस्तक गोविंदा असो माझा ॥ ५ ॥

९६३ भक्तिसुख आलें नाहीं अनुभवा । तों मा ज्ञान देवा काय करूं १ नसावें जीं तुम्हीं कांहीं निश्चितीनें । माझिया वचनें अभेदाच्या २ एकाएकी मन नेदी समाधान । देखिल्या चरण वांचूनियां ३ तुका म्हणे वाचा गुणीं लांचावली । न राहे उगली मौन्य मज ॥ ४ ॥

९६४ ऐसा माझा कोण आहे भीडभार । नांवाचा मी फार वांयां गेलों १ काय सेवा रुजू आहे सत्ताबळ । तें मज राऊळ कृपा करी २ काय याती शुद्ध आहे कुळधर्म । तेणें पडें वर्म तुझे ठायीं ३ कोण तपोनिधि दानधर्मशीळ । अंगीं एक बळ आहे सत्ता ४ तुका म्हणे वांयां ज्ञालों भूमिभार । होईल विचार काय नेणों ॥ ५ ॥

९६५ काय तुज कैसें जाणावें गा देवा । आणावें अनुभवा कैशापरी १ सगुण निर्गुण स्थूल कीं लहान । न कळे अनुमान मज तुझें २ कोण तो निर्धार करूं हा विचार । भवसिंधु पार तरावया ३ तुका म्हणे कैसे पाय आतुडती । न पडे श्रीपती वर्म ठावें ॥ ४ ॥

९६६ दर्शनाचे आर्त जीवा । बहु देवा राहिलें १ आतां जाणसी तें

करीं । विश्वंभरीं काय उणें २ येथें जरी उरे चिंता । कोण दाता याहूनी ३ तुका म्हणे जाणवलें । आम्हां भलें एवढेंचि ॥ ४ ॥

९६७ आवडेल तैसें तुज आळवीन । वाटे समाधान जीवा तैसें १ नाहीं येथें कांहीं लौकिकाची चाड । तुजविण गोड देवराया २ पुरवी मनोरथ अंतरींचे आर्त । धायेवरी गीत गाय तुझें ३ तुका म्हणे लेकी आळवी माहेरा । गाऊं या संसारा तुज तैसें ॥ ४ ॥

९६८ तुझा म्हणवूनि दिसतों गा दीन । हाचि अभिमान सरे तुझा १ अज्ञान बाळका कोपली जननी । तयासी निर्वाणीं कोण पावे २ तैसा विठो तुजविण परदेशी । नको या दुःखासी गोवूं मज ३ तुका म्हणे मज सर्व तुझी आशा । अगा जगदीशा पांडुरंगा ॥ ४ ॥

९६९ लेकराची आळी न पुरवी कैसी । काय तयापाशीं उणें जालें १ आम्हां लडिवाळां नाहीं तें प्रमाण । कांहीं ब्रह्मज्ञान आत्मस्थिति २ वचनाचा घेईन अनुभव पदरीं । जें हें जनाचारीं मिरविलें ३ तुका म्हणे माझी भोळिवेची आटी । दावीन शेवटीं कौतुक हें ॥ ४ ॥

९७० काय न्यून आहे सांगा । पांडुरंगा तुम्हांपें १ आमुची तों न पुरे इच्छा । पिता ऐसा मस्तकीं २ कैसी तुम्हां होते सांडी । करुणा तोंडीं उच्चारें ३ आश्चर्यंची करी तुका । हे नायका वैकुंठींच्या ॥ ४ ॥

९७१ स्वामिसेवा गोड । माते बाळकाचें कोड १ जें जें मागावें भातुकें । तें तें पुरवीं कौतुकें २ खेळविलें कोडें । हरुषें बोले कीं बोवडें ३ तुका म्हणे लाड । तेथें पुरे माझें कोड ॥ ४ ॥

९७२ नाहीं दिलें कधीं कठिण उत्तर । तरी कां अंतर पडियेलें १ म्हणऊनि आतां वियोग न साहे । लांचावलें देहे संघष्टणें २ वेळोवेळां वाचें आठवितों नाम । अधिकचि प्रेम चढे घेतां ३ तुका म्हणे पांडुरंगे जननिये । घेऊनि कडिये बुझाविलें ॥ ४ ॥

९७३ तुज करितां होतें आनाचें आन । तारिलें पाषाण उदकीं देवा १ कां नये कैवार करूं अंगिकार । माझा बहु भार जाड जाला २ चुकलासी म्हणों तरी जिवांचाही जीव । रिता नाहीं ठाव उरों दिला ३ तुका म्हणे ऐसें काय सत्ताबळ । माझें परी कृपाळ आम्हां तुम्ही ॥ ४ ॥

९७४ थोडे तुम्ही मागें होते उद्धरिले । मज ऐसे गेले वांयां जीव १ याचा कांहीं न मनावा भार । कृपेचा सागर आहेसी तूं २ तुज आळवितां पापाची वसती । राहे अंगीं किती बळ त्याचें ३ तुका म्हणे जैसे तारिले दगड । तैसा मीही जड एक देवा ॥ ४ ॥

९७५ मागें बहुतां जनां राखिले आडणीं । धांवसी निर्वाणीं नाम

घेतां १ ऐसें ठावें झालें मज बरव्या परी। म्हणउनि करीं धांवा तुझा २ माझेविशीं तुज पडिला विसरू। आतां काय करूं पांडुरंगा ३ अझुनि कां नये तुम्हांसी करुणा। दुरी नारायणा धरिलें मज ४ तुका म्हणे जीव जाऊं पाहे माझा। आतां केशीराजा घालीं उडी ॥ ५ ॥

९७६ कई तो दिवस देखेन मी डोळां। कल्याण मंगळामंगळाचें १ आयुष्या शेवटीं पायांसवें भेटी। काळ वेळ तुटी झाल्या तरे २ सरो हें संचित पदरींचा गोवा। उतावीळ देवा मन झालें ३ पाउलापाउलीं करितां विचार। अनंत विकार चित्ता अंगीं ४ म्हणउनि भयाभीत होतो जीव। भाकितसे कींव अट्टाहासें ५ दुःखाच्या उत्तरीं आळविले पाय। पाहणें तो काय अजून अंत ६ तुका म्हणे होईल आइकिलें कानीं। तरि चक्रपाणी धांव घाला ॥ ७ ॥

९७७ पांडुरंगे ये वो पांडुरंगे। जीवाचे जीवलगे य वो पांडुरंगे १ कनवाळु कृपाळु भक्तालागीं मोही। गजेंद्राचा धांवा तुवां केला विठाई २ भक्तांच्या कैवारें कष्टलीस विठ्ठले। अंबऋषीकारणें जन्म दाहा घेतले ३ प्रल्हादाकारणें स्तंभीं अवतार केला। विदारूनि दैत्य प्रेमपान्हा पाजिला ४ उपमन्याकारणें कैसी धांवसी लवलाहीं। पाजा प्रेमपान्हा क्षीरसागराठायीं ५ कौरवीं पांचाळी सभेमाजीं आणिली। वस्त्रहरणीं वस्त्रें कैशी जाली माऊली ६ दुर्वास पातला धर्मा छळावया वनीं। धांवसी लवलाहीं शाखा देंठ घेउनी ७ कृपाळु माउली भुक्तिमुक्तिभांडार। करी माझा अंगीकार तुका म्हणे विठ्ठले ॥ ८ ॥

९७८ पेणावलें ढोर मार खाय पाठी। बैसलें तें उठी तेथूनियां १ तैसी माझ्या मना परी झाली देवा। धांवें अहंभावा सांडवलों २ कडां घाली उडी मागिलांच्या भेणें। पडणें मरणें न कळेचि ३ तुका म्हणे झालों त्यापरी दुःखित। असे बोलावीत पांडुरंगा ॥ ४ ॥

९७९ येईं गा तूं मायबापा पंढरीच्या राया। तुजविण सीण वाटे क्षिण जाली काया १ याती हीन मती हीन कर्म हीन माझें। सर्व लज्जा सांडोनियां शरण आलों तुज २ दिनानाथ दीनबंधु नाम तुज साजे। पतितपावन नाम ऐसी ब्रीदावळी गाजे ३ विटेवरी उभा नीट कटावरी कर। तुका म्हणे हेंचि आम्हां ध्यान निरंतर ॥ ४ ॥

९८० नाहीं जप तप जीवासी आटणी। मनासी दाटणी नाहीं केली १ निजलिया ठायीं पोकारिला धांवा। सांकडें तें देवा तुज माझें २ नाहीं आणूयिनां समर्पिलें जळ। सेवा ते केवळ चिंतनाची ३ तुका म्हणे आम्हीं वेंचिलीं उत्तरें। घेतलीं उदारें मायबापें ॥ ४ ॥

९८१ वारंवार तुज द्यावया आठव । आइक तो भाव माझा कैसा १ गेला मग नये फिरोन दिवस । पुढिलांची आस गणित नाहीं २ गुणाव गुणांचे पडती आघात । तेणें होय चित्त कासावीस ३ कांहीं एक तुझा न देखों आधार । म्हणऊनि धीर नाहीं जीवा ४ तुका म्हणे तूं या ब्रह्मांडाचा जीव । तरि कां आम्ही कींव भाकीतसों ॥ ५ ॥

९८२ तळमळी चित्त दर्शनाची आशा । बहु जगदीशा करुणा केली १ वचनींच संत पावले स्वरूप । माझें नेदी पाप योगा येऊं २ येंठाऐसा करी भक्तिवेवसाव । न पवेचि जीव समाधान ३ तुका म्हणे कई देसील विसांवा । पांडुरंगीं धांवा घेतें मन ॥ ४ ॥

९८३ शृंगारिक माझीं नव्हतीं उत्तरें । आळवितों खरे अवस्थेच्या १ न घालावा मधीं कामाचा विलंब । तुम्ही तो स्वयंभ करुणामूर्ती २ तुका म्हणे वदन केलें सन्मुख । देखतां चरण पोटाळीन ॥ ३ ॥

९८४ विठोबा विसांविया विसांविया । पडों देईगा पायां १ वहु खेद क्षीण । आलों सोसुनियां वन २ बहुतां काकुलती । आलों सोसिली फजिती ३ केली तुजसाठीं । तुका म्हणे येवढी आटी ॥ ४ ॥

९८५ आरुषा वचनीं मातेचा आवडी । म्हणऊनि तांतडी घेत नाहीं १ काय होईल माझें मांडिलें कवतुक । आदराचा भूक रडारोवी २ लपोमिर्या करीं चुकूर माउली । नाहीं होत केली निष्ठा सांडी ३ तुका म्हणे करी पारखी वचनें । भेवउनि तान्हें आळवावें ॥ ४ ॥

९८६ सकळ तुझे पायीं मानिला विश्वास । न करीं उदास आतां मज १ वाचे गातां गोड आइकतां कानीं । पाहातां लोचनीं मूर्ति तुझी २ मन स्थिर माझें झालेंसें निश्चळ । वारिले सकळ आशापाश ३ जन्मजराव्याधी निवारिलें दुःख । वोसंडलें सुख प्रेमधारीं ४ तुका म्हणे मज झाला हा निर्धार । आतां वांयां फार काय बोलों ॥ ५ ॥

९८७ अंतरींचा भाव जाणोनियां गुज । तैसें केलें काज पांडुरंगा १ घातलें वचन न पडेचि खालीं । तूं आम्हां माउली अनाथांची २ मज याचकाची पुरवाली आशा । पंढरीनिवासा मायबापा ३ नाशिली आशंका माझिया जीवाची । उरली भेदाची होती कांहीं ४ तुका म्हणे आतां केलों मी निर्भर । गाईन अपार गुण तुझे ॥ ५ ॥

९८८ काय माझा पण होईल लटिका । ब्रिदावळी लोकां दाविली ते खरी करूनिया देई माझी आळी । येऊनि कुरवाळीं पांडुरंगे २ आणीक म्यां कोणा म्हणवावें हातीं । नये काकुलती दुजयासी ३ तुका म्हणे मज येथेंचि ओळखी । होईन तो सुखी पायांनींच ॥ ४ ॥

## श्रीनिळोबामहाराज

९८९ अनाथाची कोण पावविल हांक । तुम्ही तों नाईक ब्रम्हांडाचे १ मी एक दुर्बळ येतो काकुलती । नेणाची श्रीपती काय करूं २ कोण तुम्हांपाशीं जाणवील मात । होऊनि कृपावंत मजवरी ३ तुम्हासी तो धंदा बहुत बहुतांचा । तयामाजीं कैसा आठव माझा ४ जेथें थोर थोर संत मुनीश्वर । सनकादिक सुरवर भीड त्यांची ५ निळा म्हणे व्यर्थ गेलों वायांवीण । केला उरला शिण जन्मवरी ॥ ६ ॥

९९० आम्ही देवा भक्तीहीन । नेणों ज्ञान योगाचें १ म्हणोनि येतों काकुळतीं । पुढतोपुढती तुम्हांसीं २ भाव नाहीं न कळे ज्ञान । कैसें साधन करावें तें ३ निळा म्हणे दिवसरातीं । उद्वेग चित्तीं राहिला हा ॥ ४ ॥

९९१ काय नेणों आचरण केलें । जया आलिंगिलें हृदयेंसी १ हें तों न कळे माझिये मती । याचीलागीं चित्तीं व्याकूळ २ कोण्या भजनें प्रसन्न व्हाल । आपुला म्हणवाल शरणागत ३ निळा म्हणे दिवाभीता । जेवीं कां सविता उगवला ॥ ४ ॥

९९२ कृपावंता दया मोठी । आदर पोटीं दासाचा १ म्हणोनियां सांभाळ करा । नेदा अविचारा आतळों २ आपुलीये सेवेवीण । न ठेवा क्षण पळ एक ३ निळा म्हणे प्रेमरसें । जेववा सरिसें सांगातें ॥ ४ ॥

९९३ करूं येईल अंगिकार । तरि करा फार काय बोलों १ नाहीं घोकिलें पेकिलें कांहीं । सेवा घडली नाहीं वैष्णवांची २ स्वधर्म विधि न कळे आचार । कैसा तो प्रकार साधनाचा ३ निळा म्हणे आहे मूढ दगड । ठायींचीच जड बुद्धी माझी ॥ ४ ॥

९९४ एकदां तरी देखिल्याविण । कैसेनि मी कोण ओळखें १ अमृताची ऐकिल्या गोडी । रसनें ते फुडी केंवि लाभे २ क्षीराब्धीं हें शेषशयन । जगीं न देखोन अनोळखा ३ निळा म्हणे त्यापरी देवा । नये स्वानुभवा काय करूं ॥ ४ ॥

९९५ सांगावें उगवुनी न कळे तयासी । तुम्ही तो मानसीं साक्ष माझे १ विश्वाचे व्यापक चाळक चित्ताचे । साक्षी अंतरींचे जेथें तेथें २ ब्रम्हादिक देव तेहि आज्ञाधार । तुमचे किंकर काळ काम ३ निळा म्हणे माझा करा अंगिकार । हेंचि निरंतर विनवितसें ॥ ४ ॥

९९६ मागे पाळिलीं पोशिलीं । अपत्यें त्वां वाढविलीं १ ऐसें बोलियेलें संत । लटकी वाटे ते ते मात २ हें गे मजचि उपेक्षिलें । नाहीं समाधान केलें ३ निळा म्हणे येऊनियां । भेटें पुरवी माझ्या थाया ॥ ४ ॥

९९७ केव्हां भेटी देसी जीवाच्या जीवना । सुखाच्या निधाना पांडुरंगा १ वोसरलें मन नित्य वाट पाहे । नयनीं निज नये दिवसरात्रीं २ आला जातो दिवस मास घटिका पळ । प्राण हा विव्हळ तुजलागीं ३ हुरहुरी चित सदा उत्कंठित । न पुरेचि हा हेत चिंता वाटे ४ केव्हां येईल सार्थकाची वेळ । येसी कृपाळ धावोनिया ५ निळा म्हणे आतां न लावावा उशीर । भेटोनीं अंतर निववावें ॥ ६ ॥

९९८ कोठें विगुंतली । नेणों कोणें गोवियली १ माझी न करी आठवण । गेली बाळका विसरोन २ न लावावा उशीर । नेणो कां झाली निष्ठुर ३ निळा म्हणे काय माझें । फार मानियेलें ओझें ॥ ४ ॥

९९९ जरी अवगुणी अन्यायी । बाळा तुपेक्षी कीं आई १ झाल्या अपराधांच्या कोटी । घालुनिया साहे पोटीं २ कुरवाळुनी मोहें । तयां पाजी प्रेमपेहें ३ निळा म्हणे अंकीं । घेऊनी पहुडे परियंकीं ॥ ४ ॥

१००० मोकलितां धाय । नाईकसी कैसी माय १ सांडियेलें दूर देशीं । नये करूणा कांहीं पेशी २ वेष्टिलें श्वापदीं । अहंकारमोहमदीं ३ निळा म्हणे या वरी आहे । धांव घाली वो विठाई ॥ ४ ॥

१००१ पांडुरंगा दयाघना । गुणनिधाना सुखसिंधु १ भाव माझा जाणोनियां । ठेवा जी पायां जवळिकें २ भक्तवत्सल मनमोहना । राजीवनयना निजात्मया ३ निळा म्हणे करुणाकरा । विश्वंभरा विश्वजनित्या ॥४॥

१००२ नारायणा तुमच्या चरणीं । भुक्तिमुक्तिचिया खाणी १ मोक्ष सर्वदा तिष्ठत । चरणीं जोडोनियां हस्तक २ ऋद्धि सिद्धि वोळंगती । चरणीं तुमचिया श्रीपती ३ निळा म्हणे अवलोकितां । पाउलें सुकुमार सायुज्यता ॥ ४ ॥

## श्रीनामदेवमहाराज

१००३ कांहो माझी सांडी केली हृषीकेशी । आम्ही कोणापाशीं तोंड वासूं १ किती देवा तुला यावें काकुळती । काय या संचितीं लिहिलें माझ्या २ ब्रीदाचा तोडर गर्जे त्रिभुवनीं । तूंचि एक धनी त्रैलोक्याचा ३ समूळ घेतला पृथ्वीचा भार । माझाचि जोजार काय तुज ४ नको पाहूं अंत पांडुरंगे आई । नामा हरीपायीं घाली मिठी ॥ ५ ॥

१००४ अनाथासी साह्य होसी नारायणा । करुणावचना बोलविसी १ पाडुरंगा कृपा करा मजवरी । पामरा उद्धरी पाहतांची २ गणिके सत्वर

मोक्षपद देसी । उपमन्युबाळासी क्षीरसिंधु ३ नामा म्हणे काय याति न विचारी । विदुराचे घरीं खासी कण्या ॥ ४ ॥

१००५ अनाथाचा नाथ भक्ताचा कैवारी । पुराणीं हें थोरी आयि-किली १ ऐकोनियां कीर्ति आलों तुजपाशीं । निवारी दुःखासी केशिराजा २ त्रितापें तापलों दुःखें आहाळलों । कासाविस झालों दयासिंधू ३ तुज-विण आतां कोणातें मी सांगूं । तोडीं हा उद्वेग नारायणा ४ नामा म्हणे आतां नको पाहूं अंत । उद्धरी त्वरीत पांडुरंगा ॥ ५ ॥

१००६ अग्निमाजीं पडे बाळू । माता धांवे कनवाळू १ तैसा धांवें माझिया काजा । अंकिला मी दास तुझा २ सर्वेचि झेपावे पक्षिणी । पिलीं पडतांचि धरणीं ३ भुकेलें वत्सरावें । धेनु हुंबरत धांवे ४ वणवा लागलासे वनीं । पाडस चिंतीत हरणी ५ नामा म्हणे मेघा जैसा । विनवितो चातक तैसा ॥ ६ ॥

१००७ धेनु विये वनीं तीस । कैची सुयणी । तरी तें वत्स स्तनीं लावी कवण १ भुजंगाचीं पिलीं उपजतांचि वेगळीं । त्यासीं डंखुं शिकविलें हो कोणी २ सहज लक्षण जयाचियें ठायीं । तो आपुलिये सोई धांवतसे ३ उपजतांची फूल मोगऱ्याच्या माथां । त्यासी परिमळता कोणे लावियेली ४ कडु दुध्याच्या आळ्यासी साखर दुध घातलें । तें अधिकची कडुवाळें कवणें केलें ५ गाळिला तोडिला खंडविखंडी । उंस न संडी सोय गोडीसी ६ नामा म्हणे तैसें आहे गा श्रीहरी । सोईचे व्यापारी घेईम तूतें ॥ ७ ॥

१००८ कृपणाचें धन असे भूमिआंत । जेथें जाय चित्त तेथें धन १ ऐसी मज देवा लावावी संवय । हेंचि मज द्यावें पांडुरंगा २ जेथें जेथें मन जाईल हें माझें । तेथें तेथें तुझें रूप भासो ३ नामा म्हणे सर्वांपरी मी अज्ञान । विनवी आस करून पांडुरंगा ॥ ४ ॥

१००९ सांडोनि संसार झालों मी अंकित । पेशियाचा अंत पाहूं नको १ पातकी मी सत्य पातकी मी सत्य । पातकी मी सत्य पांडुरंगा २ माझे गुण दोष न धरिसी चित्तीं । थोरपण ख्याति द्यावी आम्हां २ ऐसा अपराध आणूं नको मना । पंढरीचा राणा म्हणोनिया ॥ ४ ॥

१०१० वत्साकारणें मोहाळु गाय । अनुसरल्या पान्हाय १ तैसें तुझें वांसरूं धलों मी असें । मज लावीं कासे आपुलिया २ मज बांधलें त्वां संसारखुंटीं । माझी माउली दूर वैकुंठीं ३ थोरु करी मना लाहो । तंव आणिक नेती पान्हावो ४ थोरु नव्हे याचि परी । नामा विनवितसे मुरारी ॥५॥

१०११ विठ्ठल विठ्ठदे पुंडलीकवरदे । अनंत अभेदें रूपें तुझीं १ येईगे विठ्ठले मजलागीं झडकरीं । बुडतों भवसागरीं काढीं मज २ आकांता

अवसरीं स्मरिलें गजेंद्रें। दीनानाथें ब्रीदें सत्य केलीं २ स्मरली संकटीं द्रौपदी वनवासीं। धांवोनि आलासी लवलाहीं ४ प्रल्हादें तुजलागीं स्मरिलें निर्वाणीं। संकटापासोनि राखियेलें ५ नामा म्हणे थोर पीडिलों गर्भवासें। अखंड पाहातसें वास तुझी ॥ ६ ॥

१०१२ देशीं परदेशी झालों तुजवीण। माझें समाधान कोण करी १ चातक चकोरापरी पाहे वास। तूं कांहो उदास पांडुरंगा २ नामा म्हणे चित्त देई माझ्या बोला। जीव तो उरला निघों पाहे ॥ ३ ॥

१०१३ मुंगीचिया गळां बांधोनिया मेरु। तेणें हा प्रकारु कळों आला १ माळियाचें पोरें लपविलें पोटीं। तेणें जगजेठी सुख मानीं २ कुलालाचे हातीं तुडविलें मूल। दाखवीं नवल तयासाठीं ३ मजसाठीं काय धरिलेंसी मौन। धांव नारायणा नामा म्हणे ॥ ४ ॥

१०१४ मज गांजिल्याचा धांवा। सावधान परिसावा १ विठो सुजाणाच्या राया। धांव माझ्या करुणालया २ मोहोपाशीं मज बांधिलें। थोर वैर त्वां साधिलें ३ माझें मन हें पामर। भ्रांत हिंडे दारोदार ४ नामा म्हणे काय करूं। तुजविण भूमिभारु ॥ ५ ॥

१०१५ गुणदोष माझे पाहों नको आतां। तारिसी अनंता मज आतां १ अगाध महिमा काय वाणूं हरी। गोकुळाभीतरीं गाई राखीं २ अंबऋषीसाठीं जन्म सोशियले। महत्त्वाचे केलें हुड स्वयें ३ नामा म्हणे तुझें नामाचेनि बळ। प्रसादें केवळ लाधलों मी ॥ ४ ॥

१०१६ मीं तों तुझा दास न करी उदास। माया मोहपाश तोडीं देवा १ प्राण जावो परि नको करूं त्याग। करी अंगसंग अंगिकार २ अंगीकारी आतां अजामेळ अंतीं। समान श्रीपती सम करी ३ नामा म्हणे ऐसें वर्णावें म्यां किती। नामें केली ख्याती चराचरीं ॥ ४ ॥

१०१७ वानराच्या संगें स्वयें क्षेम देसी। मज हृषीकेशी न बोलावें १ रिखापाशीं सदा स्वभावें तुम्हीं खेळा। माझिया कपाळा नातुडसी २ पक्षी जटायूचे लेकरु तूं होसी। माझ्या कां मनासी नातुडसी ३ लावोनि चरण तारियेली शिळा। कोळियाचा केला अंगीकार ४ नामा म्हणे तुम्हां सांगावें म्यां किती। राग माना चित्तीं काय वाणुं ॥ ५ ॥

१०१८ पतितपावना धांवसी निर्वाणीं। ब्रीद चक्रपाणी सत्य केलें १ काय अपराध कोणाचे पाहिले। नाहीं तूं त्यागिलें नष्ट खळां २ अजामेळासाठीं आहार वर्जिले। बीज तें भर्जिलें भवमूळ ३ नामा म्हणे देवा नागवण बारे। आतां उणें पुरें पाहूं नको ॥ ४ ॥

१०१९ जगव्जीवना अगा नारायणा। का नये करुणा दासाची हे १

अच्युता केशवा येगा दीनानाथा। सर्वज्ञा समर्था कृपामूर्ती २ चिद्घना चिद्रूपा विरंचीच्या बापा। करावी जी कृपा सर्वांभूतीं ४ तुझें म्हणविलें उपेक्षिसी जरी। नामा म्हणे हरी ब्रीद काय ॥ ४ ॥

१०२० विश्वंभर नाम तुझें कमळापती। जगीं श्रुतिस्मृति वाखाणिती १ गौळ्यांचे घरींचें दहीं लोणी चोरुनी। खातां चक्रपाणी लाजसीना २ आतां दीनानाथा तुझें ब्रीद साचें। तरी भूषण आमुचें जतन करी ३ येर ठेवाठेवी कायसी आतां। तुम्हां विनवितो नामा केशिराजा ॥ ४ ॥

१०२१ वासरूं भोवें खुंटिया भोंवतें। आपआपणियांतें गोवियेलें १ तैसी परी मज झाली गा देवा। गुंतलों मी भावा लटिकिया २ नामा म्हणे केशवा तोडी का बंधनें। मी एक पोसणें भक्त तुझा ॥ ३ ॥

१०२२ तुजविण आम्हां कोण हो पोशिता। अहो जी कृपावंता पंढरि-राया १ न करीं विठ्ठला आतां लाजिरवाणें। मी तुझें पोसणें पांडुरंगा २ काकुलती कोणा येऊं हो मी आतां। अनाथाच्या नाथा विठ्ठला तूं ३ एक वेळ आतां पाहे मजकडे। नामा म्हणे वेडें रंक तुझें ॥ ४ ॥

१०२३ आशा मनीशा तृष्णा लागलीसे पाठीं। धांव जगजेठी स्वामी माझ्या १ गेलासि केउता वाढिलें दुश्चिता। अगा कृपावंता स्वामी माझ्या २ नामा म्हणे मज नाहीं कोण गत। तारिसी अनंत स्वामी माझ्या ॥ ३ ॥

१०२४ माझे मनोरथ पूर्ण कीजे देवा। केशवा माधवा नारायणा १ नाहीं नाहीं मज आणिक सोयरा। न करी अव्हेरा पांडुरंगा २ अनाथाचा नाथ होशी तूं दयाळा। किती वेळोवेळां प्रार्थूं आतां ३ नामा म्हणे जीव होतो कासावीस। केली तुझी आस आतां बरी ॥ ४ ॥

१०२५ आरुष साबडें नेणें कांहीं वेडें। जन्मोनि सांकडें केलें तुज १ जाणसी तें करी कृपाळुवा हरी। लाज सर्वांपरी आहे तुज २ मी तंव अप-राधी असें लक्ष कोटी। म्हणतों जगजेठी दास तुझा ३ नाहीं तुझी सेवा केली मनोभावें। लोभदंभगर्वें भ्रांत झालों ४ कीर्ति म्यां ऐकिली बहुतांच्या मुखीं। केली बहु सुखी शरणागतें ५ नामा म्हणे मज मोकलीसी म्हणा। अनाथ म्हणोनि शरण आलों ॥ ६ ॥

१०२६ समर्थाचें बाळ पांघरे वाकळ। हांसती सकळ लाज कोणा १ देव असतां दैन्य उरे कैचें बापा। आम्हांसि तूं कैसा विसरलासी २ ऐसा तूं अविनाश त्रिभुवनींचा राजा। नामा म्हणे माझा तूंचि स्वामी ॥ ३ ॥

१०२७ देहाभिमानें पुरविली पाठी। कांहो जगजेठी नये कृपा १ स्वात्मसुखासाठी स्तुती करी ब्रह्मा। व्याधा निजधामा स्थिर पद २ काय

करीतसे मातृपितृभक्ति । तया जगत्पति नाचतसे ३ नाचती वैकुंठीं सर्व ऋषेश्वर । नामा म्हणे पार नाहीं नाहीं ॥ ४ ॥

१०२८ विठ्ठल माउली कृपेची कोवळी । आठवितां घाली प्रेमपान्हा १ मज कां मोकलिलें कवणा निरविलें । कठिण कैसें झालें हृदय तुझें २ तुजविण जिवलग दुजें कोण होईल । तें माझें साहील जड भारी ३ तूं माझी माउली मी वो तुझा वत्स । परतों परतों वास पाहे तुझी ४ माता मोहें कैसी न विसंबे सर्वथा । अंतरींची व्यथा कोण जाणे ५ नामा म्हणे विठ्ठले कां गे रुसलीसि । केव्हां सांभाळिसी अनाथनाथे ॥ ६ ॥

१०२९ विठ्ठल माउली कृपेची साउली । आठवितां घाली प्रेमपान्हा १ न सांगतां सर्व जाणे तान्ह भूक । जवळीं व्यापक न विसंबे २ माया मोह कैसा करावा सर्वथा । अंतरींची व्यथा तोचि जाणे ३ सुखशांतिरूपें लेवविलीं अंगीं । लागों नेदी धगी संसाराची ४ देऊनि अभय करें कुरवाळी । करित साउली पीतांबरें ५ मुखीं नाम माळा कीर्तन श्रवणीं । लेवविलीं लेणीं नवविध ६ नयनीं अंजन सूदलें स वळें । समाधान झालें सर्व अंग ७ अच्युत अनंत सुवर्णाची पेटी । घातलिसे कंठीं निर्विकार ८ चतुर्भुज शोभा रूप मध्यें मणी । प्रभा त्रिभुवनीं विराजित ९ मुक्तलग शुद्ध बिंदुली गोजिरी । पद्महस्त शिरीं स्थापितसे १० संतपायरज कपाळीं टिळका । नाहीं भय शंका कळिकाळा ११ सगुण साजिरा कटीं कडदोरा । अवर्ण दुर्भरा दृढ बांधु १२ कामक्रोधादिक करूनि पुतळे । पायीं जे घातले पायवाट १३ वासनेची दृष्टी लागेल त्या क्षणीं । उभा चक्रपाणी मागें पुढें १४ संतापायीं नामा शृंगारमंडितु । अखंड क्रीडतु महाद्वारीं ॥ १५ ॥

१०३० काय अपराध पाहसी कोणाचे । धांवे भाविकांचे कामकाजीं १ काय केशीराजा वाणुं मी हुबळें । शरणागता लळे पुरविशी २ पतितपावन ब्रीद चराचरीं । तेथें मी भिकारी कोणीकडे ३ नामा म्हणे तूंचि करिशी उद्धार । मज देवा पार नाहीं भाग्या ॥ ४ ॥

१०३१ शरण आल्याचा न पाहसी अवगुण । कृपेचें लक्षण सहज आहे १ गजेंद्र गणिकेची राखिली त्वां लाज । सोडविला द्विज अजामिळ २ सांगणें हें काय तुम्हीं दिलें देवा । उदारा केशवा मायबापा ३ नामा म्हणे क्षणीं अव्हेरिसी मज । जगीं होईल लाज थोर तुज ॥ ४ ॥

१०३२ काया हरुषे फुटूं नेदी । टाळ दिंडी वाहिन खांदीं १ तूं बा माझा तूं बा माझा । तूं बा माझा केशिराजा २ आळवणीचा तूं बा वाचें । तेणें छंदें पै बा नाचें ३ तूं बा माझा मी दास तुझा । विनवितो नामा केशीराजा ॥ ४ ॥

१०३३ अनंत जन्मींचें चुकवीसी सांकडें । काय मी बापुडें विनवूं कैसें १ सगुण गुणाची वोळलीसे मूर्ति । राहो माझें चित्तीं निरंतर २ माझा मीच झालों सकळ व्यापारी । संसाराबाहेरीं कोण काढी ३ नामा म्हणे नको गोववूं या आशा । पावन परेशा केशिराजा ॥ ४ ॥

१०३४ तुज न पोसवे दातारा । तरी ऐशा घाली चिरा । एका पोटा दुर्भरा । अव्हेरूं नको दातारा १ तुज म्यां जीवीं अनुसरावें । तुम्हींही तसेंच अपंगावें । परी मी आणिकांचें न म्हणवावें । जन्मोजन्मीं दातारा २ विष्णुदास नामा म्हणे । मज उपेक्षिसी झणें । जन्मोजन्मींचें पोसणें । केशवा उणें येऊं न देई ॥ ३ ॥

१०३५ काय करूं आतां देवा विश्वंभरा । मजलागीं थारा नाहीं कोठें १ उबगतीं सोयरीं धायरीं समस्त । काय करूं अंत पाहती माझा २ तूंचि मातापिता गुरू बंधु होसी । जाऊं या कोणासी शरण आतां ३ पायीं थारा मागे नाम्याची विनंति । चित्त द्या श्रीपती आतां वेगें ॥ ४ ॥

१०३६ नेणें भक्ति कांहीं करूं कैसी सेवा । हें तों मज देवा समजेना १ करूं कैसा जप करूं कैसें ध्यान । नाहीं माझें मन स्थिर देवा २ कामक्रोध यांची मोठी हे जाचणी । झालों वेडा रानीं समजेना ३ नामा म्हणे माझे सांवळे विठाई । येऊनिया राहीं हृदयामाजीं ॥ ४ ॥

१०३७ भागलासी देवा धांव धांवणिया । दासविसी पायां पांडुरंगा १ गजेंद्र गणिका तुम्हां श्रमविलें । मी काय उगलें परदेशी २ सोळा सहस्त्र गोपी त्या उद्धरती । माझी कींव चित्तीं कां बा नये ३ नामा म्हणे आम्हां पुरे तुझा संग । वारंवार मग वारी कोण ॥ ४ ॥

१०३८ झणीं दृष्टि लागो तुझ्या सगुणपणा । जेणें माझ्या मना बोध केला १ अनंता जन्मींचें विसरलों दुःख । पाहतां तुझें मुख पांडुरंगा २ योगियांच्या ध्यानीं ध्यातां नातुडसी । तो तूं आम्हांपाशीं मागें पुढें ३ नामा म्हणे जीवें करीन निंबलोण । विटेसहित चरण वोवाळीन ॥ ४ ॥

१०३९ विषयीं आसक्त झालें मन माझें । करीं तुझें ध्यान पंढरीराया १ नाथिलें संकल्प करी नानाविध । तेणें थोर खेद पावतसे १ ऐसा मी अपराधी दुराचारी देवा । भेटसी केशवा कवणेपरी ३ आयुष्य सरे परि न सरे कल्पना । भोगवी यातना नानाविध ४ जन्ममरण कष्ट भोगितां संकटीं । होतसे हिंपुटी येरझारीं ५ मायामोहरत भ्रांत माझें चित्त । चुकलों निजहित नारायणा ६ तूं अनाथ कैवारी म्हणोनी धांवा करी । सोडवी मुरारी म्हणे नामा ॥ ७ ॥

१०४० तुझिया चरणाचें तुटतां अनुसंधान । नेलें माझें मन षड्वर्गीं १ धांव गा विठ्ठला सोडवी आपुला दास । थोर कासावीस केलें बापा २ कर्म

कुळाचार क्रोध हा अनिवार। मदें निरंतर भ्रांत केलें ३ मत्सरें तुजसीं दुराविलें देवा। लोभें केला गोंवा गर्भवासीं ४ दंभ रसातळीं जातसे घेऊनि। विश्वचक्षु होऊनि पाहासी कैसा ५ नामा म्हणे मज तुझाचि भरंवसा। अनाथा कोंवसा होसी देवा ॥ ६ ॥

१०४१ संसारीच्या आह्मा आहाळलों भारी। निववीं गा श्रीहरी अमृतदृष्टीं १ अनाथ अपराधी दुर्बळ दुराचारी। कृपाळुवा हरी तारी मज २ नामा म्हणे विठो कृपेचा कोंवळा। जाणसी कळवळा अनाथाचा ॥ ३ ॥

१०४२ रमासिंधुमाजीं सौंदर्याची धणी। ब्रीदें चक्रपाणी मिरविसी १ मेघ देहाकृती घनःश्याम मूर्ति। नटतसे भक्तीं भक्तजना २ भाक देऊनिया गौळीयाचे घरीं। गाई निरंतरीं चारीतसे ३ इंद्र वेडावला मुनि थोर थोर। नकळेचि पार म्हणे नामा ॥ ४ ॥

१०४३ पांचमुखीं रुद्र स्वयें करी स्तुति। चहूं मुखीं कीर्ति वर्णी ब्रह्मा १ देवी देव सर्व विस्मयो पावती। विठोबाची ख्याती कोण वानी २ परिक्षितीसाठीं प्राण त्यजी सर्व। रावणाचें गर्व स्वयें हाणी ३ नामा म्हणे तुज सकळ समान। माझे दोष गुण मानी काय ॥ ४ ॥

१०४४ भिऊनि रिघीजे समर्थाचे पोटीं। विषयांची तो भेटी नको मज १ तैसा मी शरण आलोंसें केशवे। मज त्वां राखावें पायांतळीं २ नको उदासीन राखों अभिमान। माझें आगमन विचारी कां ३ तुझेनि होईल तेंच मी मागेन। न सोडी चरण अहर्निशीं ४ अविद्या अपार संचरली देवा। आम्हासी कुढावा नाहीं कोणी ५ देवा आतां मज नको गर्भवास। नामा विष्णुदास विनवीतसे ॥ ६ ॥

१०४५ नावडे प्रपंच तापत्रय माया। येई धांवोनिया केशिराजा १ भवभयें फार भ्यालों जन्मांतरा। चौऱ्यांशीचा फेरा चुकवितां २ सत्कथा श्रवण नामसंकीर्तन। न घडे भजन मज देवा ३ नवविधा भक्ति कोणें केली कैसी। नामा म्हणे ऐसी दावी मज ॥ ४ ॥

## श्रीजनाबाई

१०४६ येगे माझे विठाबाई। कृपादृष्टीनें तूं पाहीं १ तुजविण न सुचे कांहीं। आतां मी वो करूं काई २ माझा भाव तुजवरीं। आतां रक्षी नानापरी ३ येई सखये धांउनी। म्हणे नामयाची जनी ॥ ४ ॥

१०४७ सख्या घेतलें पदरीं। आतां न टाकावें दुरीं १ थोरांचीं उचितें।

हेंचि काय सांगों तूंतें २ ब्रम्हियाच्या ताता। सज्जना लक्षुमीच्या कांता ३ आपुली म्हणवूनि। आपंगावी दासी जनी ॥ ४ ॥

• • • १०४८ गंगा गेली सिंधूपाशीं। त्यानें अव्हेरिलें तिसी १ तरी तें सांगावें कवणाला। ऐसें बोलें बा विठ्ठला २ जळ कोपें जळचरा। माता अव्हेरी लेंकुरा ३ जनी म्हणे शरण आलें। अव्हेरितां ब्रीद गेलें ॥ ४ ॥

१०४९ माझी आंधळ्याची काठी। आडकली कवणें बेटीं १ आतां सांगूं मी कवणासी। धांवे पावें हृषीकेशी ९ तुजवांचूनीं विठ्ठला। कोणी नाहीं रे मजला ३ माथा ठेवीं तुझे चरणीं। म्हणे नामयाची जनी ॥ ४ ॥

१०५० कां गा न येसी विठ्ठला। ऐसा कोण दोष मला १ माय बाप तूंचि धनी। मला सांभाळीं निर्वाणीं २ त्वां बा उद्धरिले थोर। तेथें काय मी पामर ३ दीनानाथा दीनबंधू। जनी म्हणे कृपासिंधू ॥ ४ ॥

१०५१ अगा रुक्मिणीनायका। सुरा असुरां प्रिय लोकां १ ते तूं धांवे माझे आई। सखे साजणी बिठाबाई २ अगा शिवाचिया जपा। मदनताता निष्पापा ३ आपुली म्हणवुनी। आपंगावी दासी जनी ॥ ४ ॥

१०५२ नाहीं केली तुझी सेवा। दुःख वाटतसे माझ्या जीवा १ नष्ट पापीण मी हीन। नाहीं केलें तुझें ध्यान २ जें जें दुःख झालें मला। तें त्वां सोसिलें विठ्ठला ३ रात्रंदिवस मजपाशीं। दळूं कांडूं लागलासी ४ क्षमा करावी देवराया। दासी जनी लागे पायां ॥ ५ ॥

१०५३ अहो नारायणा। मजवरीं कृपा कां कराना १ मी तों अज्ञानाची राशी। म्हणोन आलें पायांपाशीं २ जनी म्हणे आतां। मज सोडवी कृपावंता ॥ ३ ॥

१०५४ आधीं घेतलें पदरीं। आतां न धरावें दुरीं १ तुम्हा थोराचें उचितें। हेंचि काय सांगूं तूंतें २ अहो ब्रह्मयाच्या ताता। सखया लक्षुमीच्या कांता ३ दयेच्या सागरा। जनी म्हणे अमरेश्वरा ॥ ४ ॥

१०५५ आम्ही जावें कवण्या ठाया। न बोलसी पंढरीराया १ सरिता गेली सिंधूपाशीं। जरी तो ठाव न दे तिसी २ जळ कोपलें जळचरासी। माता न घे बाळकासी ३ म्हणे जनी आलें शरण। जरीं त्वां धरिलेंसे मौन ॥ ४ ॥

१०५६ ऐक बापा हृषीकेशी। मज ठेवीं पायांपाशीं १ तुझें रूप पाहिन डोळां। मुखीं नाम वेळो वेळां २ हातीं धरिल्याचि लाज। माझें सर्व करीं काज ३ तुजविण देवराया। कोणी नाही रे सखया ४ कमळापति कमळ-पाणी। दासी जनी लागे चरणीं ॥ ५ ॥

१०५७ पोट भरोनि व्यालासी। मज सांडुनी कोठें जासी १ धीरा

तुझें १ सुख दुःख तुज देईन भोगितां । मग मज चिंता कासयाची २ तुझा दास म्हणवोन मी अंकिला । भोगितां विठ्ठला गर्भवास ३ कासया मी तुज भाकितों करुणा । तारी नारायणा म्हणऊनी ४ तुका म्हणे तुज येऊं पाहे उणें । तारिसील तेणें आम्हां तयां ॥ ५ ॥

१६८१ तुज ऐसा कोणी न देखें उदार । अभय दानशूर पांडुरंगा १ शरण येती त्यांचे न विचारिसी दोष । न मागतां त्यांस अढळ देसी २ धांवसी आडणीं ऐकोनियां धांवा । कइवारें देवा भक्तांचिया ३ दोष त्यांचे जाळी कल्पकोटिवरी । नामासाठीं हरि आपुलिया ४ तुका म्हणे तुज वाणूं कैशापरी । एक मुख हरी आयुष्य थोडें ॥ ५ ॥

१६८२ वाढवावा पुढें आणीक प्रकार । एकचि तें फार रुचि नेदी १ नीच नवें लेणें देह हा पवाडा । पालट रोकडा वरावरी २ दिसे शोभिवंत सेवेनें सेवक । स्वामीची ते लोकत्रयीं कीर्ति ३ तुका म्हणे आजी पाववा संतोष । करूनि कीर्तिघोष नाचईन ॥ ४ ॥

१६८३ बोलिलेंचि बोले पडपडताळुनि । उपजत मनीं नाहीं शंका १ बहुताची माय बहुत कृपाळ । साहोनि कोल्हाळ बुझांविसी २ बहुताच्या भावें वांटिसी भातुकें । बहु कवतुकें खेळविसी ३ तुका म्हणे ऐसें जाणतसों वर्म । करणें तो श्रम न वजे वांया ॥ ४ ॥

१६८४ चित्त घेऊनियां तूं काय देसी । ऐसें मजपाशीं सांग आधीं १ तरिच पंढरीराया करिन साटोवाटी । जेणें जया तुटी येईल तें २ ऋद्धि-सिद्धी कांहीं दाविसी अभिळास । नाहीं मज आस मुक्तीचीही ३ तुका म्हणे तुझें माझें घडे तर । भक्तीचा भाव रे देणें घेणें ॥ ४ ॥

१६८५ कोणी एकाचिया पोरें केली आळी । ठावे नाहीं पोळी मागे देखीं १ बुझाविलें हातीं देउनी खापर । छंद करकर वारियेली २ तैसें नको करूं मज कृपावंता । काय नाहीं सत्ता तुझे हातीं ३ तुका म्हणे मायबापाचें उचित । करावें स्वहित बाळकाचें ॥ ४ ॥

१६८६ न कळसी ज्ञाना न कळसी ध्याना । न कळसी दर्शना धांडोळितां १ न कळसी आगमा न कळसी निगमा । न बोलवे सीमा ब्रह्मादिकां २ तुका म्हणे तुझा नाहीं अंतपार । म्हणोनि विचार पडला मज ॥ ३ ॥

१६८७ तुज ऐसा कोण उदाराची रासी । आपुलेंचि देसी पद दासा १ शुद्ध हीन कांहीं न पाहासी कुळ । करिसी निर्मळ वास देहीं २ भावें हें कदान्न खासी त्याचे घरीं । अभक्ताच्या परी नावडती ३ नवजासी जेथें दुरीं दवडितां । न येसी जो चित्ता योगियांच्या ४ तुका म्हणे ऐसीं ब्रीदें तुझीं खरीं । बोलतील चारी वेद मुखें ॥ ५ ॥

१६८८ तुम्हां उद्धरणें फार। मज दुसरी नाहीं थार १ आतां जैसें तैसें सोसा। काय करणें हृषीकेशा २ बरें न दिसेल ओळीं। एका अन्न एका गाळी ३ लावितां आभार। तुका विसरलेती फार॥ ४ ॥

१६८९ आम्ही उतराई। भाव निरोपोनि पायीं १ तुम्हीं पुरवावी आळी। करावी ते लडिवाळी २ आमचा हा नेम। तुम्हां उचित हा धर्म ३ तुका म्हणे देवा। जाणों सांगितली सेवा ॥ ४ ॥

१६९० करुणा बहुत तुझिया अंतरां। मज विश्वंभरा कळों आलें १ पक्षियासी तुझें नाम जें ठेविलें। तें उद्धरिले गणिकेशीं २ कुंटिणी ते दोष बहु आचरिली। नाम घेतां आली करुणा तुज ३ हृदय कोमल तुझें नारायणा। ऐसें बहुतां जनां तारियेले ४ तुका म्हणे सीमा नाहीं तुझे दये। कोमल हृदय पांडुरंगा ॥ ५ ॥

१६९१ होउनि कृपाळ। भार घेतला सकळ १ तूंचि चालविसी माझें। भार सकळही ओझें २ देह तुझ्या पायीं। ठेवुनि झालों उतराई ३ कायावाचामनें। तुका म्हणें दुजें नेणें ॥ ४ ॥

१६९२ शिकवूनि बोल। केलें कवतुक नवल १ आपणियां रंजविलें। बापें माझिया विठ्ठलें २ हातीं प्रेमाचें भातुकें। आम्हां देऊनियां निकें ३ तुका करी टाहो। पाहे रखुमाईचा नाहो ॥ ४ ॥

१६९३ अनाथाची तुम्हां दया। पंढरीराया येतसे १ ऐसी ऐकोनिया कीर्ति। बहु विश्रांति पावलों २ अनाथाच्या धांवा घरा। नामें करा कुडावा ३ तुका म्हणे सवघड हित। ठेवूं चित्त पायापें ॥ ४ ॥

१६९४ लोहचुंबकाच्या बळें। उभें राहिलें निराळें २ तैसा तूंचि आम्हांठायीं। खेळतोसी अंतर्बाहीं २ भक्ष अग्नीचा तो दोरा। त्यासि वांचवी मोहरा ३ तुका म्हणे आधीलपणें। नेलीं लांकडें चंदनें ॥ ४ ॥

१६९५ उरलें तें भक्तिसुख। डोळां मुख पाहावें १ अंतरींचें कां हो नेणा। नारायणा माझिया २ पुरवा तैसी केली आळी। बळी जगदानिया ३ हातीं घेऊनि चोरां भातें। दावा रितें बाळका ४ साजत हें थोरपण। नाहीं दीनवत्सला ५ शाहाणें तरी लाड दावी। बाळ जेवीं मातेसी ६ तुका म्हणे पांडुरंगा। ऐसें पैं गा आहे हें ॥ ७ ॥

१६९६ वर्णूं महिमा ऐसी नाहीं मज वाचा। न बोलवे त्याचा पार तुझा १ ठायींची ही काया ठेविली चरणीं। आतां ओवाळूनि काय सांडूं २ नाहीं भाव ऐसा करूं तुझी सेवा। जीव वाहूं देवा तोही तुझा ३ मज माझें कांहीं न दिसे पाहतां। जें तुज अनंता समर्पावें ४ तुका म्हणे आतां नाहीं मज थार। तुझे उपकार फेडावया ॥ ५ ॥

१६९७ शिणलेती सेवकां देऊनी इच्छादान। केला अभिमानें अंगीकार १ अहो दीनानाथा आनंदमूर्ती। तुम्हांसी शोभती ब्रीदें ऐसीं २ बहुतांनीं विनविलें बहुता प्रकारीं। सकळां ठायीं हरी पुरलेती ३ तुका म्हणे अगा कुटुंबवत्सला। कोण तुझी लीळा जाणे ऐसी ॥ ४ ॥

१६९८ पाळियेले लळे। माझे विठ्ठले कृपाळे १ बहु जन्माचें पोसणें। सरतें पायापाशीं तेणें २ सवे दिली लागों। भातें आवडीचें मागों ३ तुका म्हणे भिन्न। नाहीं दिसों दिलें क्षण ॥ ४ ॥

१६९९ आपुलें गांवींचें न देखेसें झालें। परदेशी एकलें किती करूं १ म्हणऊनी पाहे मूळ येतां वाटे। जीवलग भेटे कोणी तरी २ पाहतां अवघ्या दिसतील दिशा। सकळही वोसा दृष्टीपुढें ३ तुका म्हणे कोणी न सांगे वारता। तुझी वाटे चिंता पांडुरंगा ॥ ४ ॥

१७०० लागों नेदी बोल पायां तुझ्या हरी। जीव जावों परी न करी आन १ परनारी मज रखुमाईसमान। वमनाहूनि धन नीच मानीं २ तुका म्हणे याची लाज असे कोणा। सहकारी दीना ज्याची तया ॥ ३ ॥

१७०१ जन मानवलें वरीं बाह्यात्कारीं। तैसा मी अंतरीं नाहीं झालों १ म्हणुनी पंढरीनाथा वाटतसे चिंता। प्रगट बोलतां लाज वाटे २ संतां ब्रम्हरूप जालें अवघे जन। ते माझे अवगुण न देखती ३ तुका म्हणे मी तों आपणांसी ठावा। आहे बरा देवा जैसा तैसा ॥ ४ ॥

१७०२ काय तुझे उपकार पांडुरंगा। सांगों मी या जगामाजीं आतां १ जतन हें माझें करूनि संचित। दिलें अवचित आणूनियां २ घडल्या दोषांचें न घालीच भरी। आली यास थोरी कृपा देवा ३ नव्हतें ठाउकें आइकिलें नाहीं। न मागतां पाहीं दान दिलें ४ तुका म्हणे याच्या उपकारासाठीं। नाहीं माझे गांठीं कांहीं एक ॥ ५ ॥

१७०३ पाखांड्यांनीं पाठी पुरविला दुमाला। तेथें मी विठ्ठला काय बोलों १ कांद्याचा खाणार चोजवी कस्तुरी। आपण भिकारी अर्थ नेणें २ न कळे ते मज पुसती छळूनी। लागतां चरणीं न सोडिती ३ तुझ्या पायांविण दुजें नेणें कांहीं। तूंचि सर्वाठायीं एक मज ४ तुका म्हणे खीळ पडो त्याच्या तोंडा। किती बोलों भांडां वादकांशीं ॥५॥

१७०४ त्रासला हा जीव संसारींच्या सुखा। तुजविण सखा नाहीं कोणी १ ऐसें माझें मनीं वाटे नारायणा। घालावी चरणावरीं मिठी २ कई तें सुंदर देखोनि रूपडें। आवडीच्या कोडें आळंगीन ३ नाहीं पूर्वपुण्य मज पामरासी। म्हणोनि पायांसी अंतरलों ४ अलभ्य लाभ कैंचा संचिता वेगळा। विनवी गोपाळा दास तुका ॥ ५ ॥

१७०५ सोंवळा होऊं तों वोंवळें जडलें। सांडीमांडीं बोल तोंडीं बीजीं १ एकसरी केली कळिवरें साटी। आतां नको तुटीं पायांसवें २ संकल्पीं विकल्प पापाचा सुकाळ। रज्जुसर्प मूळ मरणाचें ३ तुका म्हणे हें तूं ब्रह्मांड चाळिता। मी कां करूं चिंता पांडुरंगा ॥ ४ ॥

१७०६ पाहा हो देवा कैसें जन। भिन्न भिन्न संचितें १ एक नाहीं एका-ऐसें। दावी कैसें शुद्ध हीन २ पंचभूतें एकी राशीं। सूत्रें कसीं खेळवी ३ तुका म्हणे जो जे जाती। तैसी स्थिति येतसे ॥ ४ ॥

१६०७ धन्य बा ह्या ऐशा नारी। घरीं दारीं नांदती १ चोरूनिया तुज-पाशीं। येतां त्यांसी न कळतां २ दोन्हीं ठायीं समाधान। सम कठिण वहुतचि ३ तुका म्हणे जीवासाठीं। दुर्लभ भेटी ते देवा ॥ ४ ॥

१७०८ चरणाचा महिमा। हा तो तुझ्या पुरुषोत्तमा १ अंध पारिखी माणिकें। बोलविशी स्पष्ट मुकें २ काय नाहीं सत्ता। तुझ्या हातीं पंढरीनाथा ३ तुका म्हणे मूढा। मज चेष्टविलें जडा ॥ ४ ॥

१७०९ कैसीं दिसों बरीं। आम्ही आळवितां हरि १ नाहीं सोंग अलं-कार। दास आला संवसार २ दुःख आम्हां नाहीं चिंता। हरिचे दास म्हणवितां ३ तुका म्हणे देवा। ऐसीं झालों करितां सेवा ॥ ४ ॥

१७१० माझे माथां तुझा हात। तुझे पायीं माझें चित्त १ ऐसी पडि-येली गांठी। शरीरसंबंधाची मिठी २ येरयेरांपाशीं। सांपडोन गेलों ऐसीं ३ तुका म्हणे सेवा। माझी कृपा तुझी देवा ॥ ४ ॥

१७११ मागायाची नाहीं इच्छा। जो मी ऐसा संकोचों १ लटकियाची न करूं स्तुति। इच्छा चित्तीं धरूनी २ हिशोबें तें आलें ध्यावें। हें तों ठावें सकळांसी ३ तुका म्हणे स्वामीसेवा। येथें देवा काशाची ॥ ४ ॥

१७१२ आम्ही बोलों तें तूज कळे। एक दोहीं ठायीं खेळे १ काय परिहाराचें काम। जाणें अंतरींचें राम २ कळोनिया काय चाड। माझी लोकांसी बडबड ३ कारण सर्वें एका। अवघें आहे म्हणे तुका ॥ ४ ॥

१७१३ कौतुकाची सृष्टी। कौतुकेंचि केली कष्टी १ मोडे तरी भलें खेळ। फांके फांकिल्या कोल्हाळ २ जाणणियासाठीं। भय सामावलें पोटीं ३ तुका म्हणे चेता। होणें तें तूंच आइता ॥ ४ ॥

१७१४ कोण आमचीं योगतपें। करूं बापें जाणावीं १ गीत संतसंगें गाऊं। उभीं ठाऊं जागरणीं २ आमुचा तो नव्हे लाग। करूं त्याग जावया ३ तुका म्हणे इंद्रियांसी। येचि रसीं रंगवूं ॥ ४ ॥

१७१५ प्रीती करी सत्ता। बाळा भीती मातापिता १ काय चाले

त्यासीं वळ । आळी करितां कोल्हाळ २ पदरीं घाली मिठी । खेदी मागें पुढें लोटी ३ बोले मना आलें । तुका साहिलें विठ्ठलें ॥ ४ ॥

१७१६ भला म्हणे जन । परि नाहीं समाधान १ माझें तळमळी चित्त । अंतरलें दिसे हित २ कृपेचा आधार । नाहीं दंभ झाला भार ३ तुका म्हणे कृपे । अंतराय कोण्या पापें ॥ ४ ॥

१७१७ हे माझी मिराशी । ठाव तुझ्या पायांपाशीं १ याचा धरीन अभिमान । करीन आपुलें जतन २ देऊनियां जीव । बळें साधिला हा ठाव ३ तुका म्हणे देवा । जुन्हाट हे माझी सेवा ॥ ४ ॥

१७१८ दीप घेऊनियां धुंडिती अंधार । भेटे हा विचार अघटीत १ विष्णुदास आम्ही न भ्यों कळिकाळा । भुलों मृगजळा न घडे तें २ उधळतां माती रविकळा न मळे । हें कैसें न कळे भाग्यहीना ३ तुका म्हणे तृणें झांके हुताशन । हें तव वचन वाउगेंचि ॥ ४ ॥

१७१९ कोण जाणे कोणा घडे उपासना । कोण या वचनाप्रति पावे १ आतां माझा श्रोता वक्ता तूंचि देवा । करावी ते सेवा तुझीच म्यां २ कुशळ चतुर येथें न सरते । करितील रिते तर्क मतें ३ तुका म्हणे जालें पेणें एके घरीं । मज आणि हरी तुम्हां गांठी ॥ ४ ॥

१७२० माझें मज आतां न देखे निरसतां म्हणवूनि आधार केला । संसाराची आस सांडूनि लौकिक जीवभाव तुज दिला । नव्हती माझी कोणी मी कवणाचा अर्थ मोहो सांडवला । तारीं मारीं करीं भलतें दातारा होउन तुझा आतां ठेलोंरे १ असो माझें कोडें तुज हें सांकडें मी असेन निवाडें सुखरूप । बाळकासी चिंता काय पोटवेथा जया शिरीं मायबाप २ पापपुण्यें श्रुति आटिल्या । शास्त्रांस न लगेचि ठाव । विधिनिषेधें गोविलीं पुराणें वेदांसी तो अहंभाव । ओंकाराचें मूळ व्यापिलें माया तेथें न धरवेच भाव । म्हणवून कावाड सांडिलें उपासतां धरिलें तुझेंचि नांव ३ तनमनइंद्रियें ठेवूनि राहिलों सर्व आशा तुझे पायीं । तप तीर्थ दान करवूं कवणाहातीं आधीन तें मज काई । आहिक्य परत्रें चाड नाहीं सर्वथा जन्म सदा मज देई । मायामोहपाश करीं विष तैसें तुका म्हणे माझ्या ठायीं ॥ ४ ॥

१७२१ आळवितां बाळें । माते तें सुख आगळें १ द्यावें आवडीं भातुकें । पाहे निवे कवतुकें २ लेववूनि अळंकार । दृष्टि करावी सादर ३ आपुलिया पदीं । बैसवूनि कोडें वंदी ४ नेदी लागों दिठी । उचलोनि लावी कंठीं ५ तुका म्हणे लाभा । वारी घ्यावें पद्मनाभा ॥ ६ ॥

१७२२ जन पूजी याचा मज कां आभार । हा तुम्ही विचार जाणा देवा १ पत्र कोण मानी बंदितील सिक्का । गौरव सेवका त्याचिमुळें २ मी

मीपणें होतों जनामधीं आधीं । कोणें दिलें कधीं काय तेव्हां ३ आतां तूं भोगितां सर्व नारायणा । नको आम्हां दीनां पीडा करूं ४ आपुलिया हातें देसील मुशारा । तुका म्हणे खरा तोचि आम्हां ॥ ५ ॥

१७२३ बाळ काय जाणे जीवनउपाय । मायबाप वाहे सर्व चिंता १ आइतें भोजन खेळणें अंतरीं । अंकिताचे शिरीं भार नाहीं २ आपुलें शरीर रक्षितां न कळे । सांभाळूनि लळे पाळी माय ३ तुका म्हणे माझा विठ्ठल जनिता । आमुची ते सत्ता तयावरी ॥ ४ ॥

१७२४ बोलिलों तें आतां । कांहीं जाणतां नेणतां १ क्षमा करावे अन्याय । पांडुरंगे माझे माय २ स्तुति निंदा केली । लागे पाहिजे साहिली ३ तुका म्हणे लाड । दिला तैसें पुरवा कोड ॥ ४ ॥

## श्रीकान्होबामहाराज

१७२५ बहु बोलणें नयें कामा । बाउगें तें पुरुषोत्तमा । एकाचि वचनें आम्हां । काय सांगणें तें सांग १ देणें आहे कीं भंडाई । करणें आहे सांग भाई । आतां भीड कांहीं । कोणी न धरी सर्वथा २ मागें गेलें जें होउनी । असो तें धरित नाहीं मनीं । आतां पुढें येथूनी । कैसा काय विचार ३ सारखी नाहीं अवघी वेळ । हें तों कळतें सकळ । तुकयाबंधू म्हणे खळखळ । करावी तें उरेल ॥ ४ ॥

१७२६ अवघीं तुज बाळें सारिखीं नाहीं तें । नवल वाटतें पांडुरंगा १ म्हणतां लाज नाहीं सकळांची माउली । जवळीं धरिलीं एकें दुरीं २ एका सुख द्यावें घेऊनी वोसंगा । एके दारीं गळा श्रमविती ३ एकां नवनीत पाजावें दाटून । एकें अन्न अन्न करितील ४ एकें वाटतील न वजावीं दूर । एकांचा मत्सर जवळीं येतां ५ तुकयाबंधु म्हणे नावडती त्यांस । कासया व्यालास नारायणा ॥ ६ ॥

१७२७ कनवाळ कृपाळ । उदार दयाळ मायाळ । म्हणवितोसी परि केवळ । गळेकाटु दिसतोसी १ काय केलें होतें आम्हीं । सांग तुझें एक ये जन्मीं । जालासी जो स्वामी । एवढी सत्ता करावया २ भलेपणाचा पवाडा । बरा दाविला रोकडा । करुनी बंधु वेडा । जोडा माझा विखंडिला ३ तुकयाबंधु म्हणे भला । कैसें म्हणताती तुजला । जीव आमुचा नेला । अंत पाहिला कांहीं तरी ॥ ४ ॥

## श्रीनामदेवमहाराज

१७२८ घेसी तेव्हां देसी ऐसा अससी उदार । काय जाऊनियां तुझें

कृपणाचे द्वारां १ उच्छिष्टाचीं शितें न टाकिसीं बाहेरीं। कोणी दिधली देवा एवढी भूषणाची थोरी २ सोडीं ब्रीद देवा आतां नव्हेसी अभिमानी। पतीतपावन नाम तुझें ठेवियेलें कोणी ३ नामा म्हणे देवा तुझें नलगे मज कांहीं। प्रेम असों द्यावें कीर्तनाचें ठायीं ॥ ४ ॥

१७२९ वाघाचिया गळां शेळी बांधोनियां। तैसी तुझी माया लोभापर १ कां मज संसारीं घालितोसि देवा। कैसें तुझिया जीवा गोड वाटे २ विषयाचे कल्लोळ पाजिसी केवळ। हृदय कोमळ कैसें तुझें ३ नामा म्हणे मज आदि अंतु एकु। जननी जनकु पंढरिरावो ॥ ४ ॥

१७३० उलिसा प्रपंच परि हा लटिका। तेणें तुज व्यापका झांकियेलें १ तैसियाच्या मज घालोनियां खेंवा। स्वामीद्रोहि देवा करिसी कैसा २ मेरुचिया गळां बांधोनि मशक। पाहसी कवतुक अनाथनाथा ३ नामा म्हणे देवा कळली तुझी माव। माझा मी उपाव करीन आतां ॥ ४ ॥

१७३१ लपालासि तरी नाम कैसें नेसी। आम्ही अहर्निशीं नाम गाऊं १ आम्हांपासूनियां जातां नये तुज। तें हें वर्म बीज नाम घोकूं २ आम्हांसी तों तुझें नामचि पाहिजे। मग भेटी सहजें देणें लागे ३ भोळीं भक्तं आम्हीं चुकलों होतों वर्म। सांपडलें नाम नामयासी ॥ ४ ॥

१७३२ देवा आम्हीं तुम्हां दिलें थोरपण। मानी हें वचन सत्य माझें १ पतीत अमंगळ तुम्हां झालों सहाय्य। विचारुनि पाहे खरें खोटें २ रोग व्याधि पीडा जनासि नसतां। कोण पाचारितां वैद्यालागीं ३ कल्पनेचे भूत झडपी या संसारीं। मानें पंचाक्षरी पाचारितां ४ नामा म्हणे विठो दैव येतें घरा। नको लावूं दारा पांडुरंगा ॥ ५ ॥

१७३३ जाणसी तें करीं कृपाळुवा हरी। लाज सर्वांपरी आहे तुज १ आरुष सावडें मी कांहीं नेणें वेडें। जन्मोजन्मीं सांकडें केलें तुज २ बहुकीर्ति ऐकिली बहुतांचे मुखीं। बहुत केले सुखी शरणागत ३ नाहीं तुझी सेवा केली मनोभावें। लोभ दंभ गर्व भ्रांति सदा ४ नामा म्हणे मज होताती विपत्ति। सोडवी श्रीपति येथोनियां ॥ ५ ॥

१७३४ प्रेमपिसें भरलें अंगीं। गीतसंगें नाचों रंगीं १ कोण वेळे काय गाणें। हें तों भगवंता मी नेणें २ वारा वाजे भलतया। तैसी माझी रंगछाया ३ टाळ मृदंग दक्षिणेकडे। आम्ही गातों पश्चिमेकडे ४ बोले बाळक बोबडें। तरी तें जननीये आवडे ५ नामा म्हणे गा केशवा। जन्मोजन्मीं देई सेवा ॥ ६ ॥

१७३५ आम्हीं शरणागतीं सांडिली वासना। ते त्वां नारायणा अंगिकारिली १ म्हणोनि प्रसन्न व्हावया आमुतें। वोसरल्या चित्तें चाल-

विसी २ अज्ञान बाळकु ठकाविला ध्रुरु। तैसा मी अधिरु नव्हे जाण ३ लंकापति केला तुवां बिभीषण। झालासी उत्तीर्ण वाचाऋणें ४ उपमन्यें घेतला दुधाचात्री छंद। तैसा बुद्धिमंद नव्हे जाण ९ नामा म्हणे तैसा नव्हे मी अज्ञान। माग तुज देईन शरीर अवघें ॥ ६ ॥

१७३६ तुझ्या पायीं चित्त रंगलेसें माझें। नाहीं केशीराजें ऐसें केलें १ उठवितां काय होईल संतोष। मज अभाग्यास मोकलिलें २ प्रपंच कावाडीं घाली मज दृढ। नको वाडें कोडें झणीं देवा ३ नामा शिंपयाचा विनवी समस्तां। नको भंगूं आतां प्रेमपान्हा ॥ ४ ॥

१७३७ छंदाधिस्त हें मन माझें पंढरिनाथा। न सोडी सर्वथा पाय तुझें १ यासि काय करूं सांगा जी विठ्ठला। स्नेह कां लाविला पूर्वींहुनि २ कांसवीचीं पिलें राहोनि निराळीं। दृष्टि पान्हावली अमृतमय ३ तैसा मी जवळूनि असेन हो दूरी। दृष्टि मजवरीं असो द्यावी ४ तान्हें वत्स घरीं वनीं धेनू चरे। परतोनि हुंबरे क्षणक्षणां ५ नामा म्हणे सलगी करीन निकट। झणें मज वैकुंठपद देसी ॥ ६ ॥

## श्रीजनाबाई

१७३८ पुण्यवंत पाताळ लोकीं नेला। दरिद्री तो भाग्यवंत केला। चोरट्याचा बहु मान वाढविला। कीर्तिवानाचा अपमान केला १ धुंद झाला तुझा दरबार ॥ध्रु०॥ वैरियासी दिधली मोक्षसिद्धी। कपटिया दिधली महानिधी। सेवकाच्या हुंगा न मिळे चिंधी। चाळकासी त्रैलोक्य भावें वंदी २ पतिव्रता ती वृथा गुंतविली। वेश्या गणिका ती सत्यलोका नेली। कळी स्वकुळा लावियेली। यादववृंदा ही गोष्ट बरी नाहीं केली ३ सत्यवानाचा बहु केला छळ। कीर्तिवानाचें मारियेलें बाळ। सखा म्हणविसी त्याचें नासी बळ। जनी म्हणे मी जाणें तुझे खेळ ॥ ४ ॥

## श्रीएकनाथमहाराज

१५३९ पोटींचें बाळ अवगुणीं वोखटें। परी मायबापा स्नेह पैं मोठें १ यापरि उदरां आलों जी स्वामी। अवगुणाचा तरी नुपेक्षा तुम्ही २ गुण नाहीं तेथें कर्म कैंवी धड। तरी मायबापा वाटतसे कोड ३ एकाजनार्दनीं उदरस्थ साचें। म्हणोनि हरिदासा कौतुक त्याचें ॥ ४ ॥

१७४० शरणागता कृपाळु उदार पंढरीनाथा। जाणतसे खुणा अंतरींच्या १ तिहीं त्रिभुवनीं चाले एक सत्ता। म्हणोनि तत्त्वतां कींव भाकीं २

करुणाकर तुम्हीं भक्तांचें जीवन। हें आम्हां वचन श्रुतिवाक्य ३ एकाजनार्दनीं आलोंसे शरण। कायावाचां मन जडलें पायीं ॥ ४ ॥

१७४१ आम्हां तुमचा भरंवसा। सांभाळावें जगदीशा १ आपुली आपण जतन करा। ब्रीदावळी हे दातारा २ आम्ही पतितांनीं कोंडें। तुम्हां घातलें सांकडें ३ शरण एकाजनार्दनीं। मोक्ष मुक्ती तुमचे चरणीं ॥ ४ ॥

१७४२ उपमन्यु प्रल्हाद तारिलें आळींकें। मी तुझें लाडकें सानपणें १ नेणतीयासी धांवसी तूं त्वरां। शाहणें वेरझारा मरताती। एकाजनार्दनीं शरण एकपणीं। नेणतां जाणतां चरणीं तुझें देवा ॥ ३ ॥

## श्रीज्ञानदेवमहाराज

१७४३ यम नियम पाप पुण्य आम्हांसी आपण भलतेंचि करिसी। तुझिया थोरपणा विहुनि असावें कवणें शंकावें रायासी। प्रत्यक्ष जगीं बाटली नारी तिचें स्मरण लोकांसी। पुराणें डांगोरा पिटताती हें पतिव्रतापण तियेसी १ आवडे तें करिसी देवा कवण करी तुझा हेवा रे ॥ ध्रु० ॥ बहुतापरीं उणें ऐकिजे पांडवा सांगों या गोष्टी। पांचापासूनि जन्मले पांचै जण एका पत्नीच्या पाठीं। गोत्रवध करुनि राज्य करिती निश्वासि वंद्य शेवटीं। जन्मेजया ऐसें बोलिला सत्य तो पापिया जाला कुष्टी २ प्राण जाई तंव बोभाइला तुज पतन तया दशरथा। गणिका एक पाखरूं पोखिलें होतें पाचारिलें प्राण जातां। कीं तयेसी उर्ध्वगति ऐसीं बोलतीं पुराणें कासया न मिळे पाहतां। बोलणें खुंटलें तुजपासीं देवा वेव्हार नाहीं सर्वथा ३ तपाचा जो राशी पुण्यपणें थोर। तीर्थरूप सर्वा तीर्थमंत्राचा अवतार। देव आणि शक्ति सूर्य तैसा विचारितां। तो मांडव्यऋषि वाहिला शूळीं एक ऊं जाला वधितां। पुत्रा पाचारिलें पापियें दुर्जनें तो वैकुंठीं आजामेळु खरता रे रे॥ यज्ञमुखीं अवदानें देती त्या करिसी वांकडें तोंड। लोणी चोरावया जासी घरोघरीं उघडिसी त्यांचीं कवाडें। छपन्न कोटि यादव संगाति हे तुझे ते त्वां केलें शापावरपडे। कोळियानें तुज विंधिलें पायीं त्यासी सायुज्यता कोडें रे ५ अष्टांगयोगें शरीर दंडिलें तुजलागीं जालीं पिसीं। पुत्रदाराधन सांडुनियां जन हिंडताती वनवासी। ध्याती वाती पूजिती तूंतें त्यांसी निजपद सायासीं। विष पाजूं आली पूतना राक्षसी सायुज्यता देणें तियेसी रया ६ वारया मोट बांधेल कोण आकाशा कुंप कायसा। सूर्यापुढें दिवा लाऊनियां चालणें वाऊगाची शीण जैसा। विचित्र तुझें रूप अव्हेरून जासी सर्वथा। ज्ञानदेव म्हणे देवाधिदेवा जग भांबावलें ऐसिया माया रया ॥ ७ ॥

१७४४ फळाचें बीज कीं बीजाचें फळ। म्हणोनि पत्र पुष्प मूळ चोजवेना १ ऐसी ही रचना नकळे गा देवा। सिद्धांतु अनुभव साक्ष देतो २ मृत्तिकेची पृथ्वी कीं पृथ्वीची मृत्तिका। या गति अनेकां चोजवेना ३ बापरखुमादेविवरु निरंतरीं। सबाह्यअभ्यंतरीं नांदुतसे ॥ ४ ॥

१७४५ काळा पैं गोवळु काळासि आलोट। नामामृतें पाठ भक्ता देहीं १ नित्य सुख आम्हां तपांचिया कोडीं। न लागती परवडी व्रतें तीर्थें २ सुलभ सोपारा सर्वांघटीं असती। साधुसंगें दिसती आम्हां रवा चैतन्याशेजारीं मन पैं मुरालें। सांवळें सोनुलें हृदयघटीं ४ बापरखुमादेवीवरु विठ्ठलराज। निवृत्तीनें बीज सांगितलें ॥ ५ ॥

१७४६ अवघां डोळां तुज म्यां पाहावें। अवघां श्रवणीं तुजचि ऐकावें १ अवघी मूर्ति तुजपें ध्यावें। अवघां चरणीं तुझ्या पंथीं चालावें २ रखमादेवीवरू अदट दाविला। माझ्या देहीं वाढला ब्रह्माकारें ॥ ३ ॥

१७४७ तुझिया गुणांसाठीं लागलों भजनापाठीं। तुझी सगुण गोठीं हृदयीं वसे ॥ मी म्हणे तें जीवन कीं निर्गुण चैतन्यघन। व्याप्य व्यापक स्थान दुजें नाहीं ॥ विश्वाकारें जगडंबरला। जो श्रुति नेति म्हणोनि ठेला ॥ हेंचि भावें विचारी भला। परि दृष्टी सगुण हृदयींची हे खूण परी न विसंबें तुझीया पायां रया १ तूं एकुची एकला बाहिजु भीतरीं। कोणा द्वैतपरी सांगों बापा ॥ म्हणोनि परापर स्थूळसूक्ष्म विचार। तो तुझा सगुणचि आधार मज वाटे। ह्मणोनि ते तुझी बुंथी हेंचि उरो आम्हां स्थिती। कीं द्वैताद्वैत भ्रांती न लगे मना २ तें तुझेनि सुखें पडिपाडें आणि हें मनची स्वयें उजाडें। जेथें थोडें बहू न निवडे ऐसें जाले। तेथें आपुलिये अंगा विसर पडोनि ठेलें। शेखीं सोंगचि तुझें दुणावलें रया ३ या मनाची भ्रांति फेडावया तो तुझा सगुणभाव मज गोड लागे। पाहाते पाहाणियामाजीं स्वयेंचि विस्तारलासी कीं देखणेंची तेणें होऊनी अंगें। त्रिपुटीसहित शून्याशून्य निमालें ॐकार मार्गीही हें न चले। रखुमादेवीवरु विठ्ठलें उदारें सुख भोगिजे येणें अंगें रया ॥ ४ ॥

१७४८ तुझी सेवा करीन मनोभावें वो। माझें मन गोविंदीं रंगलें वो १ नवसीये नवसीये माझे नवसीये वो। पंढरीचे दैवतें विठ्ठल नवासिये वो २ बापरखुमादेविवरें विठ्ठलें वो। चित्तचैतन्य चोरूनि नेलें वो ॥ ३ ॥

१७४९ निमीष नलगे मन वेधितां। येवढी तुझी स्वरूपता १ विठोबा नेणों कैसी भेटी। उरणें नाहीं जीवेसाठीं २ उरलें उपाधिकारणें। तें त्वां नेमिलें दरुशनें ३ निवृत्तिदासा वेगळें। सांगावया नाहीं उरलें ॥ ४ ॥

१७५० पाहे पां ध्वजेचें चिरगूट। राया जतन करितां कष्ट १ तैसा

मी एक पतीत। परि तुझा मुद्रांकित २ मसीपत्र तें केवढें। रावो चालवी आपुल्या पाडें ३ बापरखुमादेविवरदा। सांभाळावें आपुल्या ब्रीदा ॥ ४ ॥

१७५१ पावलों जी म्हणे देखिलें जें देखणें। गेली आधीं तेणें दृष्टि माझी १ उचललिया बाह्यां क्षेम देईन तया। गेली माझी माया देहत्यागें २ आनंदें स्फुंदत येती अश्रुपात। अगा गुरुनाथ देवराया ३ निवृत्तिदास म्हणे तूंतें जीवें वोवाळिलें। शिर निरोपिलें तुझ्या चरणीं ॥ ४ ॥

१७५२ कांहीं न करिजे तें तुझी सेवा। कांहीं न होसी तें तूं देवा १ नेणिजे तें तुझें रूप। जाणिजे तितुकें पाप गा देवा २ स्तुति करणें ते तुझी निंदा। स्तुतिजोगा नव्हेसि गोविंदा ३ बापरखुमादेविवरा विठ्ठला। एवढा लाभिलाषु कां दाविला ॥ ४ ॥

## श्रीसेनामहाराज

१७५३ पुत्राचिया ओढी बाप करी जोडी। वाळवुनि कुरवंडी आपणा करी १ मिरासीचा धनी करूनि ठेविला। भार तो वाहिला कडिये खांदीं २ घाली अलंकार कौतुक डोळां पाहे। ठेवा दावी काय आहे तोचीं ३ दुजियांनीं कोणी गांजितां तयासी। उदार जीवासी सेना म्हणे ॥ ४ ॥

१५५४ असतां वैकुंठासी। काय सांगे ऋषीकेशी। जाऊनि मृत्यु लोकासी। जन भक्तिसी लावीं कां १ आज्ञा वंदुनीया शिरीं। जन्मलों न्हावीयाचें उदरीं। वाचें नाम निरंतरीं। रामकृष्ण गोविंद २ कलियुगामाजीं जाण। सोपें हेंचि साधन। रामकृष्ण नारायण। ऐसें पुरुषोत्तम सांगत ३ सेना म्हणे देवाधिदेवा। आम्हीं करावी तुझी सेवा। हेंचि मागतों केशवा। नित्य रहावें मजपाशीं ॥ ४ ॥

१७५५ स्वभावें गाईन। आवडीनें तुझें नाम १ हाचि माझा निर्धार। न करी आणिक विचार २ लोळेन तुझिये अंगणीं। निर्लज्ज होउनि मनीं ३ रंगीं नाचेन मनापेसें। पाहिन श्रीमुख सरिसें ४ सेना म्हणे संकल्प जीवा। हाचि निर्धार हेवा ॥ ५ ॥

## श्रीचोखोबामहाराज

१७५६ ऊंस डोंगा परी रस नव्हे डोंगा। काय भुललासी वरलीया रंगा १ कमान डोंगी परी तीर नोहे डोंगा। काय भुललासी वरलिये रंगा २ नदी डोंगी परी जळ नव्हे डोंगें। काय भुललासी वरलिया रंगें ३ चोखा डोंगा परी भाव नव्हे डोंगा। काय भुललासी वरलिया रंगा ॥ ४ ॥

१७५७ यातीहीन मज म्हणती देवा । न कळे करूं तुमची सेवा १ आम्हां नीचाचें तें काम । वाचें गावें सदा नाम २ उच्छीष्टाची आस । संत दासाचा मी दास ३ चोखा म्हणे नारायणा । पदरीं घेतलें मज दीना ॥ ४ ॥

१७५८ आपुल्या आपण सांभाळोनी घ्यावें । आहे नाहीं ठावें तुम्हां सर्व १ वायांचि करणें लौकिकाचा गोंवा । कोठवरी देवा बोलणें हें २ अंगा नाहीं आलें तंव तें साहाले । खादलें पचलें तरी तें हित ३ चोखा म्हणे तुमचें तुम्हासी सांगणें । माझें यांत उणें काय होतें ॥ ४ ॥

## श्रीनरहरीसोनार

१७५९ देवा तुझा मी सोनार । तुझें नामाचा व्यवहार १ देह बागेसरी जाण । अंतरात्मा नाम सोनें २ त्रिगुणाची करूनी मूस । आंत ओतिला ब्रम्हरस ३ जीव शिव करूनी फुंकी । रात्रंदिवस ठोकाठोकी ४ विवेक हातवडा घेऊन । कामक्रोध केला चूर्ण ५ मन बुद्धीची कातरी । रामनाम सोनें चोरी ६ ज्ञान ताजवा घेउन हातीं । दोन्हीं अक्षरें जोखितीं ७ खांद्या वाहोनी पोतडी । उतरला पैलथडी ८ नरहरी सोनार हरीचा दास । भजन करी रात्रंदिवस ॥ ९ ॥

---

# प्रेमकलहपर



## श्रीतुकाराममहाराज

१७६० देवासीं पैं भांडों एकचित्त करूनी । आम्हांसी सज्जनीं सांगितलें १ आम्हां काय आतां देवें आडो परी । भेटी नेदी तरी सुखें नेदों २ तोचि नांदों सदा हरि पैं वैकुंठीं । आम्हां देशवटी देवों सुखें ३ देवें अभिमान चित्तांत धरिला । तरी तो एकला राहों आतां ४ चित्तीं धरोनि नाम असों सुखें येथें । हर्षें गाऊं गीत गोविंदाचें ५ तुका म्हणे सर्व देवाची नष्टाई । आम्हीं सुखें पाहीं डुलतसों ॥ ६ ॥

१७६१ पांडुरंगें पाहा खादलीसे रडी । परि नाम शेंडी धरिली आम्हीं १ आतां संतांनीं करावी पंचाईत । कोण हा फजितखोर येथें २ कोणाच्या अन्याय येथें आहे स्वामी । गर्जतसों आम्ही पातकीही ३ याचें पावनपण-

सोडवा जी तुम्ही । पतितपावन आम्ही आहों खरे ४ आम्ही तंव आहों अन्यायी सर्वथा । याची पावन कथा कैसी आहे ५ तुका म्हणे आम्हीं मेलों तरी जाणा । परि तुमच्या चरणा न सोडावें ॥ ६ ॥

१७६२ प्रीतिभंग माझा केला पांडुरंगा । भक्तिरस सांगा कां जी तुम्ही १ म्हणउनि कांहीं न ठेवींचि उरी । आलों वर्मावरीं एकाएकीं २ न देखोंचि काहीं परती माघारीं । उरली ते उरीं नाहीं मुळीं ३ तुका म्हणे आला अंतरासी खंड । तरि माझें तोंड खवळिलें ॥ ४ ॥

१७६३ निष्ठुरा उत्तरीं न धरावा राग । आहे लागभाग ठायींचाची १ तूं माझी जननी तूं माझा जनिता । रखुमाईच्या कांता पांडुरंगा २ मुळींच्या ठेवण्या आहे अधिकार । दुरावेनि दूर गेलों होतों ३ पोटींच्या आठवा पडिला विसर । कांहीं आला भार माथां तेणें ४ राखिला हा होता बहु चौघाचार । साक्षीनें वेव्हार निवडिला ५ तुका म्हणे कांहीं बोलणें नलगे । आतां पांडुरंगे तूं मी ऐसें ॥ ६ ॥

१७६४ आम्ही नरका जातां काय येईल तुझ्या हातां । ऐसा तूं अनंता विचारी पां १ तुज शरण आलियाचें काय हेंचि फळ । विचारा दयाळ कृपानिधी २ तुझें पावनपण न चलें आम्हांसी । ऐसें हृषीकेशी कळों आलें ३ आम्ही दुःख पावों जन्म मरण व्यथा । काय तुझ्या हातां येत असे ४ तुका म्हणे तुम्हीं खादली हो रडी । आम्हीं धरली शेंडी नाम तुझें ॥ ५ ॥

१७६५ आम्ही पतितांनीं घालावें सांकडें । तुम्हां लागे कोडें उगवणें १ आचरतां दोष न धरूं सांभाळ । निवाड उकल तुम्हां हातीं २ न घेतां कवडी करावा कुढावा । पाचारितां देवा नामासाठीं ॥ ३ ॥ दयासिंधू नाम पतितपावन । हें आम्हां वचन सांपडलें ४ तुका ह्मणे करूं अन्यायाच्या कोटी । कृपावंत पोटीं तूंचि देवा ॥ ५ ॥

१७६६ तरि कां मागें वायां कीर्ती वाढविली । जनांत आपुली ब्रीदावळी १ साच करितां आतां फिरसी माघारा । ठायींचें दातारा नेण-वेचि १ संतांसी श्रीमुख कैसें दाखविसी । पुढें मात त्यांसी सांगईन ३ घेईन डांगोरा तुझिया नामाचा । नव्हे अनाथांचा नाथ ऐसा ४ तुका म्हणे आम्हीं राहिलों मरोनि । तूं कां होसी धनी निमित्याचा ॥ ५ ॥

१७६७ कळलें माझा तुज नव्हे रे आठव । काय काज जीव ठेवूं आतां १ काय तूं करिसी माझिया संचिता । धिग हें अनंता झालें जिणें २ पतित पावन राहिलों या आशा । आइकोनि ठसा कीर्ति तुझी ३ आतां कोण करी माझा अंगिकार । कळलें निष्ठुर झालासी तूं ४ तुका म्हणे माझी मांडिली निरास । करितों जीवा नास तुजसाठीं ॥ ५ ॥

१७६८ जाय परता काय आणिला कांटाळा । बोला एक वेळां ऐसें तरी १ कांहो केली तुम्ही निष्ठुरता देवा । मानेना हे सेवा करितों ते २ भाग्यवंत त्यांसी सांगितल्या गोष्टी । तें नाहीं अदृष्टीं आमुचिया ३ तुज ऐसा स्वामी असोनि मस्तकीं । होतसे या चुकी संचिताची ४ तुका म्हणे तुम्हांपासूनि अंतर । न पडे नाहीं स्थिर बुद्धि माझी ॥ ५ ॥

१७६९ कामक्रोध माझे लावियेले पाठीं । बहुत हिंपुटी झालों देवा १ आवरितां तुझे तुज नावरती । थोर वाटे चित्तीं आश्चर्य हें २ तुझिया विनोदें आम्हां प्राणांसाटीं । भयभीत पोटीं सदा दुःखी ३ तुका म्हणे माझ्या कपाळाचा गुण । तुला हांसे कोण समर्थासी ॥ ४ ॥

१७७० तुझें नाम मुखीं तयासी विपत्ति । आश्चर्य हें चित्तीं वाटतसे १ काय जाणों देवा होसील निजला । नेणोंजी विठ्ठला मायबापा २ भवबंधनाचे तुटतील फांसे । तें येथें असें अव्हेरिलें ३ तुका म्हणे माझें दचकलें मन । वाटे वांयावीण श्रम केला ॥ ४ ॥

१७७१ झड मारोनियां बैसलों पंगतीं । उठवितां फजिती दातयाची १ काय तें उचित तुम्हां कां न कळे । कां हो झांका डोळे पांडुरंगा २ घेईन इच्छेनें मागोनि सकळ । नाहीं नव्हे काळ बोलायाचा ३ तुका म्हणे झालों माना अधिकारी । नाहीं लोक परी लाज देवा ॥ ४ ॥

१७७२ कवणाशीं भांडों कोण माझें साहे । कोण मज आहे तुजविण १ धरिलें उदास दूरदुरांतरें । सांडी एकसरें केली माझी २ आइकोन माझे नाइकसी बोल । देखोनियां खोळ बुंथी घेसी ३ तुका म्हणे एके गांवींची वसती । म्हणऊनि खंती वाटे देवा ॥ ४ ॥

१७७३ पापी म्हणों तरी आठवितों पाय । दोष बळी काय तयाहूनि १ ऐशा विचाराची घालीन कोंडणी । काय चक्रपाणी पहातोसी २ एक वेळ जेणें पुत्राच्या उद्देशें । घेतल्याचें कैसें नेलें दुःख ३ तुका म्हणे अहो वैकुंठनायका । चिंता कां सेवका तुमचिया ॥ ४ ॥

१७७४ नये ऐसें बोलों कठिण उत्तरें । सलगी लेंकुरें केलीं पुढें १ अपराध कीजे घडला तो क्षमा । सिकवा उत्तमा आमुचिया २ धरूं धावें आगी पोळेल तें नेणे । ओढिलिया होणें माते बाळा ३ तुका म्हणे भार ज्याचा जार त्यासी । प्रवीण येविशीं असा तुम्ही ॥ ४ ॥

१७७५ स्वप्नींचें हें धन हातीं ना पदरीं । प्रत्यक्ष कां हरि होऊं नये १ अजुनि कां करा चाळवाचाळवी । सावकाशें द्यावी सत्य भेटी २ बोलो-

नियां फेडा जीवींची काजळी । पाहेन कोमळीं चरणांबुजें २ तुका म्हणे माझ्या जीवींच्या जीवा । सारूनियां ठेवा पडदा आतां ॥ ४ ॥

१७७६ तुझिया विनोदें आम्हासी मरण । सोसियेला सीण बहु फेरे १ आतां आपणाचि येसी तें करीन । नाम हें धरीन तुझें कंठीं २ वियोगेंचि आलों उसंतीत वनें । संकल्प हें मनें वाहोनियां ३ तुका म्हणे वर्म सांपडलें सोपें । गोवियेलों पापें पुण्यें होतों ॥ ४ ॥

१७७७ करावा कांटाळा नव्हे हें उचित । आधींच कां प्रीत लाविये‍ली १ जाणतसां तुम्ही रूपाचें लाघव । आपुलाले जीव घेतें ऐसा २ काय म्हणऊनि आलेती आकारा । आम्हां उजगरा करावया ३ तुका म्हणे भीड होती आजिवरीं । आतां देवा उरी कोण ठेवी ॥ ४ ॥

१७७८ आमुचिया भावें तुज देवपण । तें कां विसरोन राहिलासी १ समर्थासी नाहीं उपकारस्मरण । दिल्या आठवण वांचोनिया २ चळण वळण सेवकाच्या बळें । निर्गुणाचें मुळें सांभाळावें ३ तुका म्हणे आतां आलों खंडावरीं । प्रेम देउनि हरी बुझवावें ॥ ४ ॥

१७७९ धिग जिणें त्याचा स्वामी हीनवर । मरण तें बरें भलें मग १ आइकाजी देवा ऐसी आहे नीत । काय तें उचित सांभाळावें २ देशोंदेशीं धाक जयाच्या उत्तरें । तयाचें कुतरें परि भलें ३ तुका म्हणे हें कां सुचलें उत्तर । जाणोनि अंतर ओळखावें ॥ ४ ॥

१७८० आमच्या कपाळें तुज ऐसी बुद्धि । धरावी ते शुद्धि योगां नये १ काय या राहिलें विनोदावांचून । आपुलिया भिन्न केलें आम्हां २ कोठें मूर्तिमंत दावी पुण्यपाप । काशासी संकल्प वाहावीसी ३ तुका म्हणे आतां आवरावा चेडा । लटिकीच पीडा पांडुरंगा ॥ ४ ॥

१७८१ तुम्ही बैसलेती निर्गुणाचे खोळे । आम्हां कां हे डोळे कान दिसे १ नाइकवे तुझी अपकीर्ति देवा । अव्हेरिली सेवा न देखवे २ आपुले पोटीं तो राखियेला वाव । आम्हांसी कां भाव अल्प दिला ३ तुका म्हणे दुःखी असें हें कळों द्या । पुढिलिया धंद्या मन नेघें ॥ ४ ॥

१७८२ निष्ठुर यासाठीं करितों भाषाण । आहेसी तूं सर्वजाण दाता १ ऐसें कोण दुःख आहे निवारिता । तो मी जाऊं आतां शरण त्यासी २ बैसलासी केणें करूनी एक घरीं । नाहीं येथें उरी दुसऱ्याची ३ तुका म्हणे आलें अवघेंचि पायांपें । आतां मायबापें नुपेक्षावें ॥ ४ ॥

१७८३ समर्थाचें बाळ केविलवाणें दिसे । तरी कोणा हांसे जन देवा १ अवगुणी जरी झालें तें वोंगळ । करावा सांभाळ लागे त्याचा २ तुका म्हणे तैसा मी एक पतित । परि मुद्रांकित झालों तुझा ॥ ३ ॥

१७८४ ऐसें कोण पाप बळी । जें जवळीं येऊं नेदी १ तुम्हां तंव होईल ठावें । नेदावें कां कळों हे २ कोण झाला अंतराय । कां ते पाय अंतरले ३ तुका म्हणे निमित्याचा । आला सुचा अनुभव ॥ ४ ॥

१७८५ आंधळ्याची काठी । हिरोनियां फडां लोटी १ हें कां देखण्या उचित । लाभ किंवा कांहीं हित २ साकर म्हणोनि माती । चाळवूनि द्यावी हातीं ३ तुका म्हणे वाटें । देवा पसरावें सराटे ॥ ४ ॥

१७८६ कांहो तुम्ही माझी वदविली वाणी । नेदा हे निवडूनि पांडुरंगा १ आणीक म्यां कुणा पुसावा विचार । समूळीं संसार दुराविला २ स्वामिमेघा म्हूण घेतली पदरीं । सांगितलें करीं कारण तें ३ तुका म्हणे नाहीं शिकविलें जेणें । तो याच्या वचनें उगा राहे ॥ ४ ॥

१७८७ हरि तूं निष्ठुर निर्गुण । नाहीं माया बहु कठिण । नव्हे तें करिसी आन । कवणें नाहीं केलें तें १ घेऊनि हरिश्चंद्राचें वैभव । राज्य घोडे भाग्य सर्व । पुत्र पत्नी जीव । डोंबाघरीं वोपविलीं २ नळ दमयंतीचा योग । विघडिला त्यांचा संग । ऐसें जाण जग । पुराणेंही बोलती ३ राजा शिबी चक्रवर्ती । कृपाळु दयाळु भूतीं । तुळविलें अंतीं । तुळे मांस तयाचें ४ कर्ण भिडतां समरंगणीं । बाणीं व्यापियेला रणीं । मागसी पाडोनी । तेथें दांत तयाचे ५ बळी सर्वस्वें उदार । जेणें उभारिला कर । करूनि काहार । तो पाताळीं घातला ६ श्रियाळाच्या घरीं । धरणें मांडिलें मुरारी । मारविलें करीं । त्याचें बाळ त्या हातीं ७ तुज भावें जे भजती । त्यांच्या संसारा हे गति । ठाव नाहीं पुढती । तुका म्हणे करिसी त ॥ ८ ॥

१७८८ माझीं मेलीं बहुवरी । तूं कां जैसा तैसा हरी १ विठो कैसा वांचलासी । आतां सांग मजपाशीं २ तुज देखतांचि माझा । बाप गेला आजा पणजा ३ आम्हां लागलेंसे पाठीं । बालत्व तारुण्य काठी ४ तुज फावलें तें मागें । कोणी नसतां वादीं लागे ५ तुका म्हणे तुझ्या अंगीं । मज देखतां लागलीं अवघीं ॥ २६ ॥

१७८९ धोंड्यासवें आदळितां फुटे डोकें । तो तों त्याच्या दुःखें धामेजेना १ इंगळासी सन्निधान अतित्याई । क्षेम देतां काई सुख वाटे २ सप्रेमें कुरवाळी महाफणी व्याळ । आपुली तों ढाळ सांडी केवीं ३ तुका म्हणे आम्हांसवें जो रुसला । तयाचा अबोला आकाशासी ॥ ४ ॥

१७९० मजशीं पुरें न पडे वादें । सुख दोहींच्या संवादें १ तूंचि आगळा काशानें । शिर काय पायांविणें २ वाहों तुझा भार । दुःख साहोनि अपार ३ तुका म्हणे नाहीं भेद । देवा करूं नये वाद ॥ ४ ॥

१७९१ आम्ही पापी तूं पावन । हें तों पूर्वापार जाण १ नवें करूं नये

जुनें । सांभाळावें ज्याचें तेणें २ मिरासीचा ठाव । राखा करूनि उपाव ३ वादें मारी हाका । देवा आइकवी तुका ॥ ४ ॥

१७९२ जरि मी नव्हतों पतित । तरि तूं पावन कैंचा येथ १ म्हणोनि माझें नाम आधीं । मग तूं पावन कृपानिधी २ लोहो महिमान परिसा । नाहीं तरी दगड तैसा ३ तुका म्हणे याचकभावें । कल्पतरू मान पावें ॥ ४ ॥

१७९३ जाणोनी अंतर । टाळिसील करकर १ तुज लागली हे खोडी । पांडुरंगा वहु कुडी २ उठविसी दारीं । धरणें पखाद्रियापरी ३ तुका म्हणे पाय । कैसे सोडीन तें पाहें ॥ ४ ॥

१७९४ वृत्तीवरी आम्हां येणें कशासाठीं । एवढी हे आटी सोसावया १ जाणतसां परी नेणते जी देवा । भ्रमचि बरवा राखावा तो २ मोडूनि क्षरलों अभेदाची मूस । तुम्हां कां आळस वोडवला ३ तुका म्हणे होई लवकरीं उदार । लांबणीचें फार काम नाहीं ॥ ४ ॥

१७९५ तुजचि पासाव झालोंसें निर्माण । असावें तें भिन्न कासयानें १ पाहावा जी ठायीं करूनि विचार । न्यून कोठें फार असेचिना २ ठेविलिये ठायीं आज्ञेचें पाळण । करूनि जतन राहिलोसें ३ तुका म्हणे आतां बोलतसे स्पष्ट । जालों क्रियानष्ट तुम्हांऐसें ॥ ४ ॥

१७९६ माझा तुम्हीं देवा केला अंगीकार । हें मज साचार कैसें कळे १ कांहो कांहीं माझ्या नये अनुभवा । विचारितां देवा आहे तैसा २ लौकिकाचा मज लाविसी आभार । शिरोरत्नभार दुःखाचा हा ३ तुका म्हणे नाहीं पालट अंतरीं । तेथें दिसे हरी ठकाठकी ॥ ४ ॥

१७९७ देऊनियां प्रेम मागितलें चित्त । झाली फिटाफिट तुम्हां आम्हां १ काशानें उदार तुम्हांसी म्हणावें । एक नेसी भावें एक देसी २ देऊनियां थोडें नेसील हें फार । कुंठिसी निचार अवघियांचा ३ तुका म्हणे आम्हां भांडवल चित्त । देउनी दुश्चित पाडियेलें ॥ ४ ॥

१७९८ सुलभ कीर्तनें दिलें ठसावूनि । करितां धरणीं उरीं कोण १ आतां न टळावें केलिया नेमासी । उदाराचा होसी हीन काय २ एका नेमें कोठें दुसरा पालट । पादर तो धीट म्हणती त्यासी ३ तुका म्हणे किती बोलसील उणें । एकाच्च वचनें खंड करी ॥ ४ ॥

१७९९ आम्हीं याची केली सांडी । कोठें तोंडीं लागावें १ आहे तैसा असों आतां । चिंतें चिंता वाढते २ बोलिल्याचा मानी सीण । भिन्न भिन्न राहावें ३ तुका म्हणे आम्हांपाशीं । धीरा ऐसी जतन ॥ ४ ॥

१८०० घालुनियां कास । बळें आलों मागायास १ प्रेमें देई पाठवूनी ।

पांडुरंगा सेवाऋणी २ होई रे शहाणा । कळों नेदावें या जना ३ तुका म्हणे पायीं । जडलों मग उरलें काई ॥ ४ ॥

१८०१ सेवकें करावें सांगितलें काम। सिक्याच्या तो धर्म स्वामी राखे १ काय देवा नेणों आलें गांडेपण । तुम्ही शक्तिहीन झाले दिसां २ विष्णुदास आम्ही निर्भर ज्या बळें । तें दिसे या काळें अव्हेरिलें ३ तुका म्हणे मूळ पाठवा लौकरीं । किंवा करूं हरी काय सांगा ॥ ४ ॥

१८०२ आतां नको चुकों आपुल्या उचिता। उदारा या कांता रखुमाईच्या १ आचरावे दोष हे आम्हां विहित। तारावे पतित तुमचें तें २ आम्ही तों आपुलें केलेसें जतन। घडों तुम्हांकडून घडेल तें ३ तुका म्हणे विठो चतुरांच्या राया । आहे तें कासया मोडों देसी ॥ ४ ॥

१८०३ आपुल्या आपण उगवा लिगाड। काय माझें जड करून घ्याल १ उद्धारासी काय उधाराचें काम। वाढवूंचि श्रम नये देवा २ करा आतां मजसाठीं वाड पोट । ठाव नाहीं तंट झाले लोकीं ३ तुका म्हणे बाकी झडलियावरीं । न पडे व्यवहारीं संचिताचे ॥ ४ ॥

१८०४ धरूनियां मनीं बोलिलों संकल्प । होसी तरि बाप सिद्धी पाव १ उत्कंठा हे आजी झाली माझे पोटीं । मोकलीली गोष्टी टाळाटाळ २ माझा मज असे ठाउका निर्धार। उपाधि उत्तर न साधें पैं ३ तुका म्हणे जरी दिली आठवण। तरि अभिमान धरी याचा ॥ ४ ॥

१८०५ आम्ही भाविकें हें काय जाणों खोडी। आइकोनि प्रौढी बिनाविलें १ नाहीं ऐसें येथें जालेती असतां । वाढविली चिंता अधिक सोसें २ न कळेचि आधीं करितां विचार । न धरितां धीर आहाचता ३ तुका म्हणे आतां वचनें वचन। वाढेल तीक्ष्ण बुद्धि जाली ॥ ४ ॥

१८०६ निर्गुणाचें घ्यावें गुणासी दर्शन। एकाएकीं भिन्न भेद घडे १ तुम्हां आम्हां आतां न पडे थावरीं । आहों तेंचि बरीं जेथें तेथें २ आपणापासूनी नसावें अंतर। वेचिलें उत्तर म्हणउनि ४ तुका म्हणें अंगा आली कठिणता। आमुच्या अनंता तुम्हा ऐसी ॥ ४ ॥

१८०७ सेवकासी आज्ञा निरोपाशीं काम। स्वामीचे तें धर्म स्वामी जाणें १ मनाचिये मुळीं रहावें बैसोन। आकर्षावें गुण पायापाशीं २ भेटीचे तांतडी करितसें लाहो। ओवाळावा देहो ऐसें वाटे ३ तुका म्हणे माझें करावें कारण। आपुलें जतन ब्रीद करा ॥ ४ ॥

१८०८ संदेह निरसे तरि रुचिकर। फिक्यासी आदर चवी नाहीं १ आतां नको मज खोट्यानें फटवूं। कोठें येऊं जाऊं वेळोवेळां २ गेला तरी

काय जीवाचें सांकडें। वांचउनि पुढें काय काज ३ तुका ह्मणे कैसीं निवाडा जी बरें। केलीं तैसीं पोरें आलीं पायीं ॥ ४ ॥

१८०९ आहे तोंचि आम्ही मागों तुजपाशीं। न हों तुज पैसीं क्रियानष्टें १ न बोलावीं वर्मीं तोंच बरें दिसें। प्रकट ते कैसे गुण करूं २ एकाऐसे एका घ्यावया मोळा। कां तुम्हां गोपाळा नाहीं ऐसा ३ तुका म्हणे लोकां नाहीं कळों आलें। करावें आपुलें जतन तों ॥ ४ ॥

१८१० मज ऐसें कोण उद्धरीले सांगा। ब्रीदें पांडुरंगा बोलतसां १ हातींच्या कांकणां कासया आरसा। उरलों मी जैसा तैसा आहें २ धन्वंतरी हरी रोग्याचिये व्येथें। तें तों कांहीं येथें न देखिजे ३ तुका म्हणे नाहीं अनुभव अंगें। वचन वाउगें कोण मानी ॥ ४ ॥

१८११ आमच्या तूं ऋणी ठायींचायि देवा। मागावया ठेवा आलों द्वारीं १ वर्म तुझें आम्हां सांपडलें हातीं। धरियेले चित्तीं दृढ पाय २ बैसलों धरणें कोंडोनियां द्वारीं। आंतूनि बाहेरीं येवों नेदीं ३ तुज मज सरी होईल या विचारें। जळों भांडखोरें निलाजिरीं ४ भांडवल माझें मिरविसी जनीं। सहस्र वोवर्णी नाममाळा ५ तुका म्हणे आम्हीं केली जीवें साटी। तुम्हां आम्हां तुटी घालूं आतां ॥ ६ ॥

१८१२ जेणें तुज झालें रूप आणि नांव। पतित हें दैव तुझें आम्ही १ नाहीं तरी तुज कोण हें पुसतें। निराकारीं तेथें एकाएकीं २ अंधारें दीपातें आणियेली शोभा। माणिकासी प्रभा कोंदणाची ३ धन्वंतरी रोगें आणिला उजेडा। सुखी काय चाडा जाणावें तें ४ अमृतासी मोल विषाचिये गुणें। पितळें तरी सोनें उंच निच ५ तुका म्हणें आम्हीं असोनियां जाण। तुज देवपण आणियेलें ॥ ६ ॥

१८१३ धरूनि पालव आसुडीन करें। मग काय बरें दिसें लोकीं १ काय तें विचारा ठायींचें आपणां। जो हा नारायणा अवकाश २ अंतर पायांसी तोंवरीं या गोष्टी। पडिलिया मिठी हाला नेदीं ३ रुसलेती तरी होईल धुझावणी। तांतडी करूनि साधावें हें ४ सांपडलिया आर्धी कारणासी ठाव। येथें करूं भाव दृढ आतां ५ तुका म्हणे तुझे ठाउके बोभाट। मग खटपट चुकली ते ॥ ६ ॥

१८१४ तुझें म्हणवितां काय नाश झाला। ऐकें बा विठ्ठला कीर्ति तुझी १ परी तुज नाहीं आमुचे उपकार। नामरूपा थार केलियाचे २ समूळीं संसार केला देशधडी। सांडिली आवडी ममतेची ३ लोभ दंभ काम क्रोध अहंकार। यांसीं नाहीं थार ऐसें केलें ४ मृत्तिका पाषाण तैसें

केलें धन। आपलें तें कोण पर नेणों ५ तुका म्हणे झालों देहासीं उदार। आणिक विचार काय तेथें ॥ ६ ॥

१८१५ कोण पर्वकाळ पहासील तीथ। होतें माझें चित्त कासावीस १ पाठवीं भातुकें प्रेमें झडकरीं। नको राखों उरीं पांडुरंगा २ न धरावा कोप मजवरी कांहीं। अवगुणीं अन्यायी म्हणोनियां ३ काय रडवीसी नेणतियां पोरां। जाणतियां थोराचिया परी ४ काय उभी कर ठेवूनियां कटीं। बुझावीं धाकुटीं लडिवाळें ५ तुका म्हणे आतां पदरासी पिळा। घालोनि निराळा नव्हे मग ॥ ६ ॥

१८१६ आतां सांडूं तरी हातीं ना पदरीं। सखीं सहोदरीं मोकलिलों १ जनाचारामध्यें उडाला मातेरा। झालों निलाजिरा म्हणवूनि २ कोणाचिया दारां जावेनासें झालें। म्यांच विटंबिलें आपणांसी ३ कोण झाला माझे बुद्धिसी संचार। नाहीं कोठें थार ऐसें झालें ४ तुका म्हणे तुज भक्त झाले फार। म्हणोनियां थार नाहीं येथें ॥ ५ ॥

१८१७ जे केली आळी ते अवघी गेली वायां। उरला पंढरिराया श्रम माझा १ काय समाधान केलें कोणे वेळे। कोणें माझे लळे पाळियेले २ आभासही नाहीं स्वप्नीं बुझिता। प्रत्यक्ष बोलतां काय चिंता ३ आतां पुढें लाज वाटे पांडुरंगा। भक्त ऐसे जगामाजीं झाले ४ तुका म्हणे आतां नाहीं भरंवसा। मोकलीसी ऐसा वाटतोसी ॥ ५ ॥

१८१८ काय विनवावें कोण तो निवाडा। केलें माझ्या कोड वचनाचें १ अहो कृपानिधि गुणांच्या निधाना। माझ्या अनुमाना नयेचि हें २ बहुत करुणा केलेसें भाषण। एकही वचन नाहीं आलें ३ माझी कांहीं सेवा होईल पावली। निश्चिंती मानिली होती ऐसी ४ तुका म्हणे माझी उरली ते आटी। अभय कर कटीं न देखोंचि ॥ ५ ॥

१८१९ तुम्हां आह्मां तुटी होईल यावरीं। ऐसें मज हरी दिसतसे १ वचनाचा कांहीं न देखों आधार। करावा हा धीर कोठवरीं २ सारिलें संचित होतें गांठी कांहीं। पुढें ऋण तेंही नेदी कोणी ३ जावेंचि नलगे कोणाचिये घरां। उडाला मातेरा तुझ्या संगें ४ तुका म्हणे आम्हां हाचि लाभ झाला। मनुष्यधर्म गेला पांडुरंगा ॥ ५ ॥

१८२० परिस काय धातु सोनें न करितु। फेडितां निभ्रांत लोहपांगु १ काय त्याहुनि झालासी बापुडें। फेडिता सांकडें माझें एक। कल्पतरु कोड पुरवितो रोकडा। चिंतामणि खडा चिंतिलें तें ३ चंदनाच्या वासें वसतां चंदन। होती काष्ठ आन वृक्षयाती ४ काय त्याचें उणें झालें त्यासी देतां। विचारी अनंता तुका म्हणे ॥ ५ ॥

१८२१ आम्ही म्हणों कोणीं नाहीं तुज आड। दिसतोसी भ्याड पांडुरंगा १ हा गे माझ्या भोगें केलासी परता। विश्वंभरीं सत्ता नाहीं ऐसी २ आम्हीं तुज असों देऊनि आधार। नाम वारंवार उच्चारितों ३ तुका म्हणे मज धरियेलें बळें। पंचभूतीं खळें करूनियां ॥ ४ ॥

१८२२ करावा उद्धार किंवा घ्यावी हारी। एका बोला स्थिरी राहें देवा १ निरसतें माझा होईल संदेह। अवघेंचि आहे मूळ पायीं २ राहिलों चिकटून कांहींचि न कळे। कोणा नेणों काळें उदय भाग्य ३ तुका म्हणे बहु उद्वेगला जीव। भाकीतसे कींव देवराया ॥ ४ ॥

१८२३ माझ्या वडिलांची मिरासी गा देवा तुझी चरण सेवा पांडुरंगा उपवास पारणें राखिला दारवंटा। केला भोगवटा आम्हांलागीं २ वंशपरंपरा दास मी अंकित। तुका मोकलीतां लाज कोणा ॥ ४ ॥

१८२४ आम्हीं घ्यावें तुझें नाम। तुम्ही आम्हां द्यावें प्रेम १ ऐसें निवडिलें मुळीं। संतीं बैसोनि सकळीं २ माझी डोई पायांवरी। तुम्हीं न धरावें दुरी ३ तुका म्हणे केला। खंड दोघांचा विठ्ठला ॥ ४ ॥

१८२५ जैसीं तैसीं तरी। शरणागतें तुझीं हरी १ आतां न पाहिजे केलें। ब्रीद लटिकें आपुलें २ शुद्ध नाहीं चित्त। परी म्हणवितों भक्त ३ मज कोण पुसे रंका। नाम सांगे तुझें तुका ॥ ४ ॥

१८२६ सांडावी हे भीड अधमाचे चाळे। मद्यपी बरळे भलत्या छंदें १ ऐसे तंव तुम्ही नाहीं जी दिसत। कां हें अनुचित वदलेत २ फांटा झाला त्यासी नाहीं वोढावारा। बेरसाचि खरा हा तो गुण ३ तुका म्हणे नाहीं ज्याच्या बापा ताळ। तो देखे विटाळ संताअंगीं ॥ ४ ॥

१८२७ जगीं मान्य केलें हा तुझा देकार। कीं कांहीं विचार आहे पुढें १ करितों कवित्व जोडितों अक्षरें। येणें काय पुरें झालें माझें २ तोंवरीं हें माझी न सरे करकर। जों नव्हे विचार तुझ्या मुखें ३ तुका म्हणे तुज पुंडलिकाची आण। जरी कांहीं वचन करिसी मज ॥ ४ ॥

## श्रीनिळोबामहाराज

१८२८ गोविलें इंद्रियां। पायदिठी दावूनिया १ ऐसा लाघवी नाटकी। थोर चैतन्य चेटकी २ गुणीं गुणांचा वोतला। रूपाकृती रूपा ठेला ३ निळा म्हणे पुंडलीक। आणिला भुलवाया लोकें ॥ ४ ॥

१८२९ आणिकांसीं सांगे आशेचें बंधन। सदाचा वडारी असोनि आपण १ काय म्हणावें यावरि आतां। नष्टाचा परमनष्ट हाचि हा पहातां २

भक्ताच्या हाताची पहातसे वास । कांहीं देतील म्हणउनी ठोकतचि बैसे ३ जळ फळ पुष्प देतां कांहींच्चि न सोडी । देऊं जातांचि घाली हा तोंडीं ४ आशेचा बांधला देव हा कैसा । काय निवारील आमुची आशा ५ भक्त नेदिती तैं उपवासी बैसे । काय खाईल जवळीं कांहींच्चि या नसे ६ निळा म्हणे हा अनाथ बापुडा । जाणती संत परि न बोलती भीडा ॥ ७ ॥

१८३० तुम्ही देवा कृपावंत । आम्ही अनाथ दुर्बळें १ म्हणोनियां थोरपण तुम्हां । येतें पुरुषोत्तमा आमुचेनि २ समानपणें असतों तरी । तुमची थोरी न दिसती ३ निळा म्हणे लोखंडें जैसा । दिधला परिसा बडिवार ॥४॥

१८३१ देवपण तुम्ही गमाविलें देवा । नाईकोनी धांवा येणें काळें १ न करा धांवणें केल्या कंठस्फोट । क्रिया ऐसी नष्ट धरियेली २ प्रेतापाशीं हाकां देतां तें नाईकें । थोटावला ठाके शोक नाना ३ निळा म्हणे नये करूं आतां आस । तुमची हें चित्तास कळों आलें ॥ ४ ॥

१८३२ भक्तिपंथें न चले कोणी । वाट जाईल मोडोनी १ जरि अनाथा धांवणें । न कराल तुम्ही थोरपणें २ आमचा जन्म वांया गेला । शब्द तुम्हांसी लागला ३ निळा म्हणे नव्हे भली । पुढें वाट खोळंबली ॥ ४ ॥

१८३३ मृत्यूची अवस्था नेणेंचि अमृत । पीडा भाग्यवंत दरिद्राची १ तैसें तुम्ही नेणा आमुचे तळमळे । भोगितां सोहळे आपुलेचि २ सिंधु काय जाणे तहानेचि बाधा । पयोनिधि क्षुधा कैसी असे ३ निळा म्हणे रवी न देखे अंधारें । उष्मा सुधाकरें कवणें काळीं ॥ ४ ॥

१८३४ येईल चित्तासी तें करा । तुम्ही आतां विश्वंभरा १ आमुचें वांया गेलें जिणें । नांदा तुम्ही देवपणें २ केली आम्ही तोंटपिटी । फजिती व्हावया शेवटीं ३ निळा म्हणे निजाभिमान । तुम्हीं सांडिला इमान ॥ ४ ॥

१८३५ लोभियानें धन केलें भूमिगत । दगडही थित घालुनि वरी १ तैसें तुम्ही देवा केलें आपणासी । कळंक यशासी लावियेला २ बुडविलें राज्य रायें सुरापानें । नसतां सावधान राज्यकार्या ३ निळा म्हणे आळसें बुडविला संसार । न गमतां व्यवहार साउकारें ॥ ४ ॥

१८३६ वांया संतांची ही बोली । वचनें त्यांचीं लाजविलीं १ लटिकाचि केला कीर्तिघोष । येथें तो अवघीच निरास २ माझाचि मज अनुभव झाला । नाहीं सावा धांवा केला ३ निळा म्हणे पालट बुद्धि । दिसे तुमची कृपानिधी ॥ ४ ॥

१८३७ सांडियेलें बाळा । कैसी निष्ठुर वेल्हाळा १ ऐसीं बोलतील सकळें । नारी नर हांसती बाळें २ माय नव्हे म्हणती लांव । ऐसें उपहासिती सर्व ३ निळा म्हणे सर्व जनीं । ऐसी होईल टेहणी ॥ ४ ॥

१८३८ न कळती तुझिया मावा । दैत्यां देवा आणि मानवां १ कैसें तुझें रूप नाम । कोण कुळ याति धर्म २ जागृत आहेसी कीं निजलेला । उपवासी कीं धाला ३ निळा म्हणे जीत कीं मेला । न वजसी कोणीहि देखिला ४

१८३९ येतो जातो ना दिसे परी । नित्य व्यभिचारी चित्ताचा १ ऐसाचि याचा चोरटा खेळ । आहे चक्रफाळ मुळींचाची २ नेदीं फळों न दावीच अंग । उमटोंचि माग कैसा तो ३ निळा म्हणे सायास करितां । होतात वृथा आमुचे ते ॥ ४ ॥

१८४० तुम्हां आम्हां नित्य भेटीं । नाहीं तुटी कल्पांतीं १ प्रभा केविं सांडी भानु । हुताशनु दीपनातें २ मृत्तिकेतें करुनि घटु । कैंचा पटु तंतूविण ३ निळा म्हणे आम्हावीण । नाहींच देवपण तुम्हांसी ॥ ४ ॥

१८४१ जिहीं अवलोकिला डोळां । हरिल्या त्यांच्या जीवनकळा १ ऐसा अनादि हा बुडवणा । आहे ठावा विचक्षणा २ चित्त वित्तें आपणाऐसें । करूनि ठेवी निजध्यासें ३ निळा म्हणे पडिल्या गांठी । न सोडीं नष्ट हा शेवटीं ॥ ४ ॥

१८४२ एकपणाचा घेऊनि त्रास । नेदींच दुसऱ्यास आड येऊं १ ऐसा मुळींचाचि चोरटा हरि । चोरिचिवरीं मन याचें २ पंचामृतें पांचहि विषयें चाटूनियां जाय वरावरीं ३ निळा म्हणे याचे शोधतांहि मार्ग । न लगोचि अनंग हातींचि हा ॥ ४ ॥

१८४३ वेडें वांकुडें बोलिलें । निळा पाहिजे उपसाहिलें १ देवा तुम्ही रमाकांत । भक्त तुमचे चरणांकित २ सूर्य जेवीं नव्हे किरण । सागर लहरी तो समान ३ निळा म्हणे तूं व्यापक । भक्त एकदेशी क्षुल्लक ॥ ४ ॥

१८४४ ऐकोनि संत हांसतील । तुम्हांसी येईल मग लाज १ कौल दिला राहे सुखें । न म्हणे मुखें दे ऐसें २ मागावें ते आम्हांचि जवळीं । आहे नामावळी पढों सुखें । ३ आणिखी तुमची मज नाहीं आशा । ठेवा कैशा मुक्तिहि त्या ४ निळा म्हणे आपुल्याचि सुखें । असों हरिखें अखंडित ॥ ५ ॥

१८४५ नामें आळवितां ओठीं । तुम्हां पोटीं भय वाटे १ कांहीं मागतील । किंकर येतील वैकुंठा २ काय वाटूं किती देऊं । म्हणोनियां जीऊं निर्बुजला ३ ऐसें जाणोनि लपालेती । घेतलें चित्तीं भय वाटे ४ याचिलागीं उत्तर न द्या । कळलें गोविंदा मनोगत ५ निळा म्हणे सुखी असा । न मागों सहसा आण तुमची ॥ ६ ॥

१८४६ हरूनियां घ्यावें चित्त । अवघें वित्त धन माझें १ हें तों उचित तुम्हां । पुरुषोत्तमा विचारा २ दर्शनाचें हेंचि फळ । सोडावें निढळ करूनियां ३ निळा म्हणे होईल टीका । माजीं या लोका तुमचीच ॥ ४ ॥

१८४७ नसतां गुण स्वाभाविक। वस्तूचि तरी निरर्थक १ तेवीं देवा देवपण। नसतां अंगीं तो पाषाण २ विना परिमळें कस्तुरी। मृत्तिकाचि ते निजनिर्धारीं ३ निळा म्हणे न मारी जीवा। तरी तें विषचीं नव्हे तेव्हां ॥४॥

१८४८ संतवचनें खरीं होती। वाढेल जगीं तुमची कीर्ति १ जरी माझें समाधान। कराल देउनी आलिंगन २ नाहीं तुम्हां जाणें येणें। कांहीं कोठूनियां धांवणें ३ निळा म्हणे विश्वंभरा। प्रगटा हृदयीं वास करा ॥ ४ ॥

१८४९ आणिक तों युक्ति नाहीं माझ्या हातीं। आहे मूढमती म्हणूनिया १ वारंवार तुम्हां करितों सूचना। नामें दयाघना उच्चारुनी २ पतितपावन ऐसी ब्रीदावळी। रुळते पायांतळीं प्रतिज्ञेची ३ निळा म्हणे चित्ता प्रताप दाखवा। माझा हा निरसावा अहंभाव ॥ ४ ॥

१८५० असों चरणावरीं तुमच्या ठेऊनियां मन। करूनियां कीर्तन रूपीं तुमचिया दृष्टी १ होईल ते हो कैसी आमुची गती। नेणों योग युक्ति तप साधन दुसरें २ सांगितलें संतीं करा नामाचा घोक। नलगे मग आणिक कृपा करील श्रीहरी ३ निळा म्हणे विश्वासें त्या राहिलों ठायीं। ठेऊनियां पायीं जीव भाव सकळ ॥ ४ ॥

१८५१ बोलिलों तें क्षमा करा। विश्वंभरा अपराध १ सेवकांनीं कीजे सेवा। तुम्हीं तों देवा देवोचि २ चावळलों तें सलगी केली। उपसाहिली पाहिजे ३ निळा म्हणे न कळे लीला। अकळ कळा तुमची ते ॥ ४ ॥

## श्रीनामदेवमहाराज

१८५२ अपराध कोटि हेचि माझी जोडी। पावनता प्रौढी नाम तुझें १ द्रौपदी संकटीं वस्त्रें पुरविलीं। धांव त्वां घेतली गजेंद्रासी २ उपमन्यालागीं आळी पुरविली। अढळपदीं दिधली वस्ती ध्रुवा ३ नामा म्हणे करा करुणा केशवा। तूं माझा विसांवा पांडुरंगा ॥ ४ ॥

१५५३ बरें आम्हां कळों आलें देवपण। आतां गुज कोण राखे तुझें १ मारिलें कां देवा मज आजिवरी। आतां बरोबरी तुज मज २ जें आम्हीं बोलतों आहे तुझे आंगीं। देईन प्रसंगें शिव्या तुज ३ निलाजऱ्या तुज नाहीं यातिकुळ। चोरटा शिंदळ ठावा जना ४ नामा म्हणे मज खवळिलें भांडा। आतां धीर तोंडा न धरवे ॥ ५ ॥

१८५४ दास झाल्यावरीं करिसी उदास। मनीं तें तुम्हांस आणि देवा १ सोशिले प्रवास जन्म जन्मांतर। करिसी अव्हेर आम्हांलागीं २ भार खांद्यावरीं घेउनी हिंडवी। होसी मजविशीं पाठमोरा ३ श्रुति सावकाश

गाती इतिहास । काय कासाविस होय तुम्हां ४ नामा म्हणे नको वाउगे उद्दीम । न सोडीं मी नाम केल्या कांहीं ॥ ५ ॥

१८५५ आम्हांपासीं काय मागसी तूं देवा । नाहीं भक्तिभाव भांडवल १ भांडवल गांठीं देखोनि साचार । सुदाम्याची फार पाठ घेसी २ घेसी सोडूनियां पोहे मुठीभर । हिडसावल्या कर नामा म्हणे ॥ ५ ॥

## श्रीजनाबाई

१८५६ अरे विठ्या विठ्या । मूळ मायेच्या कारट्या १ तुझी रांड रंडकी झाली । जन्म सावित्री चुडा ल्याली २ तुझें गेलें मढें । तुला पाहून काळ रडे ३ उभी राहुनी अंगणीं । शिव्या देत दासी जनी ॥ ४ ॥

## श्रीकान्होपात्रा

१८५७ पतितपावन म्हणविसी आधीं । तरी कां उपाधी भक्तामागें १ तुझें म्हणवितां दुजें अंगसंग । उणेपणा सांग कोणाकडे २ सिंहाचें भातुकें जंबुक पैं नेतां । थोराचिया माथां लाज वाटे ३ म्हणे कान्होपात्रा देह समर्पणें । करावा जतन ब्रीदासाठीं ॥ ४ ॥

---

# श्रीविठ्ठलपर



## श्रीतुकाराममहाराज

१८५८ पाळोनियां मोठें केलें । त्यासी बोलें ओळखी १ जवळोनि नवजे दुरी । लाड करी कौतुकें २ खूण उभा विटेवर । कटीं कर ठेवूनियां ३ तुका म्हणे घातली वरी । मुली थोरी मोलाची ॥ ४ ॥

१८५९ बाप करी जोडी लेंकराचे ओढी । आपुली करवंडी वाळवूनी १ एकाएकी केला मिरासीचा धनी । कडिये वागवुनी भार खांदी २ घालुनिया पाहे डोळां अळंकार । ठेवा दावी थोर करूनिया ३ तुका म्हणे नेदी गांजूं आणिकांसी । उदार जीवासी आपुलिया ॥ ४ ॥

१८६० भागल्याचें तारूं शिणल्याची साउली । भुकेलिया घाली प्रेम-

पान्हा १ ऐसी ही कृपाळ अनाथांची वेशी। सुखाचीच राशी पांडुरंग २ सकळां सन्मुख कृपेचिया दृष्टीं। पाहे बहु भेटी उतावीळ ३ तुका म्हणे येथें आतां उरें कैंचा। अनंता जन्मींचा शीणभाग ॥ ४ ॥

१८६१ बाल माते लातेवरी। मारी तेणें संतोषे १ सुख वसें चित्ता-अंगीं। तें हें रंगीं मिळाले २ भक्षी त्याचा जीवमाग। आला भाग तो बरा ३ तुका म्हणे ऋणानुबंधें। सांगें सुधें सकळांसी ॥ ४ ॥

१८६२ प्रीतीचा ता फळवळा। जिव्हाळाचि वेगळा १ बहु नेदी रडों माता। क्षुधित होतां धीर नव्हे २ वरीं वरी तोंडापुरतें। मोहोरितें करतसे ३ जाणोनियां नेणता तुका। नव्हे लोकांसारिखा ॥ ४ ॥

१८६३ उद्धाराचा संदेह नाहीं। यांच्या कांहीं सेवका १ पांडुरंग अभिमानी। जीवदानी कोंवसा २ बुडतां जळीं जळतां आगीं। ते प्रसंगीं राखावें ३ तुका म्हणे आम्हासाठीं। कृपा पोटीं वागवी ॥ ४ ॥

१८६४ पुढिलिया सुखें निंब देतां भले। बहुत वारलें होय दुःख १ हें तों वर्म असें माउलीच्या हातीं। हाणी मारी प्रीती हितासाठीं २ खेळतां विसरे भूक तहान घर। धरूनियां कर आणी बळें ३ तुका म्हणे पाळी तोंडीं-चिया घांसें। उदार सर्वस्वें सर्वकाळ ॥ ४ ॥

१८६५ मांस चर्म हाड। देवा अवघींच गोड १ जे जे हरिरंगीं रंगले। कांहीं न वजे वांया गेले २ वेद खाय शंखासुर। त्याचें वागवी कलेवर ३ तुका म्हणे ऐसा। बराडी या भक्तिरसा ॥ ४ ॥

१८६६ सुकाळ हा दिवस रजनी। नित्य धणी नवीच १ करूनि सेवूं नाना परी। राहे उरीं गोडीनें २ सरे ऐसा नाहीं झरा। पंक्तीकरासमवेत ३ तुका म्हणे बरवा पान्हा। कान्हाबाई माउलीचा ॥ ४ ॥

१८६७ आत्म उदधीमधून। विश्वलहरीमधून १ झाले सोनियाचे नग। नगाअंगीं सोनें चांग २ तेंवि सगुण निर्गुण। पांडुरंग माझा पूर्ण ३ तुका म्हणे पूर्णपणीं। दोघे विठ्ठल रुक्मिणी ॥ ४ ॥

१८६८ जो भक्तांचा विसावा। उभा पाचारितो धांवा १ हातीं प्रेमाचें भातुकें। मुखीं घाली कवतुकें। भवसिंधु सुखें। उतरी कासे लावूनि २ थोर भक्ताची आस। पाहे भोंवतालीं वास ३ तुका म्हणे कृपादानी। फेडी आवडीची धणी ॥ ४ ॥

१८६९ विठ्ठल सोयरा सज्जन सांगाती। विठ्ठल या चित्तीं बैसलासे १ विठ्ठलें हें अंग व्यापिली ते काया। विठ्ठल हें छाया माझी मज २ बैसला विठ्ठल जिव्हेचिया माथां। न वदे अन्यथा आन दुजें ३ सकळ इंद्रियां मन

हें प्रधान । तेंही करी ध्यान विठोबाचें ४ तुका म्हणे या हो विठ्ठलासी आतां । नये विसंबता माझें मंज ॥ ५ ॥

१८७० जळतें संचित । ऐसी आहे धर्मनीति १ माझ्या विठोबाचे पाय । वेळोवेळां मनीं ध्याय २ नेदी कर्म घडों । कोठें आडरानें पडों ३ तुका म्हणे मळ । राहों नेदी ताप जाळ ॥ ४ ॥

१८७१ तूं कृपाळू माउली । आम्हां दीनाची साउली । नस्वीरत आली । बाळवेषें जवळीं १ माझें केलें समाधान । रूप गोजिरें सगुण । निववीलें मन । आळिंगण देऊनी २ कृपा केली जनाहातीं । पायीं ठाव दिला संतीं । कळों नये चित्तीं । दुःख कैसें आहे तें ३ तुका म्हणे मी अन्यायी । क्षमा करी वो माझे आई । आतां पुढें काई । तुज घालूं सांकडें ॥ ४ ॥

१८७२ काय जाणें मी पामर । पांडुरंगा तुझा पार । धरिलीया धीर । काय एक न करिसी १ उतावीळ झालों आधीं । मतिमंद हीन बुद्धि । परि तूं कृपानिधी । नाहीं केला अव्हेर २ तूं देवाचाहि देव । अवघ्या ब्रह्मांडाचा जीव । आम्हां दासां कींव । कां भाकणें लागली ३ तुका म्हणे विश्वंभरा । मी तों पतितची खरा । अन्याय दुसरा । दारीं धरणें बैसलों ॥ ४ ॥

१८७३ माउलीसी सांगे कोण । प्रेमें वाढवी तान्हया १ अंतरींचा कळवळा । करीतसे प्रतिपाळा २ मायबापाची उपमा । तुज देऊं मेघश्यामा ३ तेही साजेना पाहतां । जीवलगा पंढरिनाथा ४ माय पाळी संसारीं । परलोकीं राहे दूरीं ५ तैसा नव्हेसी अनंता । काळावरीं तुझी सत्ता ६ तुका म्हणे नारायणा । तुम्हां बहुत करुणा ॥ ७ ॥

१८७४ साधावया भक्तिकाज । नाहीं लाज धरीत १ ऐसियासी शरण जावें । शक्ती जीवें न वंची २ भीष्म पण केला खरा । धनुर्धरा रक्षिलें ३ तुका म्हणे साक्ष हातीं । तो म्यां चित्तीं धरियेला ॥ ४ ॥

१८७५ धर्म रक्षावया अवतार घेसी । आपुल्या पाळिसी भक्तजनां १ अंबऋषीसाठीं जन्म सोसियेले । दुष्ट निर्दाळीले कितीएक २ धन्य तुज कृपासिंधु म्हणतील । आपुला तूं बोल साच करी ३ तुका म्हणे तुज वर्णितीं पुराणें होय नारायण दयासिंधु ॥ ४ ॥

## श्रीनिळोबामहाराज

१८७६ भक्त-कृपाळू माउली । कटीं कर उभी ठेली १ मोहें पाहे मुखाकडें । भेटावया वाडेंकोडें २ परम प्रीतीचा वोरस । सदासर्वदा उल्हास ३ निळा म्हणें सुप्रसन्न । भक्तांलागीं हास्यवदन ॥ ४ ॥

१८७७ मुसावलें मुसें । प्रेम भक्तांचें वोरसें १ धरूनियां विठ्ठलरूप ।

२४२० अव्यक्त आकार आकारलें रूप । प्रकाशस्वरूप बिंबलेंसे १ तें रूप अव्यक्त कृष्णनाम चोज । नाम अधोक्षज चतुर्भुज २ वर्णासी अव्यक्त वर्णरूप व्यक्त । भोगिती विरक्त नामपाठें ३ निवृत्तीचें काज नामब्रह्म बीज। नयनीं सहज तुष्टलासे ॥ ४ ॥

२४२१ वैकुंठ दैवत देवा मुकुटमणी । ऐकिजे पुराणीं कीर्ति ज्याची १ तो हरि बाळक गोपिका कौतुक । गोपाळ सकळिक संवगडे २ आदि शिवा जप जपतु अमूप । तें प्रत्यक्ष स्वरूप नंदाघरीं ३ निवृत्ति समाधि उगवली काळिका । तारी तिहीं लोकां एका नामें ॥ ४ ॥

२४२२ अरूप बागडें निर्गुण संवगडे । खेळे लाडेंकोडें नंदाघरीं १ तें रूप संपूर्ण यशोदा खेळवी। कृष्णातें आळवी वेळोवेळां २ सागरजीवन सत्रा-घीची खूण । मेघ तो वर्षण वोळलासे ३ निवृत्तीचें धन गोकुळीं श्रीकृष्णु । गयनी सहिष्णु प्रेमें डोले ॥ ४ ॥

२४२३ न साधे तें योगीं न सपडे जगीं । तो नंदाच्या वोसंगीं उत्संगीं खेळे १ कृष्ण माझा हरी खेळतो गोकुळीं । गोपिकीं सकळीं वेढियेला २ गाईचे कळप गोपाळ अमूप । खेळतसे दीप वैकुंठींचा ३ निवृत्ति दीपडें वैकुंठ सावडें । यशोदा तें कोडें चुंबन देतु ॥ ४ ॥

२४२४ हें व्यापुनि निराळा भोगी वैकुंठ सोहळा । नंदाघरीं गोवळा हरि माझा १ न साहे सगुण अवघाचि निर्गुण । तो कृष्ण आपण गोपाळसंगें २ गाई चारी हरि मोहरी खांद्यावरीं । वेणु नानापरी वातु असे ३ निवृत्ति गयनी कृष्ण जप तो अमूप जाण। सांगितली खूण गोरक्षानें ४

२४२५ वेदबीज साचें संमत श्रुतींचें । गुह्य त्या शास्त्रांचें हरि माझा १ तो हरि खेळतु प्रत्यक्ष मूर्तिमंतु। दुष्टां मुक्ति देतु जीवघातें २ अर्जुना साहाकारी द्रौपदी कैवारी । तो विदुराचे घरीं अन्न मागें ३ निवृत्तीचें धन गोकुळीं श्रीकृष्णु । यादव सहिष्णु हरि माझा ॥ ४ ॥

२४२६ मध्यबिंदनाद उन्मनीं स्वानंद । रूपस गोविंद गुणनिधी १ तें रूप सुरवर सेविती अरुवार। नित्यता सविचार भोगिताती २ गौळिया गोजिरें दैवत साजिरें । नंदासी एकसरें प्रेम देतु ३ निवृत्ति निवाला प्रेमरसें धाला। सर्वसुख झाला हरि कृष्ण ॥ ४ ॥

२४२७ योगियांचें धन तें ब्रह्म संपन्न। तो हा जनार्दन नंदाघरीं १ हरिरूप माये सर्वांघटीं आहे। दूध लोणी खाये गौळियांचें २ चिंतिता अजामेळा नाम आलें मुखा । तो वैकुंठीच्या सुखा देतु हरी ३ निवृत्तीचें धन जगाचें जीवन। नाम नारायण तरणोपाय ॥ ४ ॥

२४२८ जेथुनि उद्गारु प्रसवे ॐकारु । तोचि हा श्रीधरु गोकुळीं वसे १

जनकु हा जगाचा जीवलगु साचा। तो हरी आमुचा नंदाघरीं २ न माये वैकुंठीं योगियांचे भेटीं। पाहतां ज्ञानदृष्टीं नये हातां ३ निवृत्ति म्हणे देवो म्हणवितां हे रावो। तो सुखानुभवो यादवांसी ॥ ४ ॥

२४२९ परेसि परता पश्यंतिवरुता। मध्यमे तत्त्वता न कळे हरी १ तें हें कृष्णरूप गौळियांचें तप। यशोदे समीप नंदाघरीं २ चोखट चोखाळ मनाचें मवाळ। कांसवीचा ढाळ ज्या नेत्रीं। निवृत्ति सर्वज्ञ गुरुची धारणा। ब्रह्म सनातनामाजीं मन ॥ ४ ॥

२४३० खुंटले वेदांत हारपले सिद्धांत। बोलणें धादांत तेंही नाहीं १ तें रूप पाहतां नंदाघरीं पूर्ण। यशोदा जीवन कृष्णबाळ २ साधितां साधन न पविजे खूण। तो बाळरूपें कृष्ण नंदाघरीं ३ निवृत्ति संपन्न सेवी गुरुकृपा। गयनींच्या दीपा तारूं गेलें ॥ ४ ॥

२४३१ गगनीं उन्मनीं वेद होती मौनी। श्रुतीची कहाणी असती ठाके १ तें ब्रह्म सावडें नंदाचिये घरीं। वनीं गाई चारी गोपवेशें २ न पाहतां होय ब्रह्मांड पीठिका। तें युग क्षणिका हारपे रया ३ निवृत्ति दैवत कृष्ण परिपूर्ण। सर्वत्र जीवन सर्वां वसे ॥ ४ ॥

२४३२ नामीं रूपीं गोडी ब्रह्मांडापवढी। द्वैताची परवडी हारपली १ तें रूप सुंदर कृष्ण सुकुमार। सेविती सुरवर भक्तराज २ विराट अनंतें ज्यामाजीं विरतें। नव्हेचि पुरतें शेषादिकां ३ निवृत्ति लक्ष्मी गरुड चिंतिती। तयाचिये मति आकळ हरी ॥ ४ ॥

२४३३ परेसि परता न कळे पैं शेषा। तो गौळिया अशेषामाजीं हरी १ भाग्य पैं फळलें नंदाघरीं सये। यशोदा पैं माय परब्रह्माची २ गौळिये नांदती गोधनाचे कळप। त्यामाजि स्वरूप कृष्णमूर्ति २ निवृत्तीचें ध्यान गोपाळ आमुचा। आतां जन्म कैंचा भक्तजनां ॥ ४ ॥

२४३४ ज्या रूपाकारणें वोळंगती सिद्धी। हारपती बुद्धी शास्त्राचिया १ तें रूप साजिरें गोकुळीं गोजिरें। यशोदे सोपारें कडिये शोभे २ न संपडे त्रिभुवनीं नाकळे साधनीं। नंदाच्या अंगणीं खेळे हरी ३ निवृत्ति निधडारूप चहूंकडा। गोपाळ बागडा गोकुळीं वसे ॥ ४ ॥

२४३५ हा पुरुष कीं नारी नव्हे तो रूपस। शेखीं जगदीश जगद्रूपें १ तें हें कृष्णरूप यशोदे कडीयें। नंदाघरीं होये बाळरूप २ ज्यातें नेणें वेद नेणती त्या श्रुती। त्या गोपीका भोगिती कामरूपें ३ निवृत्तीचें ब्रह्म कृष्णनामें खेळे। असंख्य गोवळे ब्रह्मरूपीं ॥ ४ ॥

२४३६ चतुरानन घन अनंत उपजती। देवो देवी किती तयामाजीं १ तोंचि हें सावळें अंकुरलें ब्रह्म। गोपसंगें सम वर्ते रया २ निगमा नाठवे

वेदांचा द्योतकु । तो चतुर्भुज वंशु नंदाघरीं २ निवृत्ति म्हणे शंखचक्रांकित मूर्ती । आपण श्रीपती क्रीडतुसे ॥ ४ ॥

२४३७ ज्या रूपाकारणें देव ओळंगणें । योगी गुरुखुणें सेविताती १ तें रूप गोकुळीं गोपाळांचे मेळीं । अखंड समेळीं खेळतुसे २ ब्रह्मांड कडोविकुडीं ब्रह्मांड घडी । या योगपरवडी हारपती ३ निवृत्तीचा तारू गोपाळ नंदाचा । यशोदे देवकीचा लाभ थोरू ॥ ४ ॥

२४३८ अनंतरूप देव अनंत आपण । अंतर्बाह्य खूण योगियांसी १ तो हा हरी माये गोकुळीं अवतार । गोपिसंगें श्रीधर खेळतुसे २ शास्त्रांसि नाकळे श्रुतीही वरळे । तो गोपवेषें खेळे गोपाळामाजीं ३ निवृत्तीचें सार गयनी विचार । ब्रह्म चराचर माजीं वसे ॥ ४ ॥

२४३९ चिंतितां साधक मनासी नाकळे । तो गोपिका आकळे करितां ध्यान १ देखिला गे माये सगुणनिर्गुणनिधी । यशोदा गोविंदीं प्रेमपान्हा २ न माये सर्वांघटीं आपणची सृष्टी । तो यमुनेच्या तटीं गायीं चारी ३ निवृत्ति साधन कृष्णाचें रूपडें । ब्रह्मांडाएवढें तदाकार ॥ ४ ॥

---

# स्थितीपर

## श्रीतुकाराममहाराज

२४४० आतां कोठें धांवें मन । तुमचे चरण देखिलीया १ भाग गेला शीण गेला । अवघा झाला आनंद २ प्रेमरसें बैसली मिठी । आवडी लाठी मुखासी ३ तुका म्हणे आम्हांजोगें । विठ्ठल घोगें खरें माप ॥ ४ ॥

२४४१ आम्हां हेंचि काम । वाचे गाऊं तुझें नाम १ आयुष्य मोलाची हे घडी । धरूं पायांची आवडी २ अमृताची खाणी । यांचे ठायीं वेचूं वाणी ३ तुका म्हणे पांडुरंगा । माझ्या जीवाच्या जिवलगा ॥ ४ ॥

२४४२ आतां भय नाहीं ऐसें वाटे जीवा । घडलिया सेवा समर्थाची १ आतां माझ्या मनें धरावा निर्धार । चिंतनीं अंतर न पडावें २ येथें नाहीं झाली कोणाची निरास । आल्या याचकास कृपेविशीं ३ तुका म्हणे येथें नाहीं दुजी परी । राया रंका सरी देवापायीं ॥ ४ ॥

२४४३ आतां सर्वभावें हा माझा निर्धार। न करी विचार आणिकांसीं १ सर्वभावें नाम गाईन आवडीं। सर्व माझी जोडी पाय तुझे २ लोटांगण तुझ्या घालीन अंगणीं। पाहीन भरोनी डोळे मुख ३ निर्लज्ज होऊनी नाचेन रंगणीं। येऊं नेदी मनीं शंका कांहीं ४ अंकित अंकिला दास तुझा देवा। संकल्प हा जीवा तुका म्हणे ॥ ५ ॥

२४४४ आतां आम्हां हेंचि काम। वाचे गाऊं तुझें नाम। वाहुनियां टाळी प्रेम-। सुखें आनंदें नाचावें १ अवघी झाली आराणूक। मागें पुढें सकळिक। त्रिपुटीचें दुःख। प्रारब्ध सारिलें २ गोदातटें निर्मळें। देव देवाचीं देउळें। संत महंत मेळे। दिवस जाय सुखाचा ३ तुका म्हणे पंढरीनाथा। आणिक नाहीं मज चिंता। योगक्षेम माथां। भार तुझ्या घातला ॥ ४ ॥

२४४५ धांवोनियां आलों पहावया मुख। गेलें माझें दुःख जन्मांतरींचें १ ऐकिलेंहि होतें तसेंचि पाहिलें। मन स्थिरावलें तुझ्या पायीं २ तुका म्हणे माझी इच्छा पूर्ण झाली। कांहीं न राहिली वासना हे ॥ ३ ॥

२४४६ आम्हां घरीं धन शब्दाचींच रत्नें। शब्दांचींच शस्त्रें यत्न करूं १ शब्दचि आमुच्या जीवाचें जीवन। शब्दें वांटूं धन जनलोकां २ तुका म्हणे पहा शब्दचि हा देव। शब्देंचि गौरव पूजा करूं ॥ ३ ॥

२४४७ आम्हांसी सकळ। तुझ्या नामाचेंचि बळ १ करूं अमृताचें पान। दुजें नेणों कांहीं आन २ जयाचा जो भोग। सुख दुःख पीडा रोग ३ तुका म्हणे देवा। तुझ पायीं माझा हेवा ॥ ४ ॥

२४४८ आम्ही मागों ऐसें नाहीं तुजपाशीं। जरी तूं भितोसी पांडुरंगा १ पाहे विचारूनि आहे तुज ठावें। आम्ही धालों नांवें तुझ्या एका २ ऋद्धि-सिद्धि तुझें मुख्य भांडवल। हें तों आम्हां फोल भक्तीपुढें ३ तुका म्हणे जाऊं वैकुंठा चालत। बैसोनि निवांत सुख भोगूं ॥ ४ ॥

२४४९ कुमुदिनी काय जाणे तो परिमळ। भ्रमर जकळ भोगीतसे १ तैसें तुज ठावें नाहीं तुझें नाम। आम्हीच तें प्रेमसुख जाणों २ माते तृण बाळा दुग्धाची ते गोडी। ज्याची नये जोडी त्यासी कामा ३ तुका म्हणे मुक्ताफळ शिंपीपोटीं। नाहीं त्याची भेटी भोग तिये ॥ ४ १

२४५० झाली हरिकथा रंग वोसरला। उचितासी आला पांडुरंग १ वांटितो हें प्रेम उचिताचा दाता। घेई रे तूं आतां धणीवरी २ प्रेम देऊनियां अवघीं सुखीं केलीं। जीं होतीं रंगलीं विठ्ठलीं तीं ३ तुकें हें दुर्बळ देखियेलें संतीं। म्हणऊनि पुढती आणियेलें ॥ ४ ॥

२४५१ करुनि राहों जरि आत्माचि प्रमाण। निश्चळ नव्हे मन काय करूं १

जेविलियाविण काशाचे ढेंकर । शब्दाचे प्रकार शब्दचि ते २ पुरे पुरे आतां तुमचें ब्रह्मज्ञान । आम्हांसी चरण न सोडणें ३ विरोधें विरोध वाढे पुढतोपुढतीं । वासनेचे हातीं गर्भवास ४ सांडामांडी अंगीं वसे पुण्यपाप । बंधन संकल्प याचि नांवें ५ तुका म्हणे नाहीं मुक्तता मोकळी । ऐसा कोण बळी निरसी देह ॥ ६ ॥

२४५२ ऐसा दुस्तर भवसागर । नेणों केसा उतरूं पार १ कामक्रोधादि सावजें थोर । दिसताती भयंकर २ मायाममतेचे भोंवरे । घेती भयानक फेरे । ३ वासनेच्या लहरी येती । उद्योग हेलकावे बसती ४ तरावया एक युक्ती असे । तुका नामनावेमधीं बैसे ॥ ५ ॥

२४५३ करूं तैसें पाठांतर । करुणापर भाषण १ जिहीं केला मूर्तिमंत । ऐसा संतप्रसाद २ सोज्वळ केल्या वाटा । आइत्या नीटा मागिल्या ३ तुका म्हणे घेऊं धांवा । करूं हांवा ते जोडी ॥ ४ ॥

२४५४ काय उणें मज पांडुरंगापायीं । रिद्धिसिद्धि ठायीं वोळंगती १ कोण पाहे सुखा नासिवंताकडे । तृष्णेचे बापुडें नव्हों आम्ही २ स्वर्गसुखें आम्ही केलीं पावटणी । पापपुण्यें दोन्ही उलंडिलीं ३ तुका म्हणे घरीं आणिलें वैकुंठ । वसविली पेठ वैष्णवांची ॥ ४ ॥

२४५५ काय कृपेवीण घालावें सांकडें । निश्चिंतीं निवाडे कोण्या एका १ आहों तैसीं पुढें असों दीनपणें । वेंचुनी वचनें करुणेचीं २ धरूनि भय आतां काय वाहों चित्ता । काय करूं आतां आप्तपणा । ३ तुका म्हणे आम्ही भावहीन जीव । म्हणवूनि देव दुरे दुरीं ॥ ४ ॥

२४५६ कासया गुणदोष पाहों आणिकांचे । मज काय त्यांचें उणें असे १ काय पापपुण्य पाहों आणिकांचें । मज काय त्यांचें उणें असे २ नष्टदुष्टपण कवणाचें वानूं । तयाहून अणू अधिक माझें ३ कुचर खोटा मज कोण असे आगळा । तो मी पाहों डोळां आपुलिया ४ तुका म्हणे मी भांडवलें पुरता । तुजसी पंढरीनाथा लावियेलें ॥ ५ ॥

२४५७ गाढवाचे घोडें । आम्हीं करूं दृष्टीपुढें १ चघळीं वाहणा । मायारिया बांडा सुना २ सोंगसंपादणी । तरी करूं शुद्ध वाणी ३ तुका म्हणे खळ । करूं समयीं निर्मळ ॥ ४ ॥

२४५८ चवदा भुवनें जयाचिया पोटीं । तोचि आम्ही कंठीं साठविला १ काय एक उणें आमुचिये घरीं । वोळंगती द्वारीं रिद्धिसिद्धि २ असुर जयानें घातले तोडरीं । तो आम्हासी जोडी कर दोन्ही ३ रूप नाहीं रेखा जयासी आकार । आम्ही तो साकार भक्तीं केला ४ अनंत ब्रह्मांडें जयाचियें अंगीं ।

समान तो मुंगी आम्हांसाठीं ५ तुका म्हणे आम्ही देवाहूनि बळी । जालों हें निराळी ठेउनी आशा ॥ ६ ॥

२४५९ डोळां भरियेलें रूप । चित्तीं पायांचा संकल्प १ अवघी घातली वांटणी । प्रेम राहिलें कीर्तनीं २ वाचा केली माप । रासीं हरी नाम अमूप ३ भरूनियां भाग । तुका बैसला पांडुरंग ॥ ४ ॥

२४६० तोंवरीं तोंवरीं शोभतील गारा । जंव नाहीं हिरा प्रकाशला १ तोंवरीं तोंवरीं शोभताती दीपिका । नुगवतां एका भास्करासी २ तोंवरीं तोंवरीं सांगती संतांचिया गोष्टी । जंव नाहीं भेटी तुकयासवें ॥ ३ ॥

२४६१ तोंवरीं तोंवरीं जंबूक करी गर्जना । जंव त्या पंचानना देखिलें नाहीं १ तोंवरीं तोवरीं सिंधु करी गर्जना । जंव त्या अगस्ति ब्राह्मणा देखिलें नाहीं २ तोंवरीं तोंवरीं वैराग्याच्या गोष्टी । जंव सुंदर वनिता दृष्टीं देखिली नाहीं ३ तोंवरी तोंवरी शूरत्वाच्या गोष्टी । जंव परमाईचा पुत्र दृष्टीं देखिला नाहीं ४ तोंवरीं तोंवरीं माळा मुद्रांचीं भूषणें । जंव तुकयाचें दर्शन झालें नाहीं ५

२४६२ दिनरजनी हाचि धंदा । गोविंदाचे पवाडे १ संकलिपला देह देवा । सकळ हेवा तये ठायीं २ नाहीं अवसान घडी । सकळ जोडी इंद्रियां ३ कीर्ति मुखें गर्जे तुका । करी लोकां सावध ॥ ४ ॥

२४६३ देह भाव आम्ही राहिलों ठेवूनी । निवांत चरणीं विठोबाच्या १ आमुच्या हिताचा जाणोनि उपाय । तोचि पुढें देव करीतसे २ म्हणवूनी नाहीं सुख दुःख मनीं । ऐकिलिया कानीं वचनाचें ३ झालों मी निःसंग निवांत एकला । भार त्या विठ्ठलां घालूनियां ४ तुका म्हणे झालों जयाचें अंकित । तोचि माझें हित सर्व जाणें ॥ ५ ॥

२४६४ धर्म रक्षावयासाठीं । करणें आटी आम्हांसी १ वाचां बोलों वेदनीती । करूं संतीं केलें तें २ न बाणतां स्थिति अंगीं । कर्मत्यागी लंड तो ३ तुका म्हणे अधम त्यासी । भक्ति दूषी हरीची ॥ ४ ॥

२४६५ धर्माचें पाळण । करणें पाखांड खंडण १ हेंचि आह्मां करणें काम । बीज वाढवावें नाम २ तीक्ष्ण उत्तरें । हातीं घेऊनि बाण फिरे ३ नाहीं भीडभाड । तुका म्हणे साना थोर ॥ ४ ॥

२४६६ पावलों प्रसाद इच्छा केली तैसी । झालें या चित्तासी समाधान १ मायबाप माझा उभा कृपादानी । विटे सम जोडूनी पदांबुजें २ सांभाळासी येऊं नेदीच उणीव । अधिकार गौरव राखे तैसें ३ तुका म्हणे सर्व अंतर्बाह्य आहे । जया तैसा राहे कवळूनि ॥ ४ ॥

२४६७ प्रेमसूत्र दोरी । नेतो तिकडे जातो हरी १ मनेंसहित वाचा काया ।

अवघें दिलें पंढरीराया २ सत्ता सकळ तया हातीं । माझी कींव काकुलती ३ तुका म्हणे ठेवी तैसें । आम्ही राहों त्याचे इच्छें ॥ ४ ॥

२४६८ शास्त्रांचें जें सार वेदांची जो मूर्ति । तो माझा सांगाति प्राणसखा १ म्हणवूनि नाहीं आणिकांचा पांग । सर्व झालें सांग नामें एका २ सगुण निर्गुण जयाचीं हीं अंगें । तोचि आम्हांसंगें क्रीडा करी ३ तुका म्हणे आम्ही विधीचे जनिते । स्वयंभू आइते केले नव्हों ॥ ४ ॥

२४६९ कांहींच मी नव्हे कोणिये गांवींचा । एकटा ठायींचा ठायीं एक १ नाहीं जात कोठें येत फिरोनियां । अवघेंचि वायांवीण बोले २ नाहीं मज कोणी आपलें दुसरें । कोणाचा मी खरें कांहीं नव्हे ३ नाहीं आम्हां ज्यावें मरावें लागत । आहों अखंडित जैसें तैसें ४ तुका म्हणे नांवरूप नाहीं आम्हां । वेगळा त्या कर्मा अकर्मासी ॥ ५ ॥

२४७० ठेविलें जतन । करूनियां निजधन १ जयापासाव उत्पत्ति । तें हें बीज धरिलें हातीं २ निवडिलें वरळा भूस । सार आइन जिन्नस ३ तुका म्हणे नारायण । भाग संचिताचा गुण ॥ ४ ॥

२४७१ पिकलिये सेंदें कडूपण गेलें । तैसें आम्हां केलें पांडुरंगें १ काम क्रोध लोभ निमाले ठायींची । सर्व आनंदाची सृष्टि झाली २ आठव नाठव गेले भावाभाव । झाला स्वयमेव पांडुरंग ३ तुका म्हणे भाग्य या नांवें म्हणीजे । संसारीं जन्मीजे याचिलागीं ॥ ४ ॥

२३७२ सदा नामघोष करूं हरीकथा । तेणें सदा चित्ता समाधान १ सर्व सुख ल्यालों सर्व अलंकार । आनंदें निर्भर डुल्लतसों २ असों ऐसा कोठें आठवची नाहीं । देहींच विदेही भोगूं दशा ३ तुका म्हणे आम्ही झालों अग्निरूप । लागों नेदूं पापपुण्य अंगा ॥ ४ ॥

२४७३ आम्हीं वैकुंठवासी । आलों याचि कारणासी । बोलिले जे ऋषि । साच भावें वर्ताया १ झाडूं संतांचे मारग । आडरानीं भरलें जग । उच्छिष्टाचा भाग । शेष उरलें तें सेवूं २ अर्थे लोपलीं पुराणें । नाश केला शब्दज्ञानें । विषय लोभीं मनें । साधनें बुडविलीं ३ पिटूं भक्तीचा डांगोरा । कळिकाळासी दरारा । तुका म्हणे करा । जयजयकार आनंदें ॥ ४ ॥

२४७४ कास घालोनी बळकट । झालों कळिकाळासी धीट । केली पायवाट । भवसिंधूवरूनी १ यारे यारे लहान थोर । याति भलते नारीनर । करावा विचार । न लगे चिंता कोणासीं २ कामीं गुंतले रिकामे । जपी तपी येथें जमे । लाविले दमामे । मुक्त आणि मुमुक्षा ३ एकंदर शिका । पाठविला इहलोका । आलों म्हणे तुका । मी नामाचा धारक ॥ ४ ॥

२४७५ काय मज एवढा भार । हे वेव्हार चालवाया १ उकल तो जाणे

धनी। मज भोजनीं कारण २ चिंता ज्याची तया शिरीं। लेंकरीं तें खेळावें ३ तुका म्हणे शेवट झाला। देव या बोला भोगिता ॥ ४ ॥

२४७६ न लागावी दिठी। माझी तुझें मुखवटीं १ आधीं पाउलें पाउलें। तें मी पाहेन तें भलें २ देईन हे काया। वरि सांडणें सांडाया ३ तुका म्हणे देवा। बहु आवडसी जीवा ॥ ४ ॥

२४७७ माझिया जीवासी हेचि पै विश्रांति। तुझे पाय चित्तीं पांडुरंगा १ भांडवल गांठीं झालेंसें पुरतें समाधान चित्तें मानियेलें २ उदंड उच्चारें घातला पसरू। रूपावरीं भरू आवडीचा ३ तुका म्हणे मज भक्तिची आवडी। अभेदीं तांतडी नाहीं म्हूण ॥ ४ ॥

२४७८ मतिवीण काय वर्णूं तुझें ध्यान। जेथें पडिलें मौन वेदश्रुति १ करूनि गोजिरा आपुलिये मतीं। धरियेलें चित्तीं चरणकमळ २ सुखाचें ओंतलें पाहों तें श्रीमुख। तेणें हरे भूक तान माझी ३ रसना गोडावली ओव्या गातां गीत। पावलेंसे चित्त समाधान ४ तुका म्हणे माझी दृष्टि चरणावरीं। पाउलें गोजिरीं कुंकुमाचीं ॥ ५ ॥

२४७९ करूं याची कथा नामाचा गजर। आम्हां संवसार काय करी १ म्हणवूं हरिचे दास लेऊं तीं भूषणें। कांपे तया भेणें कळिकाळ २ आशा भय लाज आड नये चित्ता। ऐसी तया सत्ता समर्थाची ३ तुका म्हणे करूं ऐसियाचा संग। जेणें नव्हे भंग चिंतनाचा ॥ ४ ॥

२४८० काळाचेंहि काळ। आम्ही विठोबाचे लडिवाळ १ करूं सत्ता सर्वांठायीं। वसों निकटवासें पायीं २ ऐसी कोणाची वैखरी। वदे तुमचे सामोरीं ३ तुका म्हणे बाण। हातीं हरिनाम तीक्षण ॥ ४ ॥

२४८१ जननी हें जाणें बाळकाचें वर्म। सुख दुःख धर्म जें जें कांहीं १ अंधापुढें जेणें दिधला आधार। त्याचा हा विचार तोचि जाणें २ शरणांगता जेणें घातलें पाठीशीं। जाणें तेविशीं राखों तया ३ कासे लागे तया न लगती सायास। पोहोणार त्यास पार पावी ४ तुका म्हणे जीव विठ्ठलाचे हातीं। दिला त्याची गति तोचि जाणें ॥ ५ ॥

२४८२ जाऊं देवाचिया गांवां। देव देईल विसावा १ देवा सांगों सुखदुःख। देव निवारील भूक २ घालूं देवासीच भार। देव सुखाचा सागर ३ राहों जवळीं देवापाशीं। आतां जडोनि पायांसीं ४ तुका म्हणे आम्हीं बाळें। या देवाचीं लडिवाळें ॥ ५ ॥

२४८३ धरोनी दोन्हीं रूपें पाळणें संहार। करीं कोप रुद्र दयाळ विष्णु १ जटाजूट एका मुकुट माथां शिरीं। कमळापति गौरीहर एक २ भस्मउधळण लक्ष्मीचा भोग। शंकर श्रीरंग उभयरूपीं ३ वैजयंती माळ वासुकीचा हार।

लेणें अळंकार हरिहरा ४ कपाळ झोळी एका स्मशानींचा दास। एक जगन्निवास विश्वंभर ५ तुका म्हणे मज उभयरूपीं एक। सारोनि संकल्प शरण आलों ॥ ६ ॥

२४८४ बहु कृपावंतें माझीं मायबापें। मी माझ्या संकल्पें अंतरलीं १ संचितानें नाहीं चुकों दिली वाट। लाविलें अदट मजसवें २ आतां मी रुसतों न कळतां वर्म। परी ठावें सर्व धर्म देवा ३ तुका म्हणे उभा राहिला न बैसे। आमुचिया आसें उद्वेग त्या ॥ ४ ॥

२४८५ नाहीं त्रिभुवनीं सुख यासमान। म्हणवूनि मन स्थिरावलें १ धरियेलीं जीवीं पाउलें कोंवळीं। कंठीं एकावळी नाममाळा २ शीतळ होऊनी पावलों विश्रांति। न साहे पुढती चाली चित्ता ३ तुका म्हणे जाले सकळ सोहळे। पुरविले डोहळे पांडुरंगें ॥ ४ ॥

२४८६ मागणें तें मागों देवा। करूं भक्ती त्याची सेवा १ काय उणें तयापाशीं। ऋद्धिसिद्धि ज्याच्या दासी २ कायावाचामन। करू देवा हें अर्पण ३ तुका म्हणे विश्वंभर। ज्याच्यानें हें चराचर ॥ ४ ॥

२४८७ रिद्धिसिद्धि दासी कामधेनु घरीं। परि नाहीं भाकरी भक्षावया १ लोडें बालिस्तें पलंग सुपत्ति। परि नाहीं लंगोटी नेसावया २ पुसाल तरी आम्हां वैकुंठींचा वास। परि नाहीं साह्यास ठाव कोठें ३ तुका म्हणे आम्ही राजे त्रैलोक्याचें। परि नाहीं कोणाचें उणें पुरें ॥ ४ ॥

२४८८ लेकरा आइतें पित्याचें जतन। दावी निजधन सर्व जोडी १ त्यापरि आमुचा झालासे सांभाळ। देखिलाची काळ नाहीं आड २ भुकेचें सन्निध वसे स्तनपान। उपायाची भिन्न चिंता नाहीं ३ आळवूनि तुका उभा पैलथडी। घातली या उडी पांडुरंगें ॥ ४ ॥

२४८९ एक भाव चित्तीं। तरी न लगे कांहीं युक्ती १ कळों आलें जीवें। मज माझियाचि भावें २ आठवचि पुरे। सुख अवघें मोहरें ३ तुका म्हणे मन। पूजा इच्छी नारायण ॥ ४ ॥

२४९० एकांतीं लोकांतीं करूं गदारोळ। लेश तोही मळ नाहीं येथें १ ध्यावें धावें आम्ही आपुलिया सत्तां। न देखों पुसतां दुजा कोणी २ भांडाराचि किल्ली माझे हातीं आहे। पाहिज तो पाहू वान येथें ३ तुका म्हणे आम्हां विश्वासाच्या बळें। ठेविलें मोकळें देवें येथें ॥ ४ ॥

२४९१ हा गे माझा अनुभव। भक्तिभाव भाग्याचा १ केला ऋणी नारायण। नव्हे क्षण वेगळा २ घालोनियां भार माथां। अवघी चिंता वारली ३ तुका म्हणे वचनासाठीं। नाम कंठीं धरियेलें ॥ ४ ॥

२४९२ इहलोकींचा हा देहे। देव इच्छिताती पाहे १ धन्य आम्हीं जन्मा

आलों। दास विठोबाचे झालों २ आयुष्याच्या या साधनें। सच्चिदानंद पदवी घेणें ३ तुका म्हणे पावटणी। करूं स्वर्गाची निशाणी ॥ ४ ॥

२४९३ आम्हीं हरीचें सवंगडे। जुने ठायींचे वेडेबागडे। हातीं धरूनि कडे। पाटिसवें वागविलों १ म्हणोनि भिन्न भेद नाहीं। देवा आम्हां एक देहीं। नाहीं झालें कहीं। एका एक वेगळें २ निद्रा करितां होतों पायीं। सवेंचि लंका घेतली तईं। कानें गोंवळ गाइ। सर्वे चारित फिरतसों ३ आम्हां नामाचें चिंतन। राम कृष्ण नारायण। तुका म्हणे क्षण। खातां जेवितां न विसंबें ॥ ४ ॥

२४९४ आम्ही आइते जेवणार। नलमे सोसावे डोंगर। सुखाचा व्यवहार। तेणेंचि वाढेल १ ठेवा जोडला मिरासी। ठाव झाला पायापाशीं। नव्हे आणिकांसी। रीघ तेथें यावया २ बळी दिला जीवभाव। नेणें आणिकांचें नांव। धरिला एक भाव। तो विश्वास फळला ३ तुका म्हणे जालों बळी। आम्ही निकट जवळीं। बोलिलों तें पाळी। वचन स्वामी आमुचें ॥ ४ ॥

२४९५ उपास कराडी। तिहीं करावी बापुडीं १ आम्ही विठोबाचे दास। चिंता झुगारिली आस २ भक्तिच्या उत्कर्षे। नाहीं मुक्तीचें तें पिसें ३ तुका म्हणे बळ। अंगीं आमुच्या सकळ ॥ ४ ॥

२४९६ न मिळों खावया न वाढों संतान। परि हा नारायण कृपा करों १ ऐसी माझी वाचा मज उपदेशी। आणीक लोकांशीं हेंचि सांगों २ विटंबों शरीर होत कां विपत्ती। पहि राहों चित्तीं नारायण ३ तुका म्हणे नाशिवंत हें सकळ। आठवी गोपाळ तेंचि हित ॥ ४ ॥

२४९७ साकरेचें नाम घेतां कळे गोडी। तैसी आम्हां जोडी वैष्णवांची १ मोक्ष गांठीं असे ठेविला बांधोनी। सोस तो भजनीं आवडीचा २ भोजनाची चिंता माय वाहे बाळा। आम्हां तरी खेळावरी चित्त २ तुका म्हणे आम्ही देहउपकारें। गाऊं निरंतर नाचों लागों ॥ ४ ॥

२४९८ नाहीं मज कृपा केली पांडुरंगें। संतांचिया संगें पोट भरी १ चतुराचे सभे पंडित कुशल। मी काय दुर्बळ विष्णुदास २ तुका म्हणे नेणें करूं समाधान। धरिले चरण विठोबाचे ॥ ३ ॥

२४९९ नेणें अर्थ कांहीं नव्हती माझे बोल। विनवितों कोपाल संत झणीं १ नव्हती माझे बोल बोले पांडुरंग। असे अंगसंगें व्यापूनियां २ मज मूढा शक्ति कैंचा हा विचार। निगमादिकां पार बोलावया ३ राम कृष्ण हरी मुकुंदमुरारी। बोबडया उत्तरीं हेंचि ध्यान ४ तुका म्हणे गुरुकृपेचा आधार। पांडुरंगें भार घेतला माझा ॥ ५ ॥

२५०० उमटे तें ठायीं। तुझे निरोपावें पायीं १ आम्ही करावें चिंतन। तुझें नामसंकीर्तन २ भोजन भोजनाच्या काळीं। मागों करूनियां आळी ३ तुका म्हणे माथां। भार तुझ्या पंढरीनाथा ॥ ४ ॥

२५०१ मज नाहीं तुझ्या ज्ञानाची ते चाड। घेतां वाटे गोड नाम तुझें १ नेणतें लेकरूं आवडीचें तान्हें। बोलतों वचनें आवडीनें २ भक्ती नेणें कांहीं वैराग्य तें नाहीं। घातला विठाई भार तुज ३ तुका म्हणे मांचें निर्लज्ज होऊनि। नाहीं माझें मनी दुजा भाव ॥ ४ ॥

२५०२ तुज पाहतां सामोरीं। दृष्टी फिरे माघारीं १ माझें चित्त तुझ्या पायां। मिठी पडली पंढरीराया २ नव्हे सारिता निराळें। लवण मेळवितां जळें ३ तुका म्हणे बळी। जीव दिला पायांतळीं ॥ ४ ॥

२५०३ पाहतां श्रीमुख सुखावलें सुख। डोळियांची भूक नवजे माझ्या १ जिव्हे गोड तीन अक्षरांचा रस। अमृत जयास फिकें पुढें २ श्रवणींची वाट चोखाळली शुद्ध। गेले भेदाभेद निवारूनी ३ महामळें मन होतें जें गादलें। शुद्ध चोखाळलें स्फटिक जैसें ४ तुका म्हणे माझ्या जीवाचें जीवन। विठ्ठल निधान सांपडलें ॥ ४ ॥

२५०४ बुद्धीचा जनिता लक्षुमीचा पति। आठवितां चित्तीं काय नव्हे १ आणिकां उपायां कोण वांटी मन। सुखाचें निधान पांडुरंग २ गीतीं गांवों नाचों छंदें वाहों टाळी। वैष्णवांचे मेळीं सुखरूप ३ अनंत ब्रह्मांडें एके रोमावळीं। आम्हीं केला भोळीं भावें उभा ४ लटिका हा केला संवसारसिंधु। मोक्ष खरा बंधु नाहीं पुढें ५ तुका म्हणे ज्याच्या नामाचे अंकित। राहिलों निश्चित त्याच्या बळें ॥ ६ ॥

२५०५ बोलावें म्हूण हे बोलतों उपाय। प्रवाह हें जाय गंगाजळ १ भाग्ययोगें कोणा घडेल सेवन। कैचें येथें जन अधिकारी २ मुखीं देतां घांस लपवितीं तोंडें। अंगींचिया भांड असुखानें ४ तुका म्हणे पूजा करितों देवाची। आपुलिया रुची मनाचिये ॥ ४ ॥

२५०६ शीतळ साउली आमुची माउली। विठाई वोळली प्रेमपान्हा १ आऊनि वोसंगा रिघेन वोरस। लागेल तें इच्छे पिईन वरी ४ कृपा तनु माझी सांभाळी दुभोनी। अमृअसंजीवनी लोटलीसे ३ आनंदाचा ठाव झाला माझें चित्तीं। सागर तो किती उपमेसी ४ सैर जाय पडे तयासी सांकडें। सांभाळींत पुढें मागें असे ५ तुका म्हणे चिंता कैसी ते मी नेणें। लडिवाळ तान्हें विठाईचें ॥ ६ ॥

२५०७ संतांचीं उच्छिष्टें बोलतों उत्तरें। काय म्यां गव्हारें जाणावें हें १ विठ्ठलाचें नाम घेतां नये शुद्ध। तेथें मज बोध काय कळे २ करितों कवतुक

बोबड्या उत्तरीं। झणीं मजवरीं कोप धरा २ काय माझी याती नेणां हा विचार। काय मी तें फार बोलों नेणें ४ तुका म्हणे मज बोलवितो देव। अर्थ गुह्य भाव तोचि जाणे ॥ ५ ॥

२५०८ संसार तो कोण लेखे। आम्हा सखे हरिजन १ काळ ब्रम्हानंदें सरे। आवडी उरे संचली २ स्वप्नीं तेही नाहीं चिंता। रात्रीं जातां दिवस ३ तुका म्हणे ब्रह्मरसें। होय सरिसें भोजन ॥ ४ ॥

२५०९ भोळे भाविक हें जुनाट चांगलें। होय तैसें केलें भक्तिभावें १ म्हणवूनि चिंता नाहीं आम्हां दासां। न भ्यों गर्भवासा जन्म घेतां २ आपुलिया इच्छा करूं गदारोळ। भोगूं सर्वकाळ सर्व सुखें ३ तुका म्हणे आम्हां देवाचा सांगात। नाहीं विसंबत येरयेरां ॥ ४ ॥

२५१० असां जी सोवळें। आम्हां तैसेचि निराळें १ आम्ही नयों तुमच्या वाटां। काय लटिकाचा ताठा २ चिंतनचि पुरें। काय सलगीसवें धुरे ३ तुका म्हणे देवा। नका नावडे ते सेवा ॥ ४ ॥

२५११ पुसावेसें हेंचि वाटे। जें जें भेटे तयासी १ देव कृपा करील मज। काय लाज राखील २ अवघियांचा विसर जाला। हा राहिला उद्योग ३ तुका म्हणे चिंता वाटे। कोण भेटे सांगेसा ॥ ४ ॥

२५१२ असोत हे तुझे प्रकार सकळ। काय खळखळ करावी हे १ आमुचें स्वहित जाणतसों आम्ही। तुझें वर्म नामीं आहे तुझ्या २ विचारितां आयुष्य जातें वायांविण। रोज नागवण पडतसे ३ राहेन मी तुझे पाय आठवूनि। आणीक तें मनीं येऊं नेदी ४ तुका म्हणे तेथें येसी अनायासें। थोर तुज पिसें कीर्तनाचें ॥ ५ ॥

२५१३ आतां येणें पडिपाडें। रस सेवूं हा निवाडें। मुंगी नेली गोडें। ठेविलिये अडचणीं १ तैसें होय माझ्या जीवा। चरण न सोडी केशवा। विषयबुद्धी हेवा। वोस पडो सकळ २ भुकेलिया श्वाना। गांठ पडे सवें अन्ना। मुको पाहे प्राणा। परि तोंडिची न सोडी ३ काय जिंकियलें मन। जीवित्व कामातुरा तृण। मागें व्यभिचारीण। भक्ती तुका ये जाती ॥ ४ ॥

२५१४ आतां तुझें नाम गात असें गीतीं। म्हणोनि मानिती लोक मज १ अन्न वस्त्रचिंता नाहीं या पोटाची। वारिली देहाची थोर पीडा २ सज्जन संबंधी तुटली उपाधी। रोकडी या बंदी तुटलोंसें ३ घ्यावा द्यावा कोणें करावा सायास। गेले आशापाश वारोनियां ४ तुका म्हणे तुज कळेल तें आतां। करा जी अनंता मायबापा ॥ ५ ॥

२५१५ आम्ही असों निश्चिंतीनें। पक्या गुणें तुमचिया १ दुराचारी तरले

नामें । घेतां प्रेमें म्हणोनी २ नाहीं तुम्हां धांव घेतां । कृपावंता आळस ३ तुका म्हणे विसरूं काई । तुज वो आई विठ्ठले ॥ ४॥

२५१६ उतरलों पार । सत्य झाला हा निर्धार १ तुझें नाम धरिलें कंठीं केली संसाराची तुटी २ आतां नव्हे बाधा । कोणेविशीं कांहीं कदां ३ तुका म्हणे कांहीं । आतां उरलें ऐसें नाहीं ॥ ४ ॥

२५१७ एकी केली हातोफळी । ठायां बळी पावले ते १ आम्ही देवा शक्तिहीनें । भाकूं तेणें करुणा २ पावटणीं केला काळ । जया बळ होतें तें ३ तुका म्हणे वीरा वीर । संतधीर समुद्र ॥ ४ ॥

२५१८ कपट कांहीं एक । नेणें भुलवायाचें लोक १ तुमचें करितों कीर्तन । गातों उत्तम ते गुण २ दाऊं देणें जडीबुटी । चमत्कार उठाउठी ३ नाहीं शिष्यशाखा । सांगों अयाचित लोकां ४ नव्हे मठपति । नाहीं चाहुरांची वृत्ति ५ नाहीं देवार्चन । असें मांडिलें दुकान ६ नाहीं वेताळ प्रसन्न । कांहीं सांगों खाणाखूण ७ नोहें पुराणिक । करणें सांगणें आणिक ८ नेणें वाद घटापटा । करितां पंडित करंटा ९ नाहीं जाळीत भणदी । उदो म्हणोनि आनंदीं १० नाहीं हालवीत माळ । भोंवतें मेळवुनी गबाळ ११ आगमींचें कुडें नेणें । स्तंभन मोहन उच्चाटणें १२ नव्हे यांच्या ऐसा । तुका निरयवासी पिसा ॥ १३ ॥

२५१९ कराल तें करा । हातें आपुल्या दातारा १ बळियाचीं आम्हीं बाळें । असों निर्भर या सळें २ आतां कोठें काळ । मधीं रिघेल ओंगळ ३ तुका म्हणे पंढरीराया । थापटितों ठोक बाह्या ॥ ४ ॥

२५२० अपराधी म्हणोनि येतों काकुळती । नाहीं तरी होती काय चाड १ येईल तारूं तरी तारा जी देवा । नाहीं तरी सेवा घ्या वो भार २ कासया मी आतां वंचु हें शरीर । आहे बारगीर जायजणें ३ तुका म्हणे मन करूनि मोकळें । आहे साळढाळें उदार मी ॥ ४ ॥

२५२१ आतां गाऊं तुज ओविया मंगळीं । करूं गदारोळी हरिकथा १ होसी निवारिता आमुचें सकळ । भय तळमळ पापपुण्य २ भोगिले ते भोग लावूं तुझे अंगीं । अलिप्त या जगीं होउनी राहों ३ तुका म्हणे आम्ही लाडकीं लेंकुरें । न राहा अंतरें पायाविण ॥ ४ ॥

२५२२ कळेल हें तैसें गाईन मी तुज । जनांसवें काज काय माझें १ करीन मी स्तुति आपुले आवडीं । जैसी माझ्या गोडी वाटे जीवा २ होऊनि निर्भर नाचेन मी छंदें । आपुल्या आनंदें करूनियां ३ काय करूं कळा युक्ति या कुसरी । जाणिवेच्या परी सकळिका ४ तुका म्हणे माझें जयासवें काज । भोळा तो सहज पांडुरंग ॥ ५ ॥

२५२३ काय मागावें कवणासी । त्यासी मागों तो मजपासीं १ जरी मागों पद इंद्राचें । तरी शाश्वत नाहीं त्याचें २ जरी मागों ध्रुवपद । तरी त्यासी येथील छंद ३ स्वर्गभोग मागों पूर्ण । पुण्य सरल्या मागुती येणें ४ आयुष्य मागों चिरंजीव। जीवा मरण नाहीं स्वभावें ५ तुका म्हणे एक मागें। एकपणा नाहीं भंग ॥ ६ ॥

२५२४ काय सांगों तुझ्या चरणांच्या सुखा। अनुभव ठाउका नाहीं तुज १ बोलतां हें कैसें वाटे खरेपण । अमृताचे गुण अमृतासी २ आम्ही एक एका ग्वाही मायपुतें । जाणों तें निरुतें सुख दोघें ३ तुका म्हणे आम्हां मोक्षाचा कांटाळा । कां तुम्ही गोपाळा नेणां ऐसें ॥ ४ ॥

२५२५ काय ऐसा जन्म जावा वायांविण । कांहीं तरी ऋण असों माथां १ कोणें तरी काळें होईल आठव। नाहीं जरी भाव भार खरा २ शता एका तरी जन्माच्या शेवटीं । कृपाळुवा पोटीं येईल दया ३ तुका म्हणे नाहीं फांकों तरी देत। सर्वांचें उचित सांपडलें ॥ ४ ॥

२५२६ कांहीं जडभारीं। पडतां ते अवसरीं १ तुझे आठवावे पाय आम्हीं मोकलूनि धाय २ तान पीडी भूक । शीत उष्ण वाटे दुःख ३ तुका म्हणे लाड। तेथें पुरे माझें कोड ॥ ४ ॥

२५२७ कोठें भोग उरला आतां । आठवितां तुज मज १ आड कांहीं नये दुजें। फळ बीजें आणिलें २ उद्वेग ते वायांविण। कैंचा सीण चिंतनें ३ तुका म्हणे गेला भ्रम। तुमच्या धर्मे पायांच्या ॥ ४ ॥

२५२८ कोठें देवा आलें अंगा थोरपण । बरें होतें दीन होतों तरी १ साधन तें सेवा संतांची उत्तम। आवडीनें नाम गाईजें तें २ न पुसतें कोणी कोठेंही असतां। समाधान चित्ताचिया सुखें ३ तुका म्हणे जन अव्हेरितें मज। तरी केशीराज सांभाळिता ॥ ४ ॥

२५२९ खावें ल्यावें प्यावें। जमाखर्च तुझ्या नांवें १ आतां चुकली खटपट। झाड्यापाड्याचा बोभाट २ आहे नाहीं त्याचें। आम्हां काम सांगायाचें ३ तुका म्हणे चिंता। भार वाहे त्याचे माथां ॥ ४ ॥

२५३० गाऊं नेणें कळाकुसरी । कान धरोनि म्हणे हरी १ माझ्या बोबडिया बोला। चित्त द्यावें वा विठ्ठला २ मज हांसतील लोक। परी मी गाईन निःशंक ३ तुझें नामीं मी निर्लज्ज। काय जनांसवें काज ४ तुका म्हणे माझी विनंति। तुम्ही परिसा कमळापति ॥ ५ ॥

२५३१ घेईन मी जन्म याजसाठीं देवा। तुझी चरणसेवा साधावया १ हरिनामकीर्तन संतांचें पूजन। घालीन लोटांगण महाद्वारीं २ आनंदें निर्भर असों भलते ठायीं। सुखदुःखा नाहीं चाड आम्हां ३ आणीक सायास न करि

न धरीं आस । होईन उदास सर्वभावें ४ मोक्ष आम्हां घरीं कामारी ते दासी । होय सांगों तैसी तुका म्हणे ॥ ५ ॥

२५३२ जाणावें तें काय नेणावें तें काय । ध्यावे तुझे पाय हेंचि सार १ करावें तें काय न करावें तें काय । ध्यावे तुझे पाय हेंचि सार २ बोलावें तें काय न बोलावें तें काय । ध्यावे तुझे षाय हेंचि सार ३ जावें तें कोठें न जावें तें आतां । बरवें आठवितां नाम तुझें ४ तुका म्हणे तूं करिसी तें सोपें । पुण्यें होती पापें आमुच्यामतें ॥ ५ ॥

२५३३ झालें समाधान । तुमचे देखिले चरण १ आतां उठावेसें मना । येत नाहीं नारायणा २ सुरवाडिकपणें । येथें सांपडलें केणें ३ तुका म्हणे भोग । गेला निवारला लाग ॥ ४ ॥

२५३४ तरीच हा जीव संसारीं उदास । धरिला विश्वास तुम्हां सोई १ एके जातीविण नाहीं कळवळा । ओढली गोपाळा सूत्रदोरी २ फुटतसे प्राण क्षणाच्या विसरें । हें तों परस्परें सारिखेंचि ३ तुका म्हणे चित्तीं राखिला अनुभव । तेणें हा संदेह निवारला ॥ ४ ॥

२५३५ तुजविण कोणा । शरण जाऊं नारायणा १ ऐसा न देखें मी कोणी । दुजा तिहीं त्रिभुवनीं २ पाहिलीं पुराणें । धांडोळिलीं दरुषणें ३ तुका म्हणे ठायीं । जडून ठेलों तुझ्या पायीं ॥ ४ ॥

२५३६ तुजविण कांहीं । स्थिर राहे ऐसें नाहीं १ कळों आलें बहुतां रीतिं । पांडुरंगा माझ्या चित्तीं २ मोकलिली आस । सर्वभावें झालों दास ३ तुका म्हणे तूंचि खरा । येर वाउगा पसारा ॥ ४ ॥

२५३७ तुज दिला देह । अजूनि वागवितों भय १ ऐसा विश्वघातकी । घडली कळतां हे चुकी २ बोलतों जें तोंडें । नाहीं अनुभवलें लंडें ३ दंड लाहे केला । तुका म्हणे जी विठ्ठला ॥ ४ ॥

२५३८ तुज पहावें हे धरितों वासना । परि आचरणा नाहीं ठाव १ करिसी कैवार आपुलिया सत्ता । तरीच देखता होईन पाय २ बाहिरल्या वेषें दंडिलें । भीतरीं मुंडिलें नाहीं तैसें ३ तुका म्हणे वायां गेलोंच मी आहे । जरी तुम्ही साह्य नव्हा देवा ॥ ४ ॥

२५३९ तुमच्या पाळणा ओढतसें मन । गेलें विसरोन आपणासी १ लागेल पालटें फेडावें उसणें । येणेंचि प्रमाणें पांडुरंगा २ तुमचे आवडीं संबंधाचा त्याग । घेतला ये लाग जगनिंद्यचा ३ तुका म्हणे जैसा माझा जीव ओढे । तैसेंच तिकडे पाहिजेल ॥ ४ ॥

२५४० तुझें वर्म ठावें । माझ्या पाडियेलें भावें १ रूप कासवाचें परी ।

धरूनि राहेन अंतरीं २ नेदी होऊं तुटी । मेळवीन दृष्टादृष्टीं ३ तुका म्हणे देवा । चिंतन ते तुझी सेवा ॥ ४ ॥

२५४१ तुझें वर्म हातीं । दिलें सांगोनियां संतीं १ मुखीं नाम धरिन कंठीं । अवघा सांठवीन पोटीं २ नवविधा वेढिन आधीं । सांपडलासी भावासंधीं ३ तुका म्हणे बळिये गाढे । कळिकाळ पायां पडे ॥ ४ ॥

२५४२ तुझें नाम गाऊं आतां । तुझ्या रंगीं नाचों था था १ तुझ्या नामाचा विश्वास । आम्हां कैंचा गर्भवास २ तुझें नामीं विसर पडे । तरी कोटी हत्या घडे ३ नाम घ्यारे कोणी फुका । भावें सांगतसे तुका ॥ ४ ॥

२५४३ तूं माझी माउली तूं माझी साउली । पाहतों वाट्टुली पांडुरंगे १ तूं मज येकला वडील धाकुला । तूं मज आपुला सोईरा जीव २ तुका म्हणे जीव तुजपाशीं असे । तुजविण ओस सर्व दिशा ॥ ३ ॥

२५४४ तैसें नव्हों आम्ही विठ्ठलाचे दास । यावें आणिकांस काकुळती १ स्वामीचिया सत्ता ठेंगणें सकळ । आला कळिकाळ हाताखालीं २ अंकिताचा असे अभिमान देवा । समर्पूनि हेवा असों पायीं ३ तुका म्हणे आह्मां इच्छेचें खेळणें । कोड नारायणें पुरवावें ॥ ४ ॥

२५४५ त्यागें भोग माझ्या येतील अंतरा । मग मी दातारा काय करूं १ आतां असों तुझ्या पायीं हें मोटळें । इंद्रियें सकळें काया मन २ सांडी मांडी विधिनिषेधाचा ठाव । न कळतां भाव जाईल वायां ३ तुका म्हणे आतां नका उजगरा । लपवी दातारा अंगीं मज ॥ ४ ॥

२५४६ देखोनियां तुझा सगुण आकार । उभा कटीं कर ठेवुनियां १ तेणें माझ्या चित्ता होय समाधान । वाटतें चरण न सोडावें २ मुखें गातों गीत वाजवितों टाळी । नाचतों राउळीं प्रेमसुखें ३ तुका ह्मणे केलें तुझ्या नामापुढें । तुच्छ हें बापुडें सकळही ॥ ४ ॥

२५४७ न कळे तत्त्वज्ञान मूढ माझी मति । परी ध्यातों चित्तीं चरणकमळ १ आगमाचे भेद मी तों काय जाणें । काळ तो चिंतनें सारीतसें २ कांहीं नेणें परी म्हणवितों दास । होईल त्याचा त्यास अभिमान ३ संसाराची सोय सांडिला मारग । दुरावलें जग एका घायें ४ मागितल्या लागाचें केलेंसें खंडण । एकाएकीं मन राखियलें ४ तुका ह्मणे अगा रखुमादेवी वरा । भक्तकरुणाकरा सांभाळावें ॥ ६ ॥

२५४८ नलगे पहावें अबद्ध वांकडें । उच्चारावें कोडें नाम तुझें १ नाहीं वेळ काळ पंडितांचा धाक । होत कां वाचक वेदवक्ते २ पुराणींही कोठें न मिळे पाहतां । तैशीं या अनंता ठेवूं नामें ३ आपुलिया मना उपजे

आनंद । तैसे करूं छंद कथेकाळीं ॥४॥ तुका म्हणे आम्ही आनंदेंचि धालों । आनंदाचि ल्यालों अळंकार ॥ ५ ॥

२५४९ नाम घेतां मन निवे । जिव्हें अमृताचि स्रवे । होताती बरवे । ऐसे शकुन लाभाचे १ मन रंगलें रंगलें । तुझ्या चरणीं स्थिरावलें । केलिया विठ्ठलें । ऐसी कृपा जाणावी २ जालें भोजनसें दिसे । चिरा पडोनी ठेला इच्छे । धालियाच्या ऐसे । अंगा येती उद्गार ३ सुख भेटों आलें सुखा । निध सांपडला मुखा । तुका म्हणे लेखा । आतां नाहीं आनंदा ॥ ४ ॥

२५५० नाहीं कंटाळलों परी वाटे भय । करावें तें काय न कळतां १ जन वन आम्हां समानचि झालें । कामक्रोध केले पावटणीं २ षडऊर्मी शत्रु जिंकिले अनंता । नामाचिया सत्ताबळें तुझ्या ३ मुख्य धर्म आम्हां सेवकांचा ऐसा । स्वामी करी शिरसां पाळावें ते ४ म्हणवूनि तुका अवलोकूनि पाय । वचनाची पाहे वास एका ॥ ५ ॥

२५५१ नेणें गाणें कंठ नाहीं हा सुस्वर । घालूं तुज भार पांडुरंगा १ नेणें राग वेळ काळ घात मात । तुझे पायीं चित्त ठेवीं देवा २ तुका म्हणे मज चाड नाहीं जनां । तुज नारायणा वांचूनियां ॥ ३ ॥

२५५२ नेणती वेदश्रुती कोणी । आम्हां भाविकांवांचुनी १ रूप आवडे आम्हांसी । तैसी जोडी हृषीकेशी २ आम्ही भावें बळिवंत । तुज घालूं हृदयांत ३ तुका म्हणे तुज धाक । देतां पावसील हांक ॥ ४ ॥

२५५३ पवित्र होईन चरित्र उच्चारें । रूपाच्या आधारें गोजिरिया १ अपुरती बुद्धी पुण्य नाहीं गांठीं । पायीं घाली मिठी पाहे डोळां २ गाईन ओंविया शिष्टांच्या आधारें । सारीन विचारें आयुष्या या ३ तुका म्हणे तुझें नाम नारायणा । ठेवीन मी मना आपुलियां ॥ ४ ॥

२५५४ बरा देवा देवा कुणबी केलों । नाहीं तरी दंभें असतां मेलों १ भलें केलें देवराया । नाचे तुका लागे पायां २ विद्या असती कांहीं । तरी पडतों अपायीं । सेवा चुकतों संतांची । नागवण हे फुकाची ३ गर्व होतां ताठा । जातो यमपंथें वाटा ४ तुका म्हणे थोरपणें । नरक होती अभिमानें ५

२५५५ बहु उतावीळ भक्तिचिया काजा । होसी केशीराजा मायबापा १ तुझ्या पायीं मज झालासे विश्वास । म्हणोनियां आस मोकलिली २ ऋषिमुनि सिद्ध साधक अपार । कळला विचार त्यांसी तुझा ३ नाहीं नास तें सुख दिलें त्यांस । झाले जे उदास सर्वभावें ४ तुका म्हणे सुख न माये मानसीं । धरिलें जीवेंसीं पाय तुझे ॥ ५ ॥

२५५६ बैसों खेळूं जेऊं । तेथें नाम तुझें गाऊं १ रामकृष्ण नाममाळा । घालूं

ओवूनियां गळां २ विश्वास हा धरूं। नाम बळकट करूं ३ तुका म्हणे आतां। आम्हां शरण जीवन शरणांगतां ॥ ४ ॥

२५५७ बोलोमियां काय दावूं। तुम्ही जीऊ जगाचे १ हेंचि आतां माझी सेवा। चिंतन देवा करितों २ विरक्तासी देह तुच्छ। नाहीं आस काशाची ३ तुका म्हणे पायांपाशीं। येईन ऐसी वासना ॥ ४ ॥

२५५८ मज कोणी कांहीं करी। उमटे तुमच्या अंतरीं १ व्याला वाढविलें म्हूण। मज सुख तुज शीण २ माझें पोट धालें। तुझे अंगीं उमटलें ३ तुका म्हणे खेळे। तेथें तुमचिया बळें ॥ ४ ॥

२५५९ मज माझा उपदेश। आणिका नये याचा रीस १ तुम्ही अवघे पांडुरंग। मीच दुष्ट सकळ चांग २ तुमचा मी शरणागत। कांहीं करा माझें हित ३ तुका पाय धरी। मी हें माझें दूर करीं ॥ ४ ॥

२५६० माझें मन पाहे कसून। चित्त न ढळे तुजपासून १ कापुनियां देईन शिर। पाहें कृपण कीं उदार २ मजवरीं घाली घण। परी मी न सोडी चरण ३ तुका म्हणे अंतीं। तुजवांचुनी नाहीं गती ॥ ४ ॥

२५६१ माझें मागणें ते किती। दाता लक्ष्मीचा पति १ जाणें तान्हे-ल्याची तान। पीतां गंगा नव्हे न्यून २ कल्पतरू झाला देता। तेथें पोटाचा मागता ३ तुका म्हणे सतत ध्यातां। परब्रह्मचि आलें हाता ॥ ४ ॥

२५६२ म्हणवितों दास ते नाहीं करणीं। आंत वरीं दोन्ही भिन्न भाव १ गाता नाचतों तें दाखवितों जनां। प्रेम नारायणा नाहीं अंगीं २ पाविजें तें वर्म न कळेंची कांहीं। बुडालों या डोहीं दंभाचिया ३ भांडवल काळें हातोहातीं नेलें। माप या लागलें आयुष्यासी ४ तुका म्हणे वायां गेलों ऐसा दिसे। होईल या हांसें लौकिकाचें ॥ ४ ॥

२५६३ याजसाठीं वनांतरा। जातों सांडुनियां घरा १ माझें दिठावेल प्रेम। बुद्धी होईल निष्काम २ अद्वैताची वाणी। नाहीं ऐकत मी कानीं ३ तुका म्हणे अहंब्रह्म। आड येवों नेदी भ्रम ॥ ४ ॥

२५६४ यातीहीन मज काय तो अभिमान। मानी तुज जन नारायणा १ काय सुख मज तयाची हे खंती। आपुलाला घेती गुणभाव २ द्रव्यामुळें माथां वाहियेली चिंधी। होन जयामधीं होतां गांठी ३ तुका म्हणे जन वंदितों वेगळा। मजसी दुर्बळा काय चाड ॥ ४ ॥

२५६५ रामकृष्ण ऐसीं उच्चारीन नामें। नाचेन मी प्रेमें संतापुढें १ काय घडेल ते घडो ये सेवटीं। लाभ आणि तुटी देव जाणे २ चिंता मोह आशा ठेवुनि निराळी। देईन हा बळी जीव पायीं ३ तुका म्हणे कांहीं उरों नेदी उरीं। सांडीन हे थोरी ओवाळूनि ॥ ४ ॥

२५६६ लाज वाटे मज मानिती हें लोक । हे तों नाहीं एक माझें अंगीं १ मोजुनी झिजलों मापाचियापरी । जाळावी हे थोरी लाभाविण २ कोमळ कंटक तीक्ष्ण अगरीं । पोचट ते वरीं अंगकांति ३ चित्रींचें लेप शृंगारिलें निकें । जीवेंवीण फिकें रूप त्याचें ४ तुका म्हणे दिसे वायां गेलों देवा । अनुभव ठावा नाहीं तेणें ॥ ५ ॥

२५६७ लोक म्हणती मज देव । हा तो अधर्म उपाव १ आतां कळेल तें करी । शीस तुझे हातीं सुरी २ अधिकार नाहीं । पूजा करिती तैसा कांही ३ मन जाणे पापा । तुका म्हणे मायबापा ॥ ४ ॥

२५६८ वाचेच्या चापल्यें बहु झालों कुशळ । नाहीं बीजमूळ हातां आलें १ म्हणोनि पंढरीराया दुःखी होतें मन । अंतरीचें कोण जाणें माझें २ पूज्य झालों अंगा आला अभिमान । पुढील कारण खोळंबलें ३ तुका म्हणे खूण न कळेचि निरुती । सांपडलों हातीं अहंकाराचे ॥ ४ ॥

२५६९ वायांविणें वाढविला हा लौकिक । आणिला लटिका वाद दोघां १ नाहीं ऐसा झाला देव माझ्या मतें । भुकेलें जेवितें काय जाणें २ शब्दज्ञानें गौरविली हे वैखरी । साच तें अंतरीं विंबेचिना ३ झालों परदेशी गेले दोन्ही ठाय । संसार ना पाय तुझे देवा ४ तुका म्हणे मागें कळों येतें ऐसें । न घेतां हें पिसें लावोनियां ॥ ५ ॥

२५७० व्यापक हा विश्वंभर । चराचर याचेनी १ पंढरीराव विटेवरीं । त्याचीं धरीं पाउलें २ अवघियांचा हाचि ठाव । देवोदेवीं सकळ ३ तुका म्हणे न करीं सोस । भेदें दोष उफराटे ॥ ४ ॥

२५७१ शूद्रवंशीं जन्मलों । म्हणोनि दंभें मोकलिलों १ अरे तूंचि माझा आतां । मायबाप पंढरीनाथा २ घोकाया अक्षर । मज नाहीं अधिकार ३ सर्वभावें दीन । तुका म्हणे यातिहीन ॥ ४ ॥

२५७२ संगतीनें होतो पंगतीचा लाभ । अशोभीं अनुभव असिजे तें १ जैसीं तैसीं असों पुढिलांचे सोई । धरिती हातीं पायीं आचारिये २ उपकारी नाहीं देखत आपदा । पुढिलांची सदा दया चित्तीं ३ तुका म्हणे तरी सज्जनाची कीर्ति । पुरवावी आर्ती निर्बळाची ॥ ४ ॥

२५७३ संगें वाढे सीण न घडे भजन । त्रिविध हे जन बहु देवा १ याचिमुळें आला संगाचा कंटाळा । दिसताती डोळां नानाछंद २ एकाविध भाव रहावया ठाव । नेदी हा संदेह राहों चित्तीं ३ शब्दज्ञानी हित नेणती आपुलें । आणीक देखिलें नावडे त्या ४ तुका म्हणे आतां एकलेंचि भलें । बैसोनि उगलें रहावें तें ॥ ५ ॥

२५७४ सर्वात्मकपण । माझें हिरोनी नेतो कोण १ मनीं भक्ताची आवडी ।

देवा व्हावी ऐसी जोडी २ घेईन जन्मांतरें । हेंचि करावया खरें ३ तुका म्हणे देवा । ऋणी करूनि ठेवूं सेवा ॥ ४ ॥

२५७५ सुख सुखा भेटे । मग तोडिल्या न तुटे १ रविरश्मिकळा । नये घालितां पै डोळां २ दुरीं तें जवळीं । सोहें आकाश कवळी ३ तुका म्हणे चित्त । माझें पायीं अखंडित ॥ ४ ॥

२५७६ सुनियांची आवडी देवा । घेत सेवा नाहीं कांहीं १ शिकविलें जवळीं बैसों तेथेंचि २ नेदी दुजें बोलों करूं । गुरु गुरु न साहे ३ तुका म्हणे कुर्वाळितां । अंगें सत्ता संतांची ॥ ४ ॥

२५७७ शेवट तो भला । माझा बहु गोड झाला १ आलों निजाच्या माहेरां । भेटों रखुमाईच्या वरा २ परिहार झाला । अवघ्या दुःखांचा मागिल्या ३ तुका म्हणे वाणी । गेली आतां घेऊं धणी ॥ ४ ॥

२५७८ स्वामीचें हें देणें । येथें पावलों दरुषणें १ करूं आवडीनें वाद । तुमच्या सुखाचा संवाद २ कळावया वर्म । हा तो पायांचाचि धर्म ३ तुका म्हणे सिद्धि । हेचि पावविली बुद्धि ॥ ४ ॥

२५७९ हीन माझी याती । वरि स्तुती केली संतीं १ अंगीं वसूं पाहे गर्व । मासें हरावया सर्व २ मी एक जाणता । ऐसें वाटतसे चित्ता ३ राख राख गेलों वायां । तुका म्हणे पंढरीराया ॥ ४ ॥

२५८० पिंड पदावरीं । दिला आपुलिये करीं १ माझें झालें गयावर्जन । फिटलें पितरांचें ऋण २ केलें कर्मांतर । बोंब मारिली हरिहर ३ तुका म्हणे माझें । भार उतरलें ओझें ॥ ४ ॥

२५८१ धरूनियां चालीं हांवा । येईन गांवा धांवत १ पाठविसी मूळ तरी लवकरीं विठ्ठले २ नाचेन त्या प्रेमसुखें । कीर्ति मुखें गाईन ३ तुका म्हणे संतमेळीं । पायधुळी वंदीन ॥ ४ ॥

२५८२ अचळ न चळे ऐसें झालें मन । धरूनि निजखूण राहिलोंसें १ आवडी बैसली गुणांची अंतरीं । करूं धणीवरीं सेवन तें २ एकविध भाव नव्हे अभावना । आणिक या गुणां न मिळवे ३ तुका म्हणे माझें पडिलें आहारीं । ध्यान विटेवरीं ठाकलें तें ॥ ४ ॥

२५८३ अनुभवाचे रस देऊं आर्तभूतां । सोडूं चोजवितां पुढें पोथी १ देवाचा प्रसाद रत्नाच्या ओवणी । शोभतील गुणीं आपुलियां २ आधीं भाव सार शुद्ध ते भूमिका । बीज आणि पिका चिंता नाहीं ३ तुका म्हणे ज्याचें नाम गुणवंत । तें नाहीं लागत पसरावें ॥ ४ ॥

२५८४ अनुभवा आलें । माझें चित्तींचें क्षरलें १ असें जवळीं अंतरें । फिरे आवडीच्या फेरें २ खादलेंचि वाटे । खावें भेटलेंचि भेटें २ तुका म्हणे उभें । आम्हीं राखियेलें लोभें ॥ ४ ॥

२५८५ अभयांचें स्थळ । तें हें एक अचळ १ तरी धरिला विश्वास । ठेलो होऊनियां दास २ पुरली आवडी । पायीं लागलीसे गोडी ३ तुका म्हणे कंठीं नाम । अंगीं भरलेंसे प्रेम ॥ ४ ॥

२५८६ असो खळ ऐसे फार । आम्हां त्यांचे उपकार १ करिती पातकांची धुणी । मोल न घेतां साबणीं २ फुकाचे मजूर । ओझें वागविती भार ३ पार उतरून म्हणे तुका । आम्हा आपण जाती नरका ॥ ४ ॥

२५८७ असोत लोकांचे बोल शिरावरीं । माझी मज बरी विठाबाई १ आपंगिलें मज आहे ते कृपाळु । बहुत कनवाळु अंतरींची २ वेदशास्त्रें जिसीं वर्णिती पुराणें । तिचें मी पोसणें लडिवाळ ३ जिचें नाम कामधेनु कल्पतरु । तिचें मी लेकरूं तुका म्हणे ॥ ४ ॥

२५८८ आनंदें एकांतीं प्रेमें ओसंडत । घेऊं अगणित प्रेमसुख १ गोप्य धन नये वारा लागों ास । पाहों नेदूं वास दुर्जनांची २ झणीं दृष्टि लागे आवडीच्या रसा । सेवूं जिरे तैसा आपणासी ३ तुका म्हणे हें बहु सुकुमार । न साहावे भार वचनाचा ॥ ४ ॥

२५८९ आजि शिवला मांग । माझें विटाळलें अंग १ यासी घेऊं प्रायश्चित्त । विठ्ठल विठ्ठल हृदयांत २ झाली क्रोधासी भेटी । तोंडावाटे नर्क लोटी ३ अनुतापीं न्हाऊं । तुका म्हणे रवी पाहूं ॥ ४ ॥

२५९० आपुलाला लाहो करूं । केणें भरूं हा विठ्ठल १ भाग्यें पावलों या ठायां । आतां काया कुरवंडी २ पुढती कोठें घडे ऐसें । बहुतां दिसें फावलें ३ तुका म्हणे झाली जोडी । चरण घडी न विसंबे ॥ ४ ॥

२५९१ आपुला तो देह आम्हां उपेक्षीत । कोठें जाऊं हित सांगों कोणा १ कोण नाहीं दक्ष करितां संसार । आम्हीं हा विचार वमन केला २ नाहीं या धरीत जीवित्वाची चाड । कोठें करूं कोड आणिकांचे ३ तुका म्हणे असों चिंतोनियां देवा । मी माझे हा हेवा सारूनियां ॥ ४ ॥

२५९२ आपुला विचार करीन जीवाशीं । काय या जनाशीं चाड मज १ आपुलें स्वहित जाणती सकळ । निरोधितां बळ दुःख वाटे २ आइको नाइको कथा कोणीतरी । जाऊनियां घरीं निजों सुखें ३ माझी कोण वोज झाला हा शेवट । देखोनियां वाट आणिकां लावूं ४ तुका म्हणे भाकूं आपुली करुणा । जयाची वासना तया फळे ॥ ५ ॥

२५९३ आमुची जोडी ते देवाचे चरण । करावें चिंतन विठोबाचें १

लागेल तरी कोणी घ्यावें धर्णावरी । अमूपचि परी आवडीच्या २ उभारिला कर प्रसिद्ध या जग । करूं केला त्याग मागें पुढें ३ तुका म्हणे होय दरिद्र विच्छिन्न । ऐसें देऊं दान एक वेळां ॥ ४ ॥

२५९४ आवडीं भोजन प्रकार परवडी । भिन्नाभिन्न गोडी एक रसा १ भोगित्या पंगतीं लाधलों प्रसाद । तिहीं नाहीं भेद राखियेला २ पाकसिद्धि स्वहस्तकें विनियोग । आवडीचे भाग सिद्ध केले ३ तुका म्हणे आला उच्छिष्ट प्रसाद । तेणें हा आनंद माझ्या जीवा ॥ ४ ॥

२५९५ आम्हां अळंकार मुद्रांचे शृंगार । तुळसीचे हार वाहों कंठीं १ लाडिके डिंगर पंढरीरायाचे । निरंतर वाचे नामघोष २ आम्हा आणिकांची चाड चित्तीं नाहीं । सर्वसुखें पायीं विठोबाच्या ३ तुका म्हणे आम्ही नेघोंचि या मुक्ती । एकाविण चित्तीं दुजें नाहीं ॥ ४ ॥

२५९६ आम्हां आवडे नांव घेतां । तोही पिता संतोषे १ उभयतां एकचित्त । तरी प्रीत वाढली २ आम्ही शोभों निकटवासें । अनारिसें न दिसों ३ तुका म्हणे पांडुरंगें । अवघीं अंगें निवालीं ॥ ४ ॥

२५९७ आम्हां कथा आवश्यक । येर संपादूं लौकिक १ जैसी तैसी माय बरी । मानिल्या त्या माना येरी २ व्यालीचा कळवळा । जीव बहुत कोंवळा ३ कवतुकें वावरें । तुका म्हणे या आधारें ॥ ४ ॥

२५९८ आम्हां वैष्णवांचा । नेम कायां मन वाचां १ धीर धरूं जीवासाठीं । येऊं नेदूं लाभा तुटी २ उचित समय । लाज निवारावें भय ३ तुका म्हणे कळा । जाणों नेम नाहीं बळा ॥ ४ ॥

२५९९ कइं मात माझे ऐकती हे कान । बोलतां वचन संतांमुखीं १ केला पांडुरंगें तुझा अंगीकार । मग होईल धीर माझ्या जीवा २ म्हणवूनि मुख अवलोकितों पाय । हेचि मज आहे थोरी आशा ३ माझिया मनाचा हाचि पैं विश्वास । न करी सायास साधनांचे ४ तुका म्हणे मज होईल भरंवसा । तरलों मी ऐसा साच भावें ॥ ५ ॥

२६०० कुरवंडी करीन काया । वरोनि पायां गोजिरिया १ बैसलें तें रूप डोळां । मन चाळा लागलें २ परतें न सरवे दुरी । आवडी पुरी बैसली ३ तुका म्हणे विसांवलों । येथें धालों धणीवरी ॥ ४ ॥

२६०१ कोणे गांवीं आहे सांगा हा विठ्ठल । जरा ठावा असेल तुम्हां कोणा १ लागतसे पायां येतों लोटांगणीं । मात करी कोणी सांगा याची २ गुण रूप याचे वाणिती या संतां । मज क्षेम देतां सुख वाटे ३ सर्वस्वें हा जीव ठेवीन चरणीं । पांडुरंग कोणी दावी तया ४ तुका म्हणे गाईवत्सां तडातोडी । तैसी जाते घडी एकी मज ॥ ५ ॥

२६०२ खेळतों ते खेळ पायांच्या प्रसादें। नव्हतीं हीं छंदें नासिवंतें १ माझा मायबाप उभा विटेवरी। कवतुकें करी कृपादान २ प्रसादाची वाणी वदे तीं उत्तरें। नाहीं मतांतरें जोडियेलीं ३ तुका म्हणे रस वाढतियां अंगें। छाया पांडुरंगें केली वरी ॥ ४ ॥

२६०३ जे गाती अखंड विठ्ठलाचें गीत। त्यांचे पायीं चित्त ठेवीन मी १ जयांसी आवडे विठ्ठलाचें नाम। ते माझे परम प्राणसखे २ जयांसी विठ्ठल आवडे लोचनीं। त्यांचें पायवणी स्वीकारीन। विठ्ठलासी जिहीं दिला सर्व-भाव। त्यांच्या पायीं ठाव मागईन ३ तुका म्हणे रज होईन चरणींचा। म्हण-विती त्यांच्या हरिचे दास ॥ ५ ॥

२६०४ चित्तीं धरीन मी पाउलें सुकुमार। सकळ विढार संपत्तीचें १ कंठीं धरीन मी नाम अमृताची वल्ली। होईल राहिली शीतळ तनु २ पाहीन श्रीमुख साजिरें सुंदर। सकळां आगर लावण्याचें ३ करीन अंगसंग बाळकाचे परी। बैसेन तोंवरीं नुतरी कडिये ४ तुका म्हणे हा केला तैसा होय। धरिली मनें सोय विठोबाची ॥ ५ ॥

२६०५ जाणावी ती कृपा हरीची जाहली। चिंतनीं लाविली मनबुद्धि १ अनुभव होतां वासना विराली। वृत्ती मुरडली उफराटी २ नामरूप संतसेवन आवडे। कीर्तन पवाडे हरिचे गुण ३ तुका म्हणे हरिकृपेचीं लक्षणें। दिलीं नारायणें प्रेमळासी ॥ ४ ॥

## श्रीनिळोबामहाराज

२६०६ निराश्रीत वाटे मनीं। पडिलों जनीं एकला १ कृपेविण तुमच्या देवा। हळहळ जीवा बहु वाटे २ आजिचा दिवस उद्यां नये। आयुष्य जाये क्षणक्षणां ३ निळा म्हणे करूं काय। न दिसे उपाय प्राप्तीचा ॥ ४ ॥

२६०७ ऐसिये सांपडलों संधीं। सर्वदां द्वंद्वीं काळाचे १ कैसी सुटका होईन आतां। न लक्षेचि सत्ता कर्मगती २ नैष्कर्म्य ऐसें भासे। परि तें नेतुसे सकामीं ३ निळा म्हणे देखुनि भ्यालों। म्हणोनि आलों शरण तुम्हां ४

२६०८ मागें उदंड साधनें केलीं। उत्तीर्ण तीं झालीं कर्मफळें १ परि तीं तुमचें नेदितीच प्रेम। वाढविती श्रम संसारींचा २ जया नाहीं मार्गेचि ठावा। काय ते गांवा पावविती ३ निळा म्हणे कांटवणी। घालिती घालिणीं जाणिवेच्या ॥ ४ ॥

२६०९ निवेदिलें पायापाशीं। जें जें मानसीं होतें तें १ आतां उचित तैसें करा। आम्हीं तों संसारा आंचवलों २ काय नाहीं तुमच्या हातीं।

वचनीं तिष्ठती महासिध्दी ३ निळा म्हणे तुमच्या संगें । पांडुरंगें वर्तिजे ॥४॥

२६१० अवगुणीं देखिलें । म्हणुनियां उपेक्षिलें १ माझें वोढवलें कर्म । फरी आली नेणें धर्म २ तेणेंचि नेणों संतापली । क्षोभें करुणा हारविली ३ निळा म्हणे नये । मोहें पाळावया माय ॥ ४ ॥

२६११ न विसंबेचि माउली बाळा । अद्भुत स्नेहाचा कळवळा १ तुम्ही जाणतसां नित्य । तरि कां ऐसें विपरीत २ आजि निष्ठुर मानसें । आम्हा पीडियलें उपवासें ३ निळा म्हणे शोकें शीण । झाला जाऊं पाहे प्राण ॥ ६॥

२६१२ आंधळिया उगवोनी रवी । न दिसेचि तेंवि मज झालें १ तेविं तुह्मो स्वतःसिध हरी । परी मी माझारीं भ्रांति तमा २ रोग्या रसने कैंची गोड । जे ते निवडी रसस्वाद ३ निळा म्हणे वेडिया गोत । नाढळे धन वित्त दरिद्रिया ॥ ४ ॥

२६१३ तुझिय संगतीं । आम्ही लागलों नेणतीं १ परी तूं कृपावंत हरी । सांभाळिसी सर्वांपरीं २ शहाणे तूंतें चोजविती । उदासी तूं तयांप्रति ३ निळा म्हणे भाविकाला । म्हणवी अंकित मी त्याला ॥ ४ ॥

२६१४ बहुतां दिवसां भेटी आलों । सांभाळिलें पाहिजे १ आलिंगनें निवती प्राण । सुफळ जिणें मग माझें २ हेत मनींचा होईल पूर्ण । दृष्टीं चरण देखतां ३ निळा म्हणे हरेल शीण । बोळवण जन्माची॥ ४ ॥

२६१५ जेववाल तेंचि जेवीन मुखें । पांघरवाल सुखें पांघरेन १ बैसवाल तेथें बैसेन उगा। निजवाल जागा न सोडी ते २ जैसें कराल मी होईन तैसा । न करूनियां आशा आणिकांची ३ निळा म्हणे जें कराल तें तें । होईन आज्ञेतें नुलंघी ॥ ४ ॥

२६१६ ठेवाल तेथें राहेन सुखें । यावरीं हरिखें आपुलिया १ न वंची मी हें सेवेसीं काया । धाडाल ठायां जाईन त्या २ घाल ग्रास ते घालीन मुखीं । न करीं आणखी सोस कांहीं ३ निळा म्हणे कराल आज्ञा । न मोडीं प्राज्ञा तुमची ते ॥ ४ ॥

२६१७ तुमच्याचि चरणांचा महिमा । नेणा तुम्ही पुरुषोत्तमा १ आम्हां दासांचें जीवन । घडे अमृताचेंचि पान २ वृक्ष नेणती फळाची गोडी । भोक्तेचि जाणती ते आवडी ३ निळा म्हणे जाणती संत । भक्त तुमचे ते भाग्यवंत ॥ ४ ॥

२६१८ निरंतर नाम वदनीं । निजरूप ध्यानीं आठवितों १ आणिक देवा कांहीं नेणें । मिरवूं भूषणें भक्तीचीं २ योगसाधन न कळे मंत्र । निगम शास्त्र व्युत्पत्ति ३ निळा म्हणे अज्ञान हरी । आहे परी सर्व मी ॥ ४ ॥

२६१९ आवडोनी रूप मनीं । धरिलें वदनीं हरिनाम १ न लगे आणिक

कांहीं चिंता । गोडीच आतां यावरीं २ काय करूं ते आसनमुद्रा । कृपासमुद्रा तुजवीण ३ निळा म्हणे दिधलें संतीं । नाम एकांतीं तेंचि गोड ॥ ४ ॥

२६२० नका पाहूं माझे क्रिया आचरित । भक्त भागवत नव्हें ज्ञानीं १ आठवितों नाम नेणें दुजी परी । मी माझें श्रीहरी नाहीं गेलें २ गुंतलेसे पायीं मोह ममता आशा । अहो जगदीशा पांडुरंगा ३ निळा म्हणे करा यावरीं कैवार । अहा करुणाकर म्हणोनिया ॥ ४ ॥

२६२१ संत कसेनि भेटती । कैसेनि होती कृपावंत १ सांगा निगुती हें आह्मांसी । तुमच्या पायांसी लागतो २ काय तें करावें पूजन । काय तें धन समर्पावें ३ निळा म्हणे शरण जावें । कैसें विनवावें कोण युक्ती ॥ ४ ॥

२६२२ नाम वाचें आठाविलें । रूप मनीं सांठविलें १ आता फिरुनिया घरां । येशी आपणचि माघारा २ लाविला मोकळ । भाव मागें सर्वकाळ ३ निळा म्हणे आतुडलें । वरें वर्म हाता आलें ॥ ४ ॥

२६२३ पायापाशीं जीव । ठेवियला तुमच्या भाव १ न्याल म्हणोनियां सदना । विठ्ठल देवा कृपाघना २ आळवितों नामें । लाहों करोनिया प्रेमें ३ निळा म्हणे दिवसरातीं । तुजें नेणोनियां चित्तीं ॥ ४ ॥

२६२४ तप साधन हेंचि माझें । गाईन तुझें नाम हरी १ आणिका साधनें उबग आला । विश्वास उपजला हेत्रिविशीं २ कळा कुसरी न येती मना । वांचूनि चिंतना तुमाचिया ३ निळा म्हणे वाचे बोलीं । पडिली चाली याचेपरीं ४

२६२५ विठ्ठल विठ्ठल ह्मणोनि छंदें । ब्रह्मानंदें नाचेन १ धरूनियां दृष्टीपुढें । रूप चोखडें सुरेख २ वारंवार क्षणाक्षणां । ठेवीन चरणांवरीं माथा ३ निळा म्हणे पुरवा कोड । जाणोनी चाड हे माझी ॥ ४ ॥

२६२६ न धरे धीर धरितां मनीं । न संडे वदनीं गुणनाम १ अट्टाहासें गर्जना करी । खवळली वैखरी नाटोपे २ चरित्राचे उठती भार । जिव्हें अक्षर न संडे ३ निळा म्हणे लाविला चाळा । न कळे कळा हे तुमची ॥ ४ ॥

२६२७ अमृताहुनी गोड हरी । नाम उच्चारितां वैखरीं १ घेतां न विटेचि हे रसना । अधिक अधिक आवडी मना २ चित्तासि विश्रांति । इंद्रियें सुखावलीं ठाती ३ निळा म्हणे गोडा गोड । सेवितां सरे अघघी चाड ॥ ४ ॥

२६२८ करीन कैवाड हाचि अनुदिनीं । तुमच्या चिंतनीं पांडुरंगा १ नेदीं जाऊं वायां घटिका एकी पळ । करूं सर्वकाळ हचि चर्चा २ संतसमागमें गाऊं नित्य नामें । आपुलिया प्रेमें आवडीच्या ३ आठवूं सुंदर रूप मनोहर । कटावरी कर ठेविले तें ४ निळा म्हणे माझ्या मनींची आवडी । दाविली उघडी करोनियां ॥ ५ ॥

२६२९ चित्त ठेउनी पायांवरीं । रूप धरूनियां अंतरीं १ सुखें याच्या

नामावळी। आठवीन नित्य काळीं २ करीन ऐसाचि कैवाड। शंका येऊ नेदी आड ३ निळा म्हणे दिवसरातीं। तुम्हां आठवीन श्रीपती ॥ ४ ॥

२६३० बरवी आजि हे जोडी झाली। तुमचीं पाउलें देखिलीं। अवघींच इंद्रिये निवालीं। आलिंगनीं तुमचिया १ वदनीं आठवलें नाम। तुमचें सांपडलें प्रेम। बरवा साधला हा नेम। मनही विश्राम पावलें २ बरवा पंढरपुरां गेलों। सत्संगें महाद्वारां पावलों। भीतरीं राउळीं प्रवेशलों। बरवा भेटलों विठोबासी ३ तेणें पुरले सर्वही काम। रूप डोळां वदनीं नाव। संतांचाही समागम। धणी धाय तों पावलों ४ निळा म्हणे सर्वांपरीं। कृतकृत्य झालों हरी। तुमचा दास मी कामारी। ठेवा दारवंटा राखेन ॥ ५ ॥

२६३१ बरा केला अंगिकार। माझा तुम्ही घेतला भार १ नाहीं तरी जातों वायां। नाना योनि भोगावया २ गाईन यावरी चोखडे। तुमचे कीर्तीचे पवाडे ३ निळा म्हणे ध्यानीं चित्तीं। धरूनी राहें तुमची मूर्ति ॥ ४ ॥

२६३२ न पुरे धणी गुण गातां। रूप दृष्टीं अवलोकितां १ बरवा विठ्ठल हरी। माझे बैसला अंतरीं २ मुख लावण्याची खाणी। राही वामांगीं रुक्मिणी ३ निळा म्हणे दर्पापुढें। दिसे कोंदलें रूपडें ॥ ४ ॥

२६३३ प्रसाद तुमचा लाधला आतां। झालों कृतकृत्यता सनाथ १ पुरविला जीवींचा हेत। होतों चिंतीत मानसीं तो २ कृपा करूनियां दाविलें देवा। आपुला ठेवा उघडूनी ३ निळा म्हणे सद्गुरुनाथा। गाऊं आतां ओविया गीतीं ॥ ४ ॥

## श्रीनामदेवमहाराज

२६३४ धांवत धांवत जाईन वोरसें। दाटला उल्हासें कंठ माझा १ अंतरींचें गुज सांगेनु आपुलें। हृदयीं दाटलें फुटों पाहे २ धरूनि पितांबर नेइनु एकांतीं। सांगेनु मी खंती तयापुढें ३ संतसमागमें खेळेनु कौतुकें। हरिखें भातुकें घेवोनिया ४ अंतरींची आवडी तोचि जाणें एकु। जीवलग जनकु पंढरीरावो ५ नामा म्हणे मज आहे भरंवसा। मना तूं विश्वासा दृढ धरी ६

२६३५ चोरां ओढोनियां नेईजे जें शूळीं। चालतां पाउलीं मृत्यु जसा १ तैसी परी मज झाली नारायणा। दिवसेंदिवस उणा होत असे २ वृक्षाचिये मुळीं घालितां कुऱ्हाडी। वेंचे तैसी घडी आयुष्याची ३ नामा म्हणे हेंही लहरींचें जळ। आटत सकळ भानुतेजें ॥ ४ ॥

२६३६ श्रीहरी श्रीहरी ऐसें वाचें म्हणेन। वाचां धरिसी तरी मी श्रवणीं ऐकेन १ श्रवणीं दाटसी तरी मी नयनीं पाहीन। ध्यानीं मी ध्याईन जेथें तेथें २ जेथें जाय तेथें लाधला हा आम्हां। न सांडी तुझें वर्म म्हणे नामा ३

२९६० गोमट्या बीजाचीं फळेंही गोमटीं। वाढे तेंचि पोटीं समतुक १ जातीच्या संतोषें चित्तासी विश्रांति। परतोनि मागुती फिरों नेणें २ खऱ्याचे पारखीं येत नाहीं तोटा। निवडे तो खोटा ढाळें दुरी ३ तुका म्हणे मज सत्याची आवडी। करितां तांतडी येत नाहीं ॥ ४ ॥

२९६१ चंदनाचें गांवीं सर्पांची वसती। भोगिती ते होती द्वीपांतरीं १ एका ओझें एका लाभ घडे देवा। संचिताचा ठेवा वेगळाला २ क्षीराची वसती अशुद्ध सेवावें। जवळीं तें जावें भोगें दुरीं ३ तुका म्हणे ऐसी बुद्धि ज्याची जड। त्याहुनी दगड बरें देवा ॥ ४ ॥

२९६२ पायां जाला नारू। तेथें बांधला कापुरू। तेथें बिबव्याचें काम। अधमासी तो अधम १ रुसला गुलाम। धणी करीतो सलाम। तेथें चाकराचें काम। अधमासी तो अधम २ रुसली घरची दासी। धणी समजावी तियेसी। तेथें बटकीचें काम। अधमासी तो अधम ३ देव्हाऱ्यावरीं विंचू आला। देवपूजा नावडे त्याला। तेथें पैजाराचें काम। अधमासी तो अधम ४ तुका म्हणे जाती। जातीसाठीं खाती माती ॥ ५ ॥

२९६३ दर्पणासी बुजे। नखटें तोंड लपवी लाजे १ गुण ज्याची जो अंतरीं। तोचि त्यास पीडा करी २ चोरा रुचे निशी। देखोनियां विटे शशी ३ तुका म्हणे जन। देवा असे भाग्यहिन ॥ ४ ॥

२९६४ अति झालें उत्तम वेश्येचें लावण्य। परि ते सवासीण न म्हणावी १ उचित अनुचित केलें ठायां ठाव। गुणां मोल वाव थोरपणा २ शूरत्वावांचूनि शूरांमाजीं ठाव। नाहीं अविर्भाव आणिलिया ३ तुका म्हणे सांग पोटाचे उपाय। कारण कमाईविण नाहीं ॥ ४ ॥

२९६५ आधींच आळसी। वरीं गुरूचा उपदेशी १ मग त्या कैंची आडकाठी। विधिनिषेधाची भेटी २ नाचरवे धर्म। न करवे विधी कर्म ३ तुका म्हणे ते गाढव। घेती मनासवें धांव ॥ ४ ॥

२९६६ रासभ धुतला महातीर्थामाजीं। नव्हे जैसा तेजी शामकर्ण १ तेवीं खळा काय केल्या उपदेश। नव्हेचि मानस शुद्ध त्याचें २ सर्पासी पाजिलें शर्करापीयूष। अंतरींचें विष जाऊं नेणें ३ तुका म्हणे श्वाना क्षीरीचें भोजन। सवेंचि वमन जेवीं तया ॥ ४ ॥

२९६७ अभक्त ब्राह्मण जळो त्याचें तोंड। काय त्यासी रांड प्रसवली १ वैष्णव चांभार धन्य त्याची माता। शुद्ध उभयतां कुळ याती २ ऐसा हा निवाडा झालासे पुराणीं। नव्हे माझी वाणी पदरींची ३ तुका म्हणे आगी लागो थोरपणा। दृष्टी त्या दुर्जनां न पडो माझी ॥ ४ ॥

२९६८ महारासी शिवे । कोपे तो ब्राह्मण नव्हे १ तया प्रायश्चित्त कांहीं । देहत्याग करितां नाहीं २ नातळे चांडाळ । त्याचा अंतरीं विटाळ ३ ज्याचा संग चित्तीं । तुका म्हणे तो त्या यातीं ॥ ५ ॥

२९६९ धिग् तो दुर्जन नाहीं भूतदया । व्यर्थ माय तया प्रसवली १ कठीण हृदय तया चांडाळाचें । जो नेणें पराचें दुःख कांहीं २ आपुला हा प्राण तैसें सकळ लोक । न करी विवेक पशु जैसा ३ तुका म्हणे सुखें कापीतसे गळे । आपुलिया वेळे रडतसे ॥ ४ ॥

२९७० देखोनि पुराणिकाची दाढी । रडे फुंदे नाक ओढी १ प्रेम खरें दिसें जना । भिन्न अंतरीं भावना २ आवरितां नावरे । खुर आठवी नेवरे ३ बोलों नये मुखावाटां । म्हणे होता ब्यांचा तोटा ४ दोन्ही सिंगें चारी पाय । खुणा दावी म्हणे होय ५ मना आणितां बोकड । मेला त्याची ज्ञरफड ६ होता भाव पोटीं । मुखा आलासे शेवटीं ७ तुका म्हणे कुडें । कळों येतें तें रोकडें ॥ ८ ॥

२९७१ दर्पणासी नखटें लाजे । शुद्ध खिजे देखोनि १ ऐसें अवगुणांच्या बाधें । दिसें सुदें विपरीत २ आंधळ्यासी काय हिरा । गारांचि तो सारिखा तुका म्हणे भुंके सुनें । ठायां नेणे ठाव तो ॥ ४ ॥

२९७२ दुधाचे घागरीं मद्याचा हा बुंद । पडिलिया शुद्ध नव्हे मग १ तैसें खळांमुखें न करावें श्रवण । अहंकारें मन विटाळलें २ काय करावीं तीं बत्तीस लक्षणें । नाक नाहीं तेणें वांयां गेलीं ३ तुका म्हणे अन्न जिरों नेदी माशी । आपुलिया जैशी संवसर्गे ॥ ४ ॥

२९७३ मुसळाचें धनु नव्हे हो सर्वथा । पाषाण पिळितां रस कैंचा १ वांझे बाळा जैसें दूध नाहीं स्तनीं । गारा त्या आधणीं न सीजती २ नवखंड पृथ्वी पिके मृगजळें । डोंगर भेटे बळें असमानासी ३ नश्वर देह तैसें तेव्हां होय ब्रह्म । तुका म्हणे श्रम करुनी काय ॥ ४ ॥

२९७४ तांबियाचें नाणें न चले खऱ्या मोलें । जरी हिंडविलें देशोदेशीं १ करणीचें कांहीं न मने सज्जना । यावें लागे मना वृद्धांचिया २ हिरिया-सारिखा दिसे शिरगोळा । पारखी ते डोळां न पाहातां ३ देऊनियां भिंग कामाविलें मोतीं । पारखिया हातीं घेता नये ४ तुका म्हणे काय नटोनियां व्यर्थ । आपुलें हें चित्त आपणा ग्वाही ॥ ५ ॥

२९७५ जातिचें तें चढे प्रेम । पक्षी स्मरे रामराम १ ते काय गुण लागती येरां । कागा पिंजरा शोभेना २ शिकविलें तें सुजात सोसी । मग त्यासी मोल चढे ३ तुका म्हणे वेषधारी । हिजड्या नारी न होती त्या ॥ ४ ॥

२९७६ घेऊं नये तैसें दान । ज्याचें धन अभिलाषी १ तोही येथ कामा

नये । नरका जाय म्हणोनि २ विकी स्नान संध्या जप । करी तप पुढिलांचें ३ तुका म्हणे दांभिक तो । नरका जातो स्वइच्छा ॥ ४ ॥

२९७७ कोडियाचें गोरेपण । तैसें अहंकारी ज्ञान १ त्यासी अंतरीं रिझे कोण । जवळीं जातां चिळसवाणें २ प्रेतदेहा गौरविलें । तैसें विटंबवाणें झालें ३ तुका म्हणे खाणें विष्ठा । तैशा देहबुद्धि चेष्टा ॥ ४ ॥

२९७८ पिंडपोषकाच्या जळों ज्ञानगोष्टी । झणी दृष्टी भेटी नहों त्याची १ नाहीं संतचिन्ह उमटलें अंगीं । उपदेशालागीं पात्र झाला २ पोहों नेणें कासे लाविती आणिकां । म्हणावें त्या मूर्खा काय आतां ३ सिणलें तें गेलें सिणलियापासीं । जाली त्या दोघांसी एक गति ४ तुका म्हणे अहो देवा दीनानाथा । दरुषण आतां नको त्याचें ॥ ५ ॥

२९७९ उचित न कळे इंद्रियांचे ओढीं । मुखें बडबडी शिकले तें १ आपण जाऊन न्यावीं नरकास । बळें बेताळीस कुळें जग २ अबोलणें बोले डोळे झांकुनियां । बडबडी वांयां दंभासाठीं ३ तुका म्हणे आम्हीं तेथील पारखी । नाचे देखोवेखीं जाणों खरें ॥ ४ ॥

२९८० शिकल्या बोलाचे सांगतील वाद । अनुभव भेद नाहीं कोणा १ पंडित हे ज्ञानी करितील कथा । न मिळती अर्था निजसुखा २ तुका म्हणे जैसी लांचासाठीं ग्वाही । देतील हे नाहीं ठावी वस्तु ॥ ३ ॥

२९८१ अज्ञानाची भक्ति इच्छिती संपत्ती । तयाचिये चित्तीं बोध कैंचा १ अज्ञानाची पूजा कामिक भावना । तयाचिया ध्याना देव कैंचा २ अज्ञानाचें कर्म फळीं ठेवी मन । निष्काम साधन तया कैंचें ३ अज्ञानाचें ज्ञान विषयावरीं ध्यान । ब्रह्म सनातन तयां कैंचें ४ तुका म्हणे जळों ऐसियांचें तोंड । अज्ञानाचें बंड वाढविती ॥ ५ ॥

२९८२ जीव तोचि देव भोजन ते भक्ति । मरण ते मुक्ति पाखांड्याची १ पिंडाच्या पोषकीं नागविलें जन । लटिकें पुराण केले वेद २ मना आला तैसा करिती विचार । म्हणती संसार नाहीं पुन्हा ३ तुका म्हणे पाठीं उडती यमदंड । पापपुण्य लंड न विचारिती ॥ ४ ॥

२९८३ कन्या गो करी कथेचा विकरा । चांडाळ तो खरा तया नांवें १ गुण अवगुण हे दोन्ही प्रमाण । यातीशीं कारण नाहीं देवा २ जे जैसें करिती ते तैसें पावती । भोग ते भोगिती केलें कर्मी ३ आशाबद्ध करूं नये तें करिती । तुका म्हणे जाती नरकामधीं ॥ ४ ॥

२९८४ साळंकृत कन्यादान । पृथ्वीदानाच्या समान १ परि तें न कळे या मूढा । येईल कळों भोग पुढां २ आचरितां कर्म भरे पोट राहे धर्म ३ सत्यां

देव साहे। ऐसें करूनियां पाहें ४ अन्न मान धन। हें तो प्रारब्धाआधीन ५ तुका म्हणे सोसें। दुःख आतां पुढें नासे॥ ६ ॥

२९८५ उभ्या बाजारांत कथा। हें तों नावडे पंढरिनाथा १ अवघें पोटासाठीं ढोंग। तेथें कैंचा पांडुरंग २ लावी अनुसंधान। कांहीं देईल म्हणवून ३ काय केलें रांडलेंका। तुला राजी नाहीं तुका॥ ४ ॥

२९८६ अवघ्या वाटा जाल्या क्षीण। कळीं न घडे साधन। उचित विधी विधान। न कळे न घडे सर्वथा १ भक्तिपंथ बहु सोपा। पुण्य नागवे या पापा। येणें जाणें खेपा। येणेंचि एक खंडती २ उभारोनि बाहे। विठो पालवीत आहे। दासां मीच साहे। मुखें बोले आपुल्या ३ भाविक विश्वासी। पार उतरिलें त्यांसी। तुका म्हणे नासी। कुतर्क्यांचे कपाळीं॥ ४ ॥

२९८७ वैद्य वांचविती जीवा। तरी कोण ध्यातें देवा १ काय जाणे कैसी परी। प्रारब्ध तें ठेवी उरीं २ अंगीं दैवत संचरें। मग तेथें काय उरें ३ नवसें कन्या पुत्र होती। तरी कां करणें लागे पती ४ जाणे हा विचार। स्वामी तुकयाचा दातार॥ ५ ॥

२९८८ एक ब्रम्हचारी गाढवा झोंबतां। हाणोनियां लाता पळालें तें १ गाढवही गेलें ब्रम्हचर्य गेलें। तोंड काळें झालें जगामाजीं २ होणार तैसें झालें हें ना तैसें केलें। तुका म्हणे गेलें वांयांचि तें॥ ३ ॥

२९८९ सांगों जाणती शकुन। भूत भविष्य वर्तमान १ त्यांचा आम्हांसी कांटाळा। पाहों नावडती डोळां २ रिद्धिसिद्धीचे साधक। वाचां सिद्ध होती एक ३ तुका म्हणे जाती। पुण्यक्षयें अधोगतीं॥ ४ ॥

२९९० वाहावलें जावों राहिलें सांभाळा। आठवा गोपाळा आतां तरीं १ उरलें आयुष्य लावा हरिनामीं। वेंचूं नका कामीं विषयांच्या २ सांगतों सकळां नका हा कंटाळा। मानाल हों पाळा गोष्टी माझ्या ३ तुका म्हणे आम्हा कोण हे गरज। परी अधोक्षज बोलवितो॥ ४ ॥

२९९१ ऐसा हा लौकिक कदा राखवेना। पतितपावना देवराया १ संसार करितां म्हणती हा दोषी। टाकितां आळसी पोटपोसा २ आचार करितां म्हणती हा पसारा। न करितां नरा निंदिताती ३ संतसंग करितां म्हणती हा उपदेशी। येरा अभाग्यासी ज्ञान नाहीं ४ धन नाहीं त्यासी ठायींचा करंटा। समर्थासी ताठा लाविताती ५ बहु बोलों जातां म्हणती हा वाचाळ। न बोलतां सकळ म्हणती गर्वी ६ भेटीसी न वजतां म्हणती हा निष्ठुर। येतां जातां घर बुडविलें ७ लग्न करूं जातां म्हणती हा मातला। न करितां जाला नपुंसक ८ निपुत्रिका म्हणती पहा हो चांडाळ। पातकाचें

मूळ पोरवडा ९ लोक जैसा ओक धरितां धरवेना । अभक्ता जिरेना संत-
संग १० तुका म्हणे आतां ऐकावें वचन । त्यजुनियां जन भक्ति करा ॥ ११ ॥

२९९२ जन हें सुखाचें दिल्या घेतल्याचें । अंत हें काळींचें नाहीं कोणी १
जाल्या हीन शक्ति नाकडोळे गळती । सांडोनि पळती रांडा पोरें २ बाइल
म्हणे खर मरतां तरी बरें । नासिलें हें घर थुंकोनियां ३ तुका म्हणे माझीं
नव्हतील कोणी । तुज चक्रपाणीवांचूनियां ॥ ४ ॥

२९९३ लटिक्याचें आंवतणें जेविलिया साच । काय त्या विश्वास तोचि
खरा १ कोल्हाटिणी लागे आकाशीं खेळत । तें काय पावत अमरपद २
जळमंडपयाचे घोडे राउत नाचती । ते काय तगती युद्धालागीं ३ तुका म्हणे
तैसें मतवादीयांचें जिणें । दिसे लाजिरवाणें बोलतांची ॥ ४ ॥

२९९४ भगवें तरी श्वान सहज वेष त्याचा । तेथें अनुभवाचा काय
पंथ १ वाढवुनी जटा फिरे दाही दिशा । तरी जंबु वेषा सहजस्थिति २
कोरोनियां भूमी करिती मधीं वास । तरी उंदरास काय वाणी ३ तुका म्हणे
ऐसें कासया करावें । देहासी दंडावें वाउगेंचि ॥ ४ ॥

२९९५ शब्दज्ञानी येऊं नेदीं दृष्टीपुढें । छळवादी कुडें अभक्त ते १ जळों
ते जाणीव जळों त्यांचे दंभ । जळों त्यांचें तोंड दुर्जनांचें २ तुका म्हणे येती
दाटूनि छळाया । त्यांच्या बोडूं डोया न धरूं भीड ॥ ३ ॥

२९९६ जगीं कीर्ति व्हावी । म्हणोनि जालासी गोसावी १ बहुत केलें
पाठांतर । वर्म राहिलेंसें दूर २ चित्तीं नाहीं अनुताप । लटिकें भगवें स्वरूप
३ तुका म्हणे सिंदळीच्या । व्यर्थ श्रमविली वाचा ॥ ४ ॥

२९९७ तक्र शिष्या मान । दुग्धा म्हणे नारायण १ ऐशीं ज्ञानाचीं डोबडें ।
आशा विटंबिली मूढें २ उपदेश तो जगा । आपण सोंवळा इतका मांगा ३
रसना शिश्नाचे अंकित । तुका म्हणे वरदळ स्फीत ॥ ४ ॥

२९९८ देखोवेखीं करिती गुरु । नाहीं ठाऊका विचारु १ वर्म तें न पडे
ठायीं । पांडुरंगाविण कांहीं २ कळा शिकों येती । प्रेम नाहीं कोणाहातीं ३
तुका म्हणे सार । भक्ति नेणती गव्हार ॥ ४ ॥

२९९९ एक करिती गुरु गुरु । भोंवतां भारु शिष्यांचा १ पुंस नाहीं पाय
चारी । मनुष्य परी कुतरीं तीं २ परस्त्री मद्यपान । पेंडखाण माजविलें ३
तुका म्हणे निर्भर चित्तीं । अधोगती जावया ॥ ४ ॥

३००० ऐसे कैसे झाले भोंदू । कर्म करोनि म्हणती साधु १ अंगीं लावू-
निया राख । डोळे झांकुनि करिती पाप २ दावुनि वैराग्याची कळा । भोगी
विषयांचा सोहळा ३ तुका म्हणे सांगों किती । जळों तयांची संगती ॥ ४ ॥

३००१ संत चिन्हें लेउनि अंगीं । भूषण मिरविती जगीं १ पडिले दुःखाचे

सागरीं। वाहावले ते भवपुरीं २ काम क्रोध लोभ चित्तीं। वरिवरीं दाविती विरक्ति ३ आशापाशीं लावुनि चित्त। म्हणती झालों आम्ही मुक्त ४ त्यांचे लागले संगतीं। जाली त्यांची तेचि गति ५ तुका म्हणे शब्दज्ञानें। जग नाडियेले तेणें ॥ ६ ॥

३००२ टिळा टोपी उंच दावी। जगीं मी एक गोसावी १ अवघा वरपंग सारा। पोटीं विषयांचा थारा २ मुद्रा लाविती कोरोनि। मान व्हावया जनीं ३ तुका म्हणे ऐसे किती। नरका गेले पुढें जाती ॥ ४ ॥

३००३ होऊनियां जंगम विभूति लाविती। शंख वाजविती घरोघरीं १ शिवाचें निर्माल्य तीर्थ न सेविती। घंटा वाजविती पोटासाठीं २ तुका म्हणे त्यासी नाहीं शिवभक्ति। व्यापार करिती संसाराचा ॥ ३ ॥

३००४ लावूनियां मुद्रा बांधोनियां कंठीं। हिंडे पोटासाठीं देशोदेशीं १ नेसोनि कौपीन शुभ्रवर्ण जाण। पाहाती पक्वान्न क्षेत्रींचें तें २ तुका म्हणे ऐसे मायेचे मईंद। त्यांपासीं गोविंद नाहीं नाहीं ॥ ३ ॥

३००५ कौडीकौडीसाठीं फोडिताती शिर। काढूनि रुधिर मलंग ते १ पांघरती चर्म लोहाची सांकळी। मारिती आरोळी धैर्यबळें २ तुका म्हणे त्यांचा नव्हेचि स्वधर्म। नकळेचि वर्म गोविंदाचें ॥ ३ ॥

३००६ कान फाडूनियां मुद्रा ते घालिती। नाथ म्हणविती जगांमाजीं १ घालोनियां फेरा मागती द्रव्यासी। परी शंकरासी नोळखती २ पोट भरावया शिकती उपाय। तुका म्हणे जाय नरकलोका ॥ ३ ॥

३००७ लांबवूनिया जटा नेसोनि कासोटा। अभिमान मोठा करिताती १ सर्वांगा करिती विभूतिलेपन। पाहाती मिष्टान्न भक्षावया २ तुका म्हणे त्यांचा नव्हे हा स्वधर्म। न कळतां वर्म मिथ्यावाद ॥ ३ ॥

३००८ होउनि संन्यासी भगवीं लुगडीं। वासना न सोडी विषयांची १ निंदिती कदान्न इच्छिती देवान्न। पाहातातीं मान आदराचा २ तुका म्हणे ऐसे दांभिक भजन। तया जनार्दन भेटे केवीं ॥ ३ ॥

३००९ टिळा टोपी माळा देवाचें गवाळें। वागवी वोंगळें पोटासाठीं १ तुळसी खोवी कानीं दर्भ खोवी शेंडीं। लटिकी धरीं बोंडी नासिकाची २ कीर्तनाचे वेळें रडे पडे लोळे। प्रेमेंविण डोळे गळताती ३ तुका म्हणे ऐसे मायेचे मईंद। त्यांपाशीं गोविंद नाहीं नाहीं ॥ ४ ॥

३०१० डोई वाढवूनि केश। भूतें आणितीं अंगास १ तरी ते नव्हती संतजन। तेथें नाहीं आत्मखूण २ मेळवूनि नरनारी। शकुन सांगती नानापरी ३ तुका म्हणे मैंद। नाहीं त्यापासी गोविंद ॥ ४ ॥

३०११ भोंदावया मीस घेऊनि संतांचें । करी कुटुंबाचें दास्य सदा १ मनुष्याचे परी बोल रावा करीं । रंजवी नरनारी जगामध्यें २ तिमयाचा बैल करी शिकवीलें । चित्रींचें बाहुलें गोष्टी सांगे ३ तुका म्हणे देवा जळों हे महंती । लाज नाहीं चित्तीं निसुगातें ॥ ४ ॥

३०१२ ऐसे संत झाले कळीं । तोंडी तमाखूची नळी १ स्नानसंध्या बुडविली । पुढें भांग वोडवली २ भांग भुर्का हें साधन । पचनीं पडे मद्यपान ३ तुका म्हणे अवघें सोंग । तेथें कैंचा पांडुरंग ॥ ४ ॥

३०१३ साधक झाले कळीं । गुडगुडीची लांब नळी १ पचनीं पडे मद्यपान । भांगसुर्का हें साधन २ अभेदाचें पाठांतर । अति विषयीं पडिभर ३ चेल्यांचा सुकाळ । पिंडदंड भंगपाळ ४ सेवा मान धन । बरे इच्छेनें संपन्न ५ सोंगाच्या नरकाडी । तुका बोडोनियां सोडी ॥ ६ ॥

३०१४ कलियुगीं कवित्व करिती पाषांड । कुशल हे भांड बहु झाले १ द्रव्य दारा चित्तीं प्रजांची आवडी । मुखें बडबडी कोरडाची २ दंभ करी सोंग मानावया जग । मुखें बोलें त्याग मनीं नाहीं ३ वेदाज्ञे करोनि न करिती स्वहित । नव्हती अलिप्त देहाहूनि ४ तुका म्हणे दंड साहील यमाचे । न करी जो वाचें बोलें तैसें ॥ ५ ॥

३०१५ कवीश्वरांचा तो आम्हासी विटाळ । प्रसाद वोंगळ चिवडिती १ दंभाचे आवडीं बहिरट अंधळे । शेवटासि काळें होईल तोंड २ सोन्याशेजारीं तों लाखेची जतन । संतत ते गुण जैसे तैसे ३ सेव्यसेवकता न न पडतां ठावी । तुका म्हणे गोवीं पावती हीं ॥ ४ ॥

३०१६ घरोघरीं जाले कवी । नेणे प्रसादाची चवी १ लंडा भूषणांची चाड । पुढें न विचारी नाड २ काढावें आइतें । तेंचि जोडावें स्वहितें ३ तुका म्हणे कळे । आहाच झांकतील डोळे ॥ ४ ॥

३०१७ उष्ट्या पत्रावळी करूनियां गोळा । दाखविती कळा कवित्वाची १ ऐसे जे पातकी ते नरकीं पांचती । जोंवरी भ्रमती चंद्र सूर्य २ तुका म्हणे एका नारायणा ध्याई । वरकडा वाहीं शोक वसे ॥ ३ ॥

३०१८ आशाबद्ध वक्ता । भय श्रोतयांच्या चित्ता १ गातों तेंहीं नाहीं ठावें । तोंड वाशीं कांहीं द्यावें २ झालें लोभाचें मांजर । भीक मागे दारोदार ३ उभयतां लोभी मन । वांयां गेलें तें भजन ४ बहिरे मुके एके ठायीं । तैसें झालें तया दोहीं ५ माप आणि गोणी । तुका म्हणे रितीं दोन्हीं ॥ ६ ॥

३०१९ कथे उभा अंग राखेल कोणी । ऐसा कोण गणी तया पापा १ येथें तो पातकी न येतांच भला । रणीं कुचरला काय चाले २ कथेसी बैसोनि

आणीक खर्चा । धिग त्याची वाचा कुंभपाक ३ तुका म्हणे पेलपैल ते थडीचे । बुडतील साच मध्यभागीं ॥४॥

३०२० नावडे ज्यां कथा उठोनियां जाती । ते यमा फावती बरे वोजा १ तो असे जवळीं गोचिडाच्या न्यायें । देशत्यागें ठाय तया दूरीं २ नव्हे भला कोणी नावडे दुसरा । पाहुणा किंकरा यमा होय ३ तुका म्हणे तया करावें तें काई । पाषाण कां नाहीं जळामध्यें ॥ ४ ॥

३०२१ असंत लक्षण भूतांचा मत्सर । मनास निष्ठुर अतिवादी १ अंतरींचा रंग उमटे बाहेरी । वोळखी यापरी आपेंआप २ संत ते समय वोळखती वेळ । संतुष्ट निर्मळ चित्त सदां ३ तुका म्हणे हित उचित अनुचित । मज लागे नित आचरावें ॥ ४ ॥

३०२२ नये नेत्रीं जळ । नाहीं अंतरीं कळवळ १ तों हे चावटीचे बोल । जग रंजवणें फोल २ न फळे उत्तर । नाहीं स्वामी जों सादर ३ तुका म्हणे भेटी । जंव नाहीं दृष्टादृष्टी ॥ ४ ॥

३०२३ सोंगें छंदें कांहीं । देव जोडे ऐसें नाहीं १ सारा अवघें गाबाळ । डोळ्या आडील पडळ २ शुद्ध भावाविण । जो जो केला तो तो सीण ३ तुका म्हणे फळे । परी होताती अंधळे ॥ ४ ॥

३०२४ काय ती करावीं मोलाचीं माकडें । नाचताती पुढें संसाराच्या १ झाडा देतेवेळें विचकिती दांत । घेती यमदूत दंड वरी २ हात दांत कान हालविती मान । दाखविती जन हे मानावया ३ तुका म्हणे किती झालीं हीं फजित । मागें नाहीं मीत भारवाही ॥ ४ ॥

३०२५ एक म्हणती आम्ही देवचि पैं झालों । ऐसें नका बोलों पडाल पतनीं १ म्हणती आम्ही देवाचीं पैं रूपें । तरी तुमचिया बापें न चुके जन्म २ देवें उचलिली स्वकरें मेदिनी । तुमचेनि गोणी नुचलवे ३ देवें मारियेले दैत्यदानव मोठे । तुमचेनी न तुटे तृणमात्र ४ राया विठोबाचें पद जो अभिलाषी । पातकांची राशी तुका म्हणे ॥ ५ ॥

३०२६ कुशळ गुंतले निषेधा । वादी प्रवर्तले वादां १ कैसीं ठकलीं बापुडीं । दंभविषयांचें सांकडीं २ भूस उपणूनि केलें काय । हारपले दोन्ही ठाय ३ तुका म्हणे लागे हातां । काय मथिलें घुसळितां ॥ ४ ॥

३०२७ नेत्र झांकोनिया काय जपतोसी । जंव नाहीं मानसीं भाव प्रेम १ उघडा मंत्र जाणा रामकृष्ण म्हणा । तुटती यातना गर्भवास २ मंत्र तंत्र कांहीं करिसी जडी बुटी । तेणें भूतसृष्टी पावशील ३ सार तुका जपे बीज मंत्र एक । भवसिंधुतारक रामकृष्ण ॥ ४ ॥

३०२८ तीळ जाळिले तांदूळ । काम क्रोध तैसेचि खळ १ कां रे सिण-लासी वाउगा । न भजतां पांडुरंगा २ मानदंभासाठीं । केली अक्षरांची आटी ३ तप करूनि तीर्थाटन । वाढविला अभिमान ४ वांटिलें तें धन । केली अहंता जतन ५ तुका म्हणे चुकलें वर्म । केला अवघाचि अधर्म ॥ ६ ॥

३०२९ भोरप्यानें सोंग पालटिलें वरी । बक ध्यान धरी मत्स्या जैसें १ टिळे माळा मैंद मुद्रा लावी अंगीं । देखों नेदी जगीं फांसे जैसे २ ढीवर या मत्स्या चारा घाली जैसा । भीतरील फांसा कळों नेदी ३ खाटिक हा स्नेह-वादें पशु पाळी । कापावया नळी तयासाठीं ४ तुका म्हणे तैसा भला मी लोकांत । परी तूं कृपावंत पांडुरंगा ॥ ५ ॥

३०३० नाहीं निर्मळ जीवन । काय करील साबण १ तैसी चित्तशुद्धि नाहीं । तेथें बोध करील काई २ वृक्ष न धरी पुष्पफळ । काय करील वसंत-काळ ३ वांजे न होतीं लेकुरें । काय कीजे त्या भ्रतारें ४ नपुसंका पुरुषासी । काय करील बाइल त्यासी ५ प्राण गेलिया शरीर । काय करील वेव्हार ६ तुका म्हणे जीवनेंविण । पीक नव्हे नव्हे जाण ॥ ७ ॥

३०३१ ब्राह्मण तो नव्हे ऐसी ज्याची बुद्धि । पाहा श्रुतीमधीं विचारूनि १ जयासी नावडे हरिनामकीर्तन । आणीक नर्तन वैष्णवांचें २ सत्य त्याचे वेळे घडला व्यभिचार । मातेसी वेव्हार अंत्यजाचा ३ तुका म्हणे येथें मानी आनासारिखें । तात्काळ तो मुखें कुष्ठ होय ॥ ४ ॥

३०३२ काय काशी करिती गंगा । भीतरिं चांगा नाहीं तो १ अधर्णी कुचर बाहेर तैसा । नये रसा पाकासी २ काय टिळे करिती माळा । भाव खळा नाहीं त्या ३ तुका म्हणे प्रेमेंविण । बोले भुंके अवघा शीण ॥ ४ ॥

३०३३ काय धोविलें कातडें । काळकूट भीतरिं कुडें १ उगा राहें लोक-भांडा । चाळविल्या पोरें रांडा २ घेशी बुंथी पानवथां । उगाच हालविसी माथां ३ लावुनीं बैसे टाळी । मन इंद्रियें मोकळीं ४ हालवीत बैसे माळा । विषयजप वेळोवेळां ५ तुका म्हणे हा व्यापार । नाम विठोबाचें सार ॥ ४ ॥

३०३४ काय सर्प खाती अन्न । काय ध्यान बगाचें १ अंतरींची बुध्दि खोटी । भरलें पोटीं वाईट २ काय उंदीर नाहीं धांवी । राख लावी गाढव ३ तुका म्हणे सुसर जळीं । काउळी कां न न्हाती ॥ ४ ॥

३०३५ जळो प्रेमा तैसा रंग । जाय भुलोनि पतंग १ सासुसाठीं रडे सून । भाव अंतरींचा भिन्न २ मैंद मुखींचा कोंवळा । भाव अंतरीं निराळा ३ जैसी वृंदावन कांती । उत्तम धरूं नये हातीं ४ बक ध्यान धरी । दावी सोंग मत्स्य मारी ५ तुका म्हणे सर्प डोले । तैसा कथेमाजीं खुले ॥ ६ ॥

३०३६ भजन घाली भोगावरी । अकर्तव्य मनीं धरीं १ धिग त्याचें

साधुपण । विटाळून वर्ते मन २ नाहीं वैराग्याचा लेश । अर्थ चाड जीवें आस ३ हें ना तैसें जालें । तुका म्हणे वायां गेलें ॥ ४ ॥

३०३७ वसोनी थिल्लरीं । बेडुक सागरा धिक्कारी १ नाहीं देखिला ना ठावा । तोंडपिटी करी हांवा २ फुगतें काउळें । म्हणे मी राजहंसा आगळें ३ मी गजाहूनि खर । म्हणे चांगला मी फार ४ मुलाम्याचें नाणें । तुका ह्मणे नव्हे सोनें ॥ ५ ॥

३०३८ मोलें घातलें रडाया । नाहीं असूं आणि माया १ तैसा भक्तिवाद काय । रंग बेगडीचा न्याय २ वेठीं धरिल्या दावी भाव । मागें पळायाचा पाव ३ काजव्याच्या ज्योती । तुका म्हणे न लगे वाती ॥ ४ ॥

३०३९ जपाचें निमित्त झोपेचा पसरू । देहाचा विसरू पाहूनियां १ ऐसीं तीं भजनें अमंगळवाणी। सोंगसंपादणी बहुरूप्याची २ सेवेसी विकिलें लोभाचिये आसे । तया कोठें असे उरला देव ३ तुका म्हणे मानदंभ जया चित्तीं । तयाची फजीती करूं आह्मी ॥ ४ ॥

३०४० वांझेनें दाविलें गरव्हार लक्षण । चिरगुटें घालून वाथयाला १ तेवीं शब्दज्ञानी करिती चावटी । ज्ञान पोटासाठीं विकुनियां २ बोलाचीच कढी बोलाचाचि भात । जेवूनियां तृप्त कोण झाला ३ कागदीं लिहितां नामाची साकर । चाटितां मधुर गोडी नेदी ४ तुका म्हणे जळो जळो ते महंती । नाहीं लाज चित्तीं आठवण ॥ ५ ॥

३०४१ चिरगुटें घालुनी वाढविलें पोट । गरव्हार बोभाट जनामध्यें १ लटिकेचि डोहळे दाखवी प्रकार । दूध स्तनीं पोर पोटीं नाहीं २ तुका म्हणे अंतीं वांजचि ते खरी । फजिती दुसरी जनांमध्यें ॥ ३ ॥

३०४२ गुळें माखोनियां दगड ठेविला । वर दिसे भला लोकाचारीं १ अंतरीं विषयाचें लागलें पैं पिसें । बाहिरल्या वेषें भुलवी लोकां २ ऐशिया दांभिका कैंची हरिसेवा । नेणेंचि सद्भावा कोणे काळीं ३ तुका म्हणे येणें कैसा होय संत । विटाळलें चित्त कामक्रोधें ॥ ४ ॥

३०४३ पक्काचिये सोई कवित्वाचे बांधे । बांधलिया साधे काय तेथें १ काय हातीं लागे भुसाचे कांडणीं । सत्याची दाटणी करूनी ठेवी २ कवित्वाचे रूढी पायां पाडी जग । सुखावोनि मग नरका जाय ३ तुका म्हणे देव केल्याविण साहे । फजिती ते आहे लटिक्या अंगीं ॥ ४ ॥

३०४४ लटिकी ग्वाही सभे आंत । नेतां पतित आगळा १ कुंभपाकीं वस्ती करूं । होय धुरू कुळेंसीं २ रजस्वला रुधिर स्रवे । तेंची ध्यावें तृषेसी ३ तुका म्हणे जन्मा आला । काळ झाला कुळासी ॥ ४ ॥

३०४५ आमचे गोसावी अयाचितवृत्ति । करवी शिष्याहातीं उपदेश १

दगडाची नाव आधींच ते जड। ते काय दगड तारूं जाणें २ तुका म्हणे वेष विटंबिला त्यांनीं। सोंगसंपादणी करिती वरीं ॥ ३ ॥

३०४६ नायकावे कानीं तयाचे ते बोल। भक्तीविण फोल ज्ञान सांगे १ वाखाणी अद्वैत भक्तिभावेंविण। दुःख पावे सीण श्रोता वक्ता २ अहंब्रह्म म्हणोनि पाळीतसे पिंडा। नये बोलों भांडा तयासवें ३ वेदबाह्य लंड बोले जो पाखांड। त्याचें काळें तोंड संतांमध्यें ४ तुका म्हणे खंडी देवभक्तपणा। वरिष्ठ त्याहूनि श्वपच तो ॥ ५ ॥

३०४७ उपदेश भलत्या हातीं। जाला चित्तीं धरावा १ नये जाऊं पात्रावरीं। कवटीं सार नारळें २ स्त्री पुत्र बंदीजन। नारायण स्मरविती ३ तुका म्हणे रत्नसार। परि उपकार चिंधीचे ॥ ४ ॥

३०४८ आवडे सकळां मिष्टान्न। रोग्या विष तें समान १ दर्पण नावडे तया एका। ठाव नाहीं ज्याच्या नाका २ तुका म्हणे तैशा खळा। उपदेशाचा कंटाळा ॥ ३ ॥

३०४९ परद्रव्य परनारी। अभिलासूनि नाक धरी १ जळों तयाचा आचार। व्यर्थ भार वाहे खर २ सोंवळ्याची स्फीती। क्रोधें विटाळला चित्तीं ३ तुका म्हणे सोंग। दावी बाहेरील रंग ॥ ४ ॥

३०५० अभिमानाचें तोंड काळें। दावी बळें अंधार १ लाभ न्यावा हातोहातीं। तोंडी माती पडोनी २ लागलीसे पाठीं लाज। झालें काज नासाया ३ तुका म्हणे कुश्चळ मनीं। विटंबनीं पडलीं तीं ॥ ४ ॥

३०५१ जन देव तरी पायांची पडावें। त्यांचिये स्वभावें चाड नाहीं १ अग्नीचें सौजन्य शीत निवारण। पालवीं बांधोनि नेतां नये २ तुका म्हणे विंचू सर्प नारायण। वंदावे दुरोनि शिवों नये ॥ ३ ॥

३०५२ गंगेचिया अंताविण काय चाड। आपुलें तें कोड तृषेपाशीं १ विठ्ठल हे मूर्ति साजिरी सुंदर। घालीं निरंतर हृदयपुटीं २ कारण तें असे नवनीतापाशीं। गवाळ तें सोसी इतर कोण ३ बाळाचें सोई तें घांस घाली माता। अट्टाहास चिंता नाहीं तया ४ गाऊं नाचों करूं आनंद सोहळा। भावाचि वेगळा नाहीं आतां ५ तुका म्हणे अवघें जालें एकमय। परलोकाची काय चाड आतां ॥ ६ ॥

३०५३ चहूं आश्रमांचे धर्म। न राखतां जोडे कर्म १ तैसी नव्हे भोळी सेवा। एक भावाचि कारण देवा २ तपें इंद्रियां आघात। क्षणें एका वाताहात ३ मंत्र चळे थोडा। तरी धडचि होय वेडा ४ व्रतें करितां सांग। तरि एक चुकता भंग ५ धर्म सत्वचि कारण। नाहीं तरी केला सीण ६ भूतदयेसी आघात। उंचनीच वाताहात ७ तुका म्हणे दुजें। विधिनिषेधाचें ओझें ८

३०५४ निगमाचें वन । नका शोधूं करूं शीण १ या रे गौळियांचे घरीं। बांधलेसें दावेंवरीं २ पीडलेती भ्रमें । वाट न कळतां वर्में ३ तुका म्हणे भार । माथां टाका अहंकार ॥ ४ ॥

३०५५ ऐका ऐका भाविक जन । कोण कोण व्हाल ते १ तार्किकांचा टाका संग । पांडुरंग स्मरा हो २ नका शोधूं मतांतरें । तुमगें खरें बुडाल ३ कलीमध्यें दास तुका । जातो लोकां सांगत ॥ ४ ॥

३०५६ आम्हां घरीं एक गाय दुभताहे। पान्हा न समाये त्रिभुवनीं १ वान ते सांवळी नांव तें श्रीधरा । चरे वसुंधरा चौदा भुवनें २ वत्स नाहीं माय भलत्यासवें जाय । कुर्वाळी तो लाहे भावभरण ३ चहूं धारीं क्षीर वोळली अमूप। धाले सनकादिक सिद्ध मुनी ४ तुका म्हणे माझी भूक तेथें काय । जोगाविते माय तिन्ही लोकां ॥ ५ ॥

३०५७ त्रैलोक्य पाळितां उबगला नाहीं। आमचें त्या काई असें ओझें १ पाषाणाचें पोटीं बैसला दर्दुर । तया मुखीं चारा कोण घाली २ पक्षी अजगर न करी संचित । तयासी अनंत प्रतिपाळी ३ तुका म्हणे तया भार घातलिया । उपेक्षीना दयासिंधु माझा ॥ ४ ॥

३०५८ संसारा आलिया एक सुख आहे । आठवावें पाय विठोबाचे १ येणें होय सर्व संसार सुखाचा। नलगे दुःखाचा लेश कांहीं २ घेतील तयांसी सोपें आहे सुख। बोलियेलें मुखें नारायणें ३ सांगितलीं सोय करुणासागरें । तुम्हां कां हो बरें न वाटतें ४ तुका म्हणे तेणें उपकार केला। भोळ्या भाविकाला तारावया ॥ ५ ॥

३०५९ येउनि नरदेहा विचारावें सार। धरावा पैं धीर भजनमार्गीं १ चंचल चित्तासि ठेवूनियां ठायीं। संतांचिये पायीं लीन व्हावें २ भावाचा पैं भाव धरावा निश्चयें। तेणें भवभय देशधडी ३ नामापरतें जगीं साधन सोपें नाहीं। आवडीनें गाईं सर्वकाळ ४ तुका म्हणे धन्य वंश त्या नराचा। ऐसा निश्चयाचा मेरू झाला ॥ ५ ॥

३०६० पोटापुरतें काम। परि अगत्य तो राम १ कारण तें हेंचि करीं। चित्तीं पांडुरंग धरी २ प्रारब्धीं हेवा। जोडी देवाची ते सेवा ३ तुका म्हणे बळ। बुद्धि वेचूनि सकळ ॥ ४ ॥

३०६१ क्षणाक्षणां हाचि करावा विचार। तरावया पार भवसिंधु १ नाशिवंत देह जाणार सकळ। आयुष्य खातो काळ सावधान २ संतसमागमीं धरूनि आवडी। करावी तांतडीं परमार्थीं ३ तुका म्हणे इहलोकींच्या वेव्हारें। नये डोळे धुरें भरूनि राहों ॥ ४ ॥

३०६२ नये जरीं तुज मधुर उत्तर। दिधला सुस्वर नाहीं देवें १ नाहीं

तयाविण भुकेला विठ्ठल । येईल तैसा बोल रामकृष्ण २ देवापाशीं मागे आवडीची भक्ति । विश्वासेंसीं प्रीति भावबळें ३ तुका म्हणे मना सांगतों विचार । धरावा निर्धार दिसोदिस ॥ ४ ॥

३०६३ सांडूनिया सर्व लौकिकाची लाज । आळवा यदुराज भक्तिभावें १ पाहुनियां झाडें वरबडुनि पाला । खाउनि विठ्ठला आळवावें २ वेंचूनियां चिंध्या भरूनियां धागा । गुंडाळूनि हुंगा आळवावें ३ तुका म्हणे ऐसें मांडिल्या निर्वाण । तया नारायणा उपेक्षीना ॥ ४ ॥

३०६४ भावें गावें गीत । शुद्ध करूनियां चित्त १ जरि व्हावा तुज देव । तरि हा सुलभ उपाव २ आणिकांचें कानीं । गुण दोष मना नाणी ३ करी मस्तक ठेंगणा । लागे संतांच्या चरणा ४ वेंची तें वचन । जेणें राहे समाधान ५ तुका म्हणे फार । थोडा तरी परउपकार ॥ ६ ॥

३०६५ कृष्ण गातां गीतीं कृष्ण ध्याता चित्तीं । तेही कृष्ण होती कृष्णध्यानें १ आसनीं शयनीं भोजनीं जेवितां । म्हणा रे हा भोक्ता नारायण २ ओंवियें दळणीं गावा नारायण । कांडितां कांडण करितां काम ३ नर नारी याति हो कोणी भलती । भावें एका प्रीती नारायणा ४ तुका म्हणे एका भावें भजा हरी । कांति ते दुसरी रूप एक ॥ ५ ॥

३०६६ आलिया भोगासी असावें सादर । देवावरी भार घालूनियां १ मग तो कृपासिंधु निवारी सांकडें । येर तें बापुडें काय रंक २ भवाचिये पोटीं दुःखाचिया रासी । शरण देवासी जातां भलें ४ तुका म्हणे नव्हे काय त्या करितां । चिंतावा तो आतां विश्वंभर ॥ ४ ॥

३०६७ तरीच जन्मा यावें । दास विठ्ठलाचे व्हावें १ नाहीं तरि काय थोडीं । श्वानसूकरें बापुडीं २ ज्याल्याचें तें फळ । अंगीं लागों नेदी मळ ३ तुका म्हणे भले । ज्याच्या नांवें मानवलें ॥ ४ ॥

३०६८ निर्वैर व्हावें सर्व भूतांसवें । साधन बरवें हेंचि एक १ तरीच करील अंगीकार नारायण । बडबड तो सीण येणेंविण २ सोयरे पिशुन समानचि घडे । चित्त पर ओढे उपकारीं ३ तुका म्हणे चित्त जालिया निर्मळ । तरीच सकळ केलें होय ॥ ४ ॥

३०६९ जिंकावा संसार । येणें नांवें तरी शूर १ येरें काय तीं बापुडीं । कीर अहंकाराचीं घोडीं २ पण ऐशा नांवें । धरिजे तो भावें ३ तुका म्हणे ज्यांवें । सत्कीर्तीनें बरवें ॥ ४ ॥

३०७० मन करा रे प्रसन्न । सर्व सिद्धीचें कारण । मोक्ष अथवा बंधन । सुख समाधान इच्छा तें १ मनें प्रतिमा स्थापिली । मनें मना पूजा केली । मनें इच्छा पुरविली । मन माउली सकळांची २ मन गुरु आणि शिष्य ।

करी आपुलेंचि दास्य । प्रसन्न आपआपणास । गति अथवा अधोगति ३ साधक वाचक पंडित । श्रोते वक्ते ऐका मात । नाहीं नाहीं आन दैवत । तुका म्हणे दुसरें ॥ ४ ॥

३०७१ प्रेम नये सांगतां बोलतां दावितां । अनुभव चित्ता चित्त जाणें १ कासवीचें बाळ वाढे कृपादृष्टीं । दुधा नाहीं भेटी अंगसंगें २ पोटामध्यें कोणें सांगितलें सर्पा । उपजत लपा म्हणवूनि ३ बोलों नेणें परी जाणें गोड क्षार । अंतरीं विचार त्यासी ठावा ४ तुका म्हणे बरें विचारावें मनीं । आणीक भल्यांनीं पुसों नये ॥ ५ ॥

३०७२ लटिका तो प्रपंच एक हरि साच । हरिविण आहाच सर्व इंद्रियें १ लटिकें तें मौन भ्रमाचें तें स्वप्न । हरिविण ध्यान नश्वर अवघें २ लटिकिया वित्पत्ति हरिविण करिती । हरि नाहीं चित्तीं तो शव जाणा ३ तुका म्हणे हरि हें धरिसी निर्धारीं । तरीं तूं झडकरीं जासी वैकुंठा ॥ ४ ॥

३०७३ कामिनीसी जैसा आवडे भ्रतार । इच्छीत चकोर चंद्र जैसा १ तैसी हे आवडी विठ्ठलाचे पायीं । लागलिया नाहीं गर्भवास २ दुष्काळें पीडिल्या आवडे भोजन । आणिक जीवन तृषाक्रांता ३ कामातुर जैसा भय लज्जा सांडोनी । आवडे कामिनी सर्व भावें ४ तुका म्हणे तैसी राहिली आवडी । पांडुरंग थडी पाववील ॥ ५ ॥

३०७४ काळ सारावा चिंतनें । एकांतवासीं गंगास्नानें । देवाचें पूजन । प्रदक्षणा तुळसीच्या १ युक्त आहार विहार । नेम इंद्रियांचा सार । नसावी बासर । निद्रा बहु भाषण २ परमार्थ महाधन । जोडी देवाचे चरण । व्हावया जतन । हे उपाय लाभाचे ३ देह समर्पिजे देवा । भार कांहींच न घ्यावा । होईल आघवा । तुका म्हणे आनंद ॥ ४ ॥

३०७५ घ्यारे लुटी प्रेमसुख । फेडा आजि धणी । चुकला तो मुकला । जाली वेरझार हाणी १ घाला घातला वैकुंठीं । करूनियां जीवें साटी । पुरविली पाठीं । वैष्णवीं काळाची २ अवघें आणिलें अंबर । विठोसहित तेथें धुर । भेटूनि जिव्हार । नाम गणीं धरियेला ३ संचित प्रारब्ध क्रियमाण । अवघीं जालीं गहन । केलीं पापपुण्यें । देशधडीं बापुडीं ४ आनंदें गर्जती निर्भर । घोष करिती निरंतर । कांपती असुर । वीर कवणा नागवती ५ जें दुर्लभ ब्रह्मादिकां । आजि सांपडलें फुका । घ्यारे म्हणे तुका । सावचित्त होऊन

३०७६ देव सखा जरी । जग अवघें कृपा करी १ ऐसा असोनि अनुभव । कासाविस होती जीव २ देवाची जतन । त्यासी बाधूं न शके अग्न ३ तुका म्हणे हरि । प्रल्हादासी जतन करी ॥ ४ ॥

३०७७ जीव जीती जीवनासंगें । मत्स्या मरण त्या वियोगें १ जया चित्तीं जैसा भाव । तयां जवळीं तैसा देव २ सकळां पढीये भानु । परि त्या कमळाचें जीवनु ३ तुका म्हणे माता । वाहे तान्हयाची चिंता ॥ ४ ॥

३०७८ कस्तूरीचें अंगीं मिनली मृत्तिका । मग वेगळी कां येईल लेखूं १ तयापरी भेद नाहीं देवभक्तीं । संदेहाच्या युक्ती सरों द्याव्या २ इंधनें ते आगी संयोगाच्या गुणें । सागरा दरुषणें वाहाळ तोंचि ३ तुका म्हणे माझें साक्षीचें वचन । येथें तों कारण शुद्ध भाव ॥ ४ ॥

३०७९ धाकुट्याचें मुखीं घांस घाली माता । वरी करीं सत्ता शाहाणियां १ ऐसें जाणपणें पडिलें अंतर । वाटे तों तों थोर अंतराय २ दोन्ही उभयतां आपणचि व्याली । आवडीची चाली भिन्न भिन्न ३ तुका म्हणे अंगापासूनि निराळें । निवडिलें बळें रडतें स्तनीं ॥ ४ ॥

३०८० लागलिया मुख स्तना । घाली पान्हा माउली १ उभयतां आवडीं लाड । कोडें कोड पुरतसे २ मेळवितां अंगें अंग । प्रेमें रंग वाढतो ३ तुका म्हणे जड भारी । अवघें शिरीं जननीचें ॥ ५ ॥

३०८१ पाठीं पोटीं देव । कैंचा हरिदासां भेव १ करा आनंदें कीर्तन । नको आशंकित मन २ पथें कोठें काळ । करील देवापाशीं बळ ३ तुका म्हणे धनी । सपुरता काय वाणी ॥ ४ ॥

३०८२ भाव देवाचें उचित । भाव तोचि भगवंत १ धन्य धन्य शुद्ध जाती । संदेह कैंचा तेथें चित्तीं २ बहुत बराडी । देवावरीं ते आवडी ३ तुका म्हणे हें रोकडें । लाभा अधिकारी चोखडें ॥ ४ ॥

३०८३ ज्यानें ज्यानें जैसें ध्यावें । तैसें व्हावें कृपाळें १ सगुण निर्गुणांचा ठाव । विटे पाय धरियेले २ अवघें साखरेचें अंग । नये व्यंग निवडितां ३ तुका म्हणे जें जें करी । तें तें हरि भोगिता ॥ ४ ॥

३०८४ केला मातीचा पशुपति । परि मातीस काय महती । शिवपूजा शिवासी पावे । माती मातीमाजीं सामावे १ तैसे पूजिती आम्हां संत । पूजा घेतो भगवंत । आम्ही किंकर संतांचे दास । संतपदवी नको आम्हास २ केला पाषाणाचा विष्णु । परी पाषाण नव्हे विष्णु । विष्णुपूजा विष्णूसि अर्पे । पाषाण राहे पाषाणरूपें ३ केली काशाची जगदंबा । परि कांसे नव्हे अंबा । पूजा अंबेची अंबेला घेणें । कांसे राहे कांसेपणें ४ ब्रह्मानंद पूर्णामाजीं । तुका ह्मणे केली कांजी । ज्याची पूजा तेणेंचि घेणें । आम्हीं पाषाणरूप राहाणें ॥ ५ ॥

३०८५ मृगाचिये अंगीं कस्तुरीचा वास । असे ज्याचा त्यास नसे ठावा १ भाग्यवंत घेती वेंचूनियां मोलें । भारवाही मेले वाहतां ओझें २ चंद्रामृतें

मृतें तृप्ती पारणें चकोरा। भ्रमरासी चारा सुगंधाचा ३ अधिकारी येथें घेती हातवटी। परीक्षावंता दृष्टी रत्न जैसें ४ तुका म्हणे काय आंधळीचा हातीं। दिलें जैसें मोतीं वायां जाय॥ ३॥

३०८६ मारगीं चालतां पाउलां पाऊली। चिंतावी माउली पांडुरंग १ सुख लागे घेऊनियां पाठीं। आवडीचा कंठीं रस ओती २ पीतांबरें छाया करि लोभापर। पाहे तें उत्तर आवडीचें ३ तुका म्हणे हेंचि करावें जीवन। वाचे नारायण तान भूक॥ ४॥

३०८७ मेघवृष्टीनें करावा उपदेश। परि गुरूनें न करावा शिष्य। वांटा लाभे त्यास। केल्या अर्धकर्मांचा १ द्रव्य वेंचावें अन्नछत्रीं। भूतीं द्यावें सर्वत्र। न घ्यावा हा पुत्र। उत्तम याती पोसणा २ बीज न पेरावें खडकीं। ओल नाहीं ज्याचे बुडखीं। थीतां ठकें सेखीं। पाठीं लागे दिवाण ३ गुज बोलावें संतांसी। पत्नी राखावी जैसी दासी। लाड देतां तियेसी। वांटा पावे कर्मांचा ४ शुद्ध करूनि पाहावें। वरीं रंगा न भुलावें। तुका म्हणे घ्यावें। जया नये तुटी तें॥ ५॥

३०८८ भाग्यवंत म्हणो तया। शरण गेले पंढरिराया १ तरलें तरती हा भरंवसा। नामधारकांचा ठसा २ भुक्तिमुक्तीचें तें स्थळ। भोळेंभाविकां निर्मळ ३ गाइलें पुराणीं। तुका म्हणे वेदवाणी॥ ४॥

३०८९ विठ्ठल गीतीं गावा विठ्ठल चित्तीं ध्यावा। विठ्ठल उभा पहावा विटेवरीं १ अनाथांचा बंधु विठ्ठल कृपासिंधु। तोडी भवबंधु यमपाश २ तोचि शरणागतां विठ्ठल मुक्तिदाता। विठ्ठल या संतसमागमें ३ विठ्ठल गुणनिधि विठ्ठल सर्व सिद्धी। लागली समाधि विठ्ठल नामें ४ विठ्ठलाचें नाम घेतां जालें सुख। गोडावलें मुख तुका म्हणे॥ ५॥

## श्रीनिळोबामहाराज

३०९० नाहीं विठोबाचें प्रेम। गाणीव श्रम वृथाचि तो १ काय करिती आपुल्या दैवा। भुली वैभवा जाणिवेच्या २ भरावें पोट हेंचि जाणती। नरदेहा धाडिती व्यर्थ वायां ३ निळा म्हणे गिळिलें कर्में। पुढें मरणजन्में अनिवारें

३०९१ येऊनियां नरदेहा। कांहीं स्वहित तें पहा १ नाहीं तरी व्यर्थ जन्म। चिंतितसे विषयकाम २ पशु विषय सेविती। तयापरी तुझी स्थिति ३ निळा म्हणे व्यर्थ गेला। प्राणि भूमिभार झाला॥ ४॥

३०९२ येथें येउनि केलें कायी। विठ्ठल नाहीं आठविला १ आहा रे मूढा भाग्यहीना। गेलासी पतना मोहभ्रमें २ नाहीं केली सुटिका कांहीं। येचि

प्रवाहीं पडिलासी ३ निळा म्हणे लाहोनि हातीं । केली माती आयुष्या ॥४॥

३०९३ सांगितलें वर्म एवढेंचि करी । नित्यता उच्चारी हरिचें नाम १ न लगे कोठें जाणें येणें । कर्मबंधनें तुटतील २ योग साधन पवनाभ्यास । न करी सायास अडचणीं ३ निळा म्हणे हरीच्या नामें । चुकती जन्में या प्रहरा ॥ ४ ॥

३०९४ सकळ साधनां वरिष्ठ सार । विठ्ठल नामाचा उच्चार । आणखी नका वारवार । शीणचि उरेल पुढतीं १ धांवा म्हणोनि अवघे वेगीं । चित्तचि ठेवा पांडुरंगीं । संसाराचि तुटेल मागी । फिटेल धर्गी त्रिविध तापा २ आवडी नाचतां पैं गातां । पांडुरंग प्रेमदाता । अवघी तोडूनियां चिंता । करील माथां वैसणें ३ ऐसें जाणोनियां निरुती । करा हरिनामें आवृत्ति । मग हा कळिकाळाचे हातीं । नेदिल तुम्हां सर्वथा ४ निळा म्हणे सुगम ऐसें । संतीं दाविलें सोरसें । जतन करिती जे मानसें । ते तों पावती सर्वथा ॥५॥

३०९५ सांगितलें संतजनीं । उगवुनी कानीं बीजाक्षरें १ विठ्ठल जपतां विठ्ठल होसी । न धरी मानसीं संशय २ करी कीर्तन वाजवी टाळी । राहेल वनमाळी हृदयांत ३ निळा म्हणे पडे आटी । साधन संकष्टीं आणिकां ॥ ४ ॥

३०९६ कोण तया लेखी । नाहीं विठ्ठलीं ओळखी १ करिती तितकें पोटासाठीं । गाणें नाचणें आटाआटी २ कळा दाविती व्युत्पत्ति । चातुर्य जाणिवेची संपत्ती ३ निळा म्हणे संतांपुढें । येतां लाजती माकडें ॥ ४ ॥

३०९७ लोहा लागतां सुवर्ण । करावें हा स्वभाव गुण १ कैंवि सांडवेल परिसा । जगद्गुरु हा विठ्ठल तैसा २ रत्ना आंगीं रत्नकीळ । नव्हती भिन्न अग्निज्वाळ ३ निळा म्हणे सांडूनि जळा । सागर न निवडे वेगळा ४

३०९८ संत आज्ञा सादवित । जातो सकळांचेंहि हित १ नाईकोनी सोडाल । फळ कनिष्ठ तरी पावाल २ आम्ही उत्तीर्ण आपुलिया । उचिता ठेलों सांगोनियां ३ निळा म्हणे यावरी आतां । बोल न ठेवावा मागुता ॥४॥

३०९९ याचे पायीं धरिल्या भाव । भेटेल देव निश्चयें १ नव्हे अन्यथा भाषण । ठावी खूण संतांसी हे २ निज करें कुरवाळून । देईल आलिंगन अत्यादरें ३ निळा म्हणे येईल दारा । दडे सामोरा भक्तांसी ॥ ४ ॥

३१०० विश्वासी ते ऐकतां कानीं । धरिती मनीं आदरें १ पूर्वार्जितें उत्तमें होतीं । आलीं सत्संगतीं भेटतो २ सुख सुखा वाढतें झालें । केलिया विठ्ठलें कृपा मग ३ निळा म्हणे निजात्मसुखा । पावलें एका क्षणमात्रें ॥ ४ ॥

३१०१ सुखें करावें भोजन । गर्जावे गुण श्रीहरीचे १ ल्यावें लेणें अळंकार । असावें सादर हरिकथे २ यथाविधी भोगितां भोग । हृदयीं पांडुरंग आठवावा ३ निळा म्हणे न लिंपे कर्मा । हरिनामा धर्मा अवलंबितां ॥ ४ ॥

३१०२ पांडुरंगा न पाहती । ज्ञान गाडेवर बोलती १ त्यांचें न व्हावें दर्शन । देवा दूषिती म्हणऊन २ नायकावे त्यांचे बोल । विठ्ठल कृपेविण फोल ३ निळा म्हणे करिती कथा । अवघी पोकळ त्यांची वृथा ॥ ४ ॥

३१०३ नेणोनियां आत्महित । करिती घात अभिमानी १ नसतीच वाढवूनियां उपाधी । पडती मधीं संदेहा २ नाठवूनियां विठ्ठल देवा । करिती सेवा भूतांची ३ निळा म्हणे जन्मोनि गेला । वृथाचि पडिला निरयांत ॥४॥

३१०४ प्रत्यक्ष जनीं जनार्दन । नेणोनियां कथी ज्ञान १ काय तैसीं तें वाचाळें । करितीं चावटीं तोंडबळें २ नाहीं अंगीं हरिची भक्ति । दाविती कोरडीच विरक्ति ३ निळा म्हणे नेणतां वर्म । केलें पाठीं लागे कर्म ॥ ४ ॥

३१०५ जें जें बोले तें विकळ । नाहीं विठ्ठलीं कळवळ १ कोरडेंचि शब्दज्ञान । नाहीं प्रेमाचें जीवन २ जाणें तर्क वितर्क मति । समर्पक समयीं स्फूर्ती ३ निळा म्हणे पडिली हातीं । जाणिवेच्या नुगवे गुंती ॥ ४ ॥

३१०६ ज्याचा विश्वास जडला पायीं । हरिवीण कांहीं नेणती १ त्याचा करी अंगिकार । निरसी अंधार ममतेचा २ सत्यासत्य दाखवी तया । लावी आपुलिया निज सोई ३ निळा म्हणे ऐसें वर्म । सांपडे सुगम एकनिष्ठा ॥ ४॥

३१०७ तेचि भक्त भागवत । संत सेवें जे निरत १ शुद्ध त्यांचा भक्ति भावो । संत वरदें लाभो देवो २ संत वचनीं विश्वासतीं । सत्य परमार्थ त्यांचे हातीं ३ निळा म्हणे संत सेवा । घडे त्या उदयो झाला दैवा ॥ ४ ॥

३१०८ म्हणोनि याचिया श्रवणें पाठ । वचनें पालटे देहबुद्धी १ वैराग्याचीं राणीव जडे । ज्ञानाचें उघडे निजमंदीर २ नवविधाचे नाना भोग । वसविती अंग येऊनियां ३ निळा म्हणे भक्ति मुक्ति । शांति विरक्ति वरती त्या ॥ ४ ॥

३१०९ समाधान तें दर्शनें । होय सद्गुरुकृपेनें १ गुरुकृपा होण्यासाठीं । गुरुभक्ति हे गोमटी २ साधन चतुष्टय । गुरुभेटीचा उपाय ३ निळा म्हणे कर्मे जाण । चित्तशुद्धि ते निर्माण ॥ ४ ॥

३०१० तोचि ब्रह्मविद् जाण । परब्रह्मीं वृत्ति लीन १ द्वैताद्वैत मावळलें । पूर्णब्रह्म अनुभविलें २ जन वन तें समान । मन झालें पैं उन्मन ३ निळा म्हणे त्याच्या नांवें । दोष नासती स्वभावें ॥ ४ ॥

३०११ जाणिवेचें ज्ञान । तर्कवादाचें जल्पन १ काय करूं तो गोमटा । भरला अहंकाराचा फाटा २ बोले तें तें तायें तायें । नेणें परमार्थाचि सोये ३ निळा म्हणे तैसीची गती । पावे आपुलिया मती ॥ ४ ॥

३०१२ उत्तम अधम जया जे संगती । तैसी त्याचि मति फांकों लागे १ सज्जना संगतीं धर्म क्रिया वाढे । पापिया आवडे पापबुद्धि २ म्हणोनि जैसिया

तैसा झाला हरी। भक्ता मित्र वैरि निंदकाला ३ निळा म्हणे जाणे अंत रींचा भाव। तया तैसा देव फळदाता ॥ ४ ॥

३११३ नयेचि साच हा प्रतीतीं। असोनियां भूतीं भगवंत १ कर्माकर्मे लागलीं पाठीं। बैसलें दृष्टीं मळ त्यांचे २ सत्यचि परि तें असत्य वाटे। भोगिती अदृष्टें आपुलालीं ३ निळा म्हणे कर्मतंत्रीं। गुंतलीं यंत्रीं मायेच्या ४

३११४ अवघियाचि ज्ञानें अवघेंचि जाणें। परि एक नेणें आत्मज्ञान १ बोल तितुके बोलेचि वरीं। परि न चढे पायरी प्राप्तीची २ आपुलेंचि हित आपण नेणें। वरी आणिकां शाहाणें करूं धांवे ३ निळा म्हणे ठकुनी लोकां। आपणहि नर्का जात सवें ॥ ४ ॥

३११५ आशाबद्धाचिया मुखें। निघे अक्षर तें तें फिकें १ श्रवणीं बैसोनियां श्रोता। विटे ऐकुनी त्याची कथा २ न करूनियां नमस्कार। अव्हेरिती नारीनर ३ निळा म्हणे जळों जिणें। सदा त्याचें लाजिरवाणें ॥ ४ ॥

३११६ पाप तया नांव परदारागमन। पाप तें परधन अपहार १ पाप तेंचि निंदा परपीडा द्वेष। पाप तोंचि उपहास पुढिलाचें २ पाप तेंचि जीवीं विषयाची आसक्ति। पाप अभक्ति कुळाचारीं ३ निळा म्हणे पाप मुख्य तेंचि साचें। नावडे देवाचें नाम मुखीं ॥ ४ ॥

३११७ होईल अंगीं बळ। तरी फजित करावे ते खळ १ जे कां करूनियां पाखांड। लटिकेंचि वाढविती बंड २ भोंदिती भाविकां। कथुनी परमार्थ तो लटिका ३ निळा म्हणे तोंडें सांगें। तैसें नाचरोनिया अंगें ॥ ४ ॥

३११८ लुगड्या नांव चंद्रकळा। परी तो काळा रंग वरीं १ नांवा ऐसें कर्तृत्व नाहीं। तरी ते कायी नपूंसक २ घोळण्या नांव लक्ष्मण। करितें भजन लाह्यांचें ३ निळा म्हणे घुसळिती रवी। परी ते न दावी प्रकाश ॥४॥

## श्रीनामदेवमहाराज

३११९ पावावया ब्रह्म पूर्ण। सांडुनि देईं दोष गुण १ सर्वांभूतीं समदृष्टी। हेचि भक्ति गोड मोठी २ यावेगळें थोर नाहीं। बरवें शोधूनियां पाहीं ३ येणें संसार सुखाचा। म्हणे नामा शिंपियाचा ॥ ४ ॥

३१२० या विठोबापरतें आन दैवत म्हणती। ते शब्द नायकवती कानीं माझ्या १ पाखांडी म्हणती उगेंची असावें। हा ब्रह्मकटाह करूं शके न अनारिसा २ तोहि जरी म्हणेल अहं ब्रह्मास। तरी न पहावी वास येही नयनीं ३ कोटि कोटि ब्रह्मांडें एकएक्या रोमीं। व्यापोनिया व्योमीं वर्ततसे ४ ऐसा माझा विठो सर्वां घटीं सम। न संडावें वर्म नामा म्हणे ॥ ५ ॥

३१२१ विठ्ठलाचे पाय धरोनियां राहे । मग संसार तो काय करील तुझें १ संसाराचें भय नाहीं हरिच्या दासा । विठो आम्हां सरिसा निरंतर २. निरंतर वसे हरिभक्तांपाशीं । विसंबेना त्यासी कदांकाळीं ३ नामा म्हणे ऐसा विठ्ठल सोडोनी । व्यर्थ काय जनीं शिणताती ॥ ४ ॥

३१२२ हरिसि शरण रिघा वहिलें । राहे कळीकाळ उगले १ खंडलें एका बोलें । विठ्ठल समर्थं अंगिकारलें २ नामयानें संसारा जिंकिलें । केशव चरणीं मन ठेविलें ॥ ३ ॥

३१२३ एकवेळ नयनीं पहावा । मग जाईजे भलत्या गांवा १ आठवाल वेळोवेळां । विठोबा आहे रे जवळां २ हृदयीं मांडुनियां ठसा । नामा म्हणे केशव असा ॥ ३ ॥

३१२४ जागा रे गोपाळानो रामनामीं जागा । कळीकाळा आकळा महादोष जाती भंगा १ सहस्त्रदळ समान अनुहातध्वनी उठी । नामाचेनि बळें पातकें रिघालीं कपाटीं २ दशमी एक व्रत करा दिंडी दर्शन । एकादशी उपवास तुम्ही जागा जागरण ३ द्वादशी साधन कोटि कुळें उद्धरती । नामा म्हणे केशव ठाव देईल वैकुंठीं ॥ ४ ॥

३१२५ उठा उठा साधुसंत । साधा आपुलें हित । गेला गेला हा नरदेह । मग कैंचा भगवंत ॥ धृ० ॥ उठुनी वेगेशीं । चला जाऊं राउळाशी । जळती पातकांच्या राशी । काकड आरती देखिलिया १ उठोनियां पहांटे । विठ्ठल पहा उभा विटें । चरण तयाचे गोमटे । अमृत दृष्टीं अवलोका २ जागें करा रुक्मिणीवरा । देव आहे निदसुरा । वेगें लिंबलोण करा । दृष्ट होईल तयासी ३ पुढें वाजंत्रें वाजतीं । ढोल दमामे गर्जती । होते काकड आरती । पांडुरंगरायाची ४ सिंहनाद शंख भेरी । गजर होतो महाद्वारीं । केशवराज विटेवरीं । नामा चरण वंदितो ॥ ५ ॥

३१२६ उपदेश सुगम आइकरे एक । नाम हें सम्यक विठ्ठलाचें १ जनीं जनार्दन भावची संपन्न । विठ्ठल उद्धरण कलीमाजीं २ साधेल निधान पुरेल मनोरथ । नामेंचि कृतार्थ होसी जना ३ नामा म्हणे नाम घेई तूं झडकरीं । पावसी निर्धारीं वैकुंठपद ॥ ४ ॥

३१२७ पवित्र आणि परिकर । उभविलें मंदिर । दीपेंविण मनोहर । शोभा न पवे १ श्याम अंगीं तरुणी । सुंदर होय रमणी । पुरुषाविण कामिनी । शोभा न पवे २ द्रव्याविण नर । जरि जाहला सुंदर । तो त्याविण चतुर । शोभा न पवे ३ योगिया आणि कठीण । इंद्रियां नाहीं दमन । षट्कर्मेंविण ब्रह्मज्ञान । शोभा न पवे ४ नामा म्हणे सुंदरा । रखुमादेवीवरा । तुजवीण दातारा । शोभा न पवे ॥ ५ ॥

३१२८ शब्दाचें सुख श्रवणाचेनि द्वारें। माझिया दातारें ऐसें केलें १ स्पर्शाचें सुख त्वचेचेनि द्वारें। माझिया दातारें ऐसें केलें २ रूपाचें सुख नेत्राचेनि द्वारें। माझिया दातारें ऐसें केलें ३ रसाचें तें सुख रसनेचेनि द्वारें। माझिया दातारें ऐसें केलें ४ गंधाचें तें सुख नाकाचेंनि द्वारें। माझिया दातारें ऐसें केलें ५ नामा म्हणे ऐसे ज्याचे उपकार। तयासी गव्हार विसरले

३१२९ न लगति डोंगर चढावे। हळुच पाऊल धरावें १ विठ्ठलाचे पाय बरवे। गंगा विनविते स्वभावें २ नामा म्हणे तीर्थ बरवें। मुकुटीं धरिलें सदाशिवें

३१३० हरिकथा ऐकता अनन्य पैं गोष्टी। निधान त्या दृष्टीं अंतरलें १ घडी घडी प्रेम अंतरूं न द्यावें। सावधान व्हावें रामनामीं २ यापरि स्वहितीं ठेवियेले लक्ष। ते पावती मोक्ष म्हणे नामा ॥ ३ ॥

३१३१ अवघे ते संसारीं जाणावे ते धन्य। ज्यांचें प्रेम पूर्ण पांडुरंगीं १ अवघे ते दैवाचे विठ्ठल म्हणती वाचें। अवघें कुळ त्यांचें पुण्यरूप २ अवघ्या-रूपीं एक विठ्ठल भाविती। अवघ्या मनें भजती अवघेपणें ३ अवघे मिथ्या जाणोनि अवघिया विठ्ठलें। अवघे विनटले विठ्ठलपायीं ४ अवघे पूर्ण बोधें भावें प्रेमें प्रीतीं। ध्यानीं गीतीं गाती केशीराज ५ अवघा हा विठ्ठल भोगूं दीनरातीं। वोळगें किंकरवृत्तीं नामा त्यासी ॥ ६ ॥

३१३२ न पढावे वेद नको शास्त्रबोध। नामाचे प्रबंध पाठ करा १ नव्हे ब्रह्मज्ञान न होय वैराग्य। साधा भक्तिभाग्य संतसंगें २ येर क्रिया कर्म करितां हो कलीं। माजीं कोण बळीं तरले सांगा ३ नामा म्हणे मज सांगितलें संतीं। या परती विश्रांति आणिक नाहीं ॥ ४ ॥

३१३३ संतांचें घरीं जाहला पाहुणेर। नामाचा वोगर वाढियला १ घ्यारे ताटभरीं घ्यारे ताटभरीं। जेवा पोटभरीं रामनाम २ पायरव होईल दुर्जना न सांगावें। एकांतीं सेवावें म्हणे नामा ॥ ३ ॥

३१३४ प्रेमामृतसरिता पवित्र हरिकथा। त्रिभुवनींच्या तीर्था मुकुटमणी १ तेथें माझ्या मना होई क्षेत्रवासी। राहे संतापाशीं सुख घेतां २ ऐहिक्य परत्र दोन्ही समतीरीं। परमानंदलहरी झेंपावत ३ मुक्तांचें जीवन मुमुक्षा माउली। शिणल्या साउली विषयासक्तां ४ परमहंसकुळ सनकादिक सकळ। राहिले निश्चळ करोनि चित्त ५ नामा म्हणे मना सोइरे हरिजन। तारक त्यांचे चरण दृढ धरी ॥ ६ ॥

३१३५ प्रीति नाहीं रायें वर्जियेली कांता। परी तिची सत्ता जगावरीं १ तैसे दंभधारी आम्ही तुझे भक्त। घालूं यमदूत पायांतळीं २ रायाचा तो पुत्र अपराधी देखा। तो काय आणिकां दंडवेल ३ बहात्तर खोडी देवमण कंठीं। आम्हां जगजेठी नामा म्हणे ॥ ४ ॥

३१३६ वेदीं तोचि शास्त्रीं सर्वांठायीं तोचि। पुराणांत तोचि अंतःकरणीं १ नाम सदा ध्यायीं नाम सदा ध्यायीं। रामनाम ध्यायीं अरे मना २ नामा म्हणे देह नाहीं पुनरूपें। केशव नाम सोपें उच्चारीं बापा ॥ ३ ॥

३१३७ कर्मजड मूढ पतित पामर। भवसिंधु पार नटकें जया १ यालागीं पंढरी केली मुक्तिपेठ। भक्तें भूवैकुंठ वसविलें २ हेंचि पुंडलिकें मागितलें निकें। जें सर्वथा परलोकें चाड नाहीं ३ भुक्ति मुक्ति सिद्धि जें या आवडे। तें यां पवाडे विठ्ठलनामें ४ न लगति सायास करणें कायाक्लेश। नामाचा विश्वास दृढ धरा ५ नामा म्हणे अवघे चला पंढरिये। भेटों बापमायें पांडुरंगा

३१३८ एकादशी दिनीं खाइल जो अन्न। सूकर होऊनि येईल जन्मा १ एकादशी दिनीं करील जो भोग। त्यासी मातासंग घडतसे २ एकादशी दिनीं खेळेल सोंगटी। काळ हाणील खुंटी गुदस्थानीं ३ रजस्त्री शोणित सेविल्यासमान। तांबूल चर्वण करील जो ४ नामा म्हणे नाहीं माझ्याकडे दोष। पुराणीं हें व्यासवाक्य आहे ॥ ५ ॥

३१३९ नको नको मना हिंडों दारोदारीं। कष्ट झाले भारी वांयांविण १ कल्पना सांडोनि संतासंगें राहीं। सर्व त्यांचे पायीं सुख आहे २ ज्यांचिया दर्शनें शोक मोह जळे। पाप ताप पळे काळभय ३ जवळींच देखती पायाळा-वांचून। तें सुख निधान वैकुंठींचें ४ नामा म्हणे आली शेवटील घडी। तों घेई आवडी हीचि एक ॥ ५ ॥

३१४० अरे अलगटा माझिया तूं मना। किती रानोरानां हिंडविसी १ विठोबाचे पायीं दृढ घालीं मिठी। कां होसी हिंपुटी वायांविण २ क्रियाकर्म धर्म तुज काय चाड। जवळीं असतां गोड प्रेमसुख ३ संकल्प विकल्प सांडीं तूं समूळ। राहेरे निश्चळ क्षणभरीं ४ आपुलें निजहित जाण तूं त्वरित। वासनारहित होई वेगीं ५ नामा म्हणे तुज ठायींचें कळतें। सोसणें कां लागतें गर्भवास ॥ ६ ॥

३१४१ धरीं रे मना तूं विश्वास या नामीं। अखंड रामनामीं ओळखी धरी १ जप करी ऐसा अखंड खंडेना। निशिदिनीं मना होय जागा २ नामा म्हणे मना होई रामरूप। अखंडित जप सोहं सोहं ॥ ३ ॥

३१४२ शोधोनियां चारी वेद। सार काढोनियां भेद १ मना जाण जाण जाण। विठोबाची प्रेमखूण २ साहीं शास्त्रांचें संमत। मंथूनि काढिलें यथार्थ ३ योगियांचि जीवनकळा। उन्मनींचा जो जिव्हाळा ४ नामा म्हणे माझे बापें। साधीयलें संतकृपें ॥ ५ ॥

३१४३ भक्तिविण मोक्ष नाहीं हा सिद्धांत। वेद बोले हात उभारोनि १ तरी तेंचि ज्ञान जाणाया लागुनि। संतां वोळगोनि वश्य किजे २ प्रपंच हा

खोटा शास्त्रें निवडिला । पाहिजे साक्षिला सद्गुरु तो ३ नामा म्हणे सेवा घडावी संतांचीं । घ्यावी कृपा त्यांची तेंचि ज्ञान ॥ ४ ॥

३१४४ यम सांगे दूतां । तुम्ही जावें मृत्युलोका । आपुलाला लोक जितुका । तितुका आणावा १ तुम्हां सांगतों कुळरंग । निंदा आणि द्वेष करिती राग । खरी खोटी चाहडी सांगे । तें कुळ आपुलें २ ज्याचें विषयावर ध्यान । परद्रव्य परस्त्रीगमन । धर्मासी विन्मुखपण । तें कुळ आपुलें ३ भावें-विण भक्ति करिती । भक्तिविणें भाव दाविती । त्यांची तुम्ही फजिती । बहुतां प्रकारें करावी ४ मंत्रसंचारी जे लोक । देव सांडून देवताउपासक । झोटिंग वेताळ खेताळ देख । ते सखे बाप तुमचे ५ लटिके वासनेच्या नवसा । करिती करविती पशुहिंसा । त्यानें बहुत दिवस भरवंसा । दिला आहे ६ घातकी पातकी गुरुद्रोही । हित सांगतां गुरुसी हेडवी । विष्णुदासावेगळे करून पाहीं । सांगितले आणावे ७ नामा म्हणे एक्या पातकीया दंडिती । नाना विपत्ति काय सांगूं किती । विष्णुदासाचे वंदिती । चरणरज ते यम ८

३१४५ विष्णूसी भजला शिव दुराविला । अधःपात झाला तया नरा १ शिवपूजा करी विष्णूसी अव्हेरी । तयाचिये घरीं यम नांदे २ विष्णुकथा ऐके शिवासी जो निंदी । तयासी गोविंदीं ठाव नाहीं ३ नामा म्हणे असती शिव शिष्णु एक । वेदाचा विवेक आत्माराम ॥ ४ ॥

३१४६ जाखाई जोखाई उदंड दैवतें । वावुगेचि व्यर्थ श्रमतोसी १ अंतकाळीं तुज सोडविना कोणी । एक्या चक्रपाणीवांचोनीयां २ मागें थोर थोर कोणें केलें तप । उद्धरिले अमूप नारायणें ३ नामा म्हणे ऐसे बहु झाले भांड । न उच्चारी लंड नाम वाचें ॥ ४ ॥

३१४७ नाना परीचीं दैवतें । बहुत असतीं असंख्यातें १ सेंदूर शेरणीं जीं इच्छितीं । तीं काय आर्त पुरविती २ अंध नको होऊं आलिया । भज भज पंढरीराया ३ सोडूं नको विष्णू त्रिपारणिया । तोडी कुलूप पाठीं गळ टोंचोनिया ४ बाळा अबळा मुकी मोळी । क्षुद्र देवता जीवदान बळी । तेणें न पावती सुखकल्लोळीं । एक विठ्ठल वांचोनियां ५ नाना धातूचि प्रतिमा केली । षोडशोपचारें पूजा केली । दुकळी विकूनि खादली । ते काय आर्त पुरविती ७ आतां दृढ धरोनियां भाव । वोळगा वोळगा पंढरीराव । आपुले चरणीं देईल ठाव । विष्णुदास नामा म्हणे ॥ ७ ॥

३१४८ काय चाड आम्हां बाहेरल्या वेषें । सुखाचें कारण असें अंतरीं तें १ भीतरीं पालट जंव नाहीं झाला । तोंवरी न बोला जाणपणें २ चंद-नाचे संगती नीच महत्वा पावलीं । नांवें परीं उरलीं पालट देहीं ३ नामा म्हणे तोचि केशवातें जाणतां । केशव म्हणतां मुक्त होय ॥ ४ ॥

३१४९ जन्मां येऊनियां काय पुण्य केलें। बाळपण गेलें वायां वीण १ संतसंगें सुख हुंडारलें जाण। नामसंकीर्तना ओळखत २ तरुणपणें हि नाठवेचि देवा। वृद्धपणीं सेवा अंतरली ३ यापरीं जन्मुनी गेलासि रे वायां। पंढरिच्या राया नोळखितां ४ आलों मी संसारीं गुंतलों व्यापारीं। अझूनि कां श्रीहरी नोळखसी ५ सहस्र अपराध जरी म्यां रे केले। तारिलें विठ्ठलें म्हणे नामा ॥ ६ ॥

३१५० आलेनो संसारा उठा वेगें चला। जिवलग विठ्ठला भेटीलागीं १ दुर्लभ मनुष्यजन्म न लभे रे मागुता। लाहो घ्या सर्वथा पंढरिचा २ भावें लोटांगण घाला महाद्वारीं। होईल बोहरी त्रिविध तापा ३ श्रीमुखाची वास पहा धणीवरी। आठवीं अंतरीं घडिये घडिये ४ शुद्ध सुमनें कंठीं घाला तुळशीमाळा। तनमन ओवाळा चरणांवरुनी ५ नामा म्हणे विठो अनाथा कोंवसा। पुढती गर्भवासा येऊं नेदी ॥ ६ ॥

३१५१ हरीविण जिणें व्यर्थचि संसारीं। जग अलंकारीं मिरवीत १ देवावीण शब्द लटकें करणें। भांडा रंजविणें सभेमधीं २ आचार करणें देवाविण जो गा। सर्पाचिया अंगा मृदुपण ३ नामा म्हणे काय बहू बोलों फार। भक्तीविण नर अभागी तो ॥ ४ ॥

३१५२ मुखीं नाम हातीं टाळी। दया नुपजे कोणे काळीं १ काय करावें तें गाणें। धिक् धिक् तें लाजिरवाणें २ हरिदास म्हणोनि हालवी मान। कवडीसाठीं घेतो प्राण ३ हरिदासाचे पायीं लोळे। केशीं धरोनि कापी गळे ४ नामा म्हणे अवघे चोर। एक हरिनाम हें थोर ॥ ५ ॥

३१५३ जळीं बुडबुडे देखतां देखतां। क्षण न लागतां दिसेनाती १ तैसा हा संसार पाहतां पाहतां। अंतकाळीं हातां काय नाहीं २ गारुड्याचा खेळ दिसे क्षणभर। तैसा हा संसार दिसे खरा ३ नामा म्हणे तेथें कांहीं नसे बरें। क्षणाचें हें सर्व खरें आहे ॥ ४ ॥

३१५४ प्रपंच स्वार्थासी साभावया चांग। वैराग्याचें अंग दाविसी जनां २ अनुताप निम्य नाहीं कदाकाळीं। मग संचिताची होळी कैसी होय २ पवित्र ते वाचा कां रे गमाविसी। राम नाम न म्हणसी अरे मूढा ३ नामा म्हणे जीव कासया ठेवावा। न भजतां केशवा मायबापां ॥ ४ ॥

३१५५ कोळशासी दूध मर्दोनियां धुतां। न पावे शुद्धता कांहीं केल्या १ दुर्जनासी तैसा बोध परमार्थ। नवजायचि स्वार्थ कांहीं केल्या २ सूकराचे परी नेणती मिष्टान्न। विष्ठा ते भक्षण करिताती ३ मोहियले प्राणी

पाहतां पाहतां । काय सांगूं आतां नवलावो ४ नामा ह्मणे तयां न होयचि मोक्ष । येवोनि पद्मांक्ष केविं भेटे ॥ ५ ॥

३१५६ जाळें टाकिलें सागरीं । उदक नयेचि चूळभरीं १ तैसें पापियाचें मन । ज्या नावडे हरिकीर्तन २ सावजी केला कोल्हा राव । तो नसंडी आपुला भाव ३ गाढव गंगेसी न्हाणिलें । पुढती लोळूं तें लाभलें ४ श्वान बसविलें पालखीं । वरतीं मान करुनी भुंकी ५ नगर नावडे विखारा । दर्पण नावडे नकट्या नरां ६ पति नावडे शिंदळी । जाय परपुरुषा जवळीं ७ नामा ह्मणे बा श्रीहरी । कोड्या नावडे कस्तुरी ॥ ८ ॥

३१५७ एक म्हणाति आम्ही देवचि जालों । तरी असें नका बोलों पडाल पतनीं १ एक म्हणती आम्ही देवासमान । तरी घासिल वदन यमराव २ एक म्हणती आम्ही देवाचींच रूपें । तुमच्यानि बापें संसार न तुटे ३ देवें वधियेलें दानवां दैत्यां । आम्हा आड जातां तृण न मोडे ५ देवें उचलिल्या शिळा मेदिनी । तुमचेनि एक गोणी नुचले देखा ५ विठ्ठलाचें पद जो कोणी अभिलाषी । तो महापातकी म्हणे नामा ॥ ६ ॥

३१५८ वेदाध्ययन करिसी तरी वैदिकाचि होसी । परि वैष्णव न होसी अरे जना १ पुराण सांगसी तरी पुराणिकाचि होसी । परी वैष्णव न होसी अरे जना २ गायन करिसी तरी गुणीजन होसी । परी वैष्णव न होसी अरे जना ३ कर्म आचरसी तरी कर्मठाचि होसी । परी वैष्णव न होसी अरे जना ४ यज्ञ करिसी तरी याज्ञिकची होसी । परी वैष्णव न होसी अरे जना ५ तीर्थ करिसी तरी कापडीच होसी । परी वैष्णव न होसी अरे जना ६ नामा म्हणे नाम केशवाचें घेसी । तरीच वैष्णव होसी अरे जना ॥ ७ ॥

३१५९ पृथ्वी ध्यासी तरी पृथ्वीचि होसी । केशव न होसी अरे मना १ आप ध्यासी तरी आपचि होसी । केशव न होसी अरे मना २ वायु ध्यासी तरी वायूचि होसी । परी केशव न होसी अरे मना ३ आकाश ध्यासी तरी आकाशचि होसी । परी केशव न होसी अरे मना ४ नामा म्हणे जरी केशवासी ध्यासी । तरी केशवचि होसी अरे मना ॥ ५ ॥

३१६० बोलवरीं बोलती । श्रुती वाखाणिती । हरि पाविजे ती गती । वेगळी असे १ तुज न पवे गा तें स्वप्न । हरि शब्द एकचि ब्रह्म । पाविजे तें धर्म । वेगळें असें २ एक जाणिव खटपट । करिती ते सैराट । हरि पाविजे ती वाट । वेगळी असे ३ एक आहेत तार्किक । चार्वाकादि वादक । हरि पाविजे तें सुख । वेगळें असें ४ एक चातुर्य वक्ते । व्युत्पन्न कावित्वें । संत रंजविते । लोकाचारीं ५ जिहीं तुज जाणितलें । तिहीं मौनचि धरिलें । नामा म्हणे ते पावले । भक्तियोगें ॥ ६ ॥

रजकासी । शेखीं नेलें पायांपाशीं २ ब्रह्मग्रहा दिलें ज्ञान। केलें आपणा समान ३ काय तुम्हां आराधिलें । काय देवासी अर्चिलें ४ त्यासी तुम्ही तारियेलें । ब्रीद वत्सल मिरविलें ५ लीला दाविली लाघवा । शुष्क काष्ठासी पल्लवा ६ जनार्दना कृपा करा । राखें पायांपें किंकरा ॥ ७ ॥

## श्रीएकनाथमहाराज

३७४७ ध्येय ध्याता ध्यान । अवघा माझा जनार्दन १ आसन शयनीं मुद्रा जाण। अवघा माझा जनार्दन २ जपतप यज्ञ यागपण । अवघा माझा जनार्दन ३ भुक्तिमुक्ति स्थावर जाण । अवघा माझा जनार्दन ४ एका एकीं वेगळा जाण । अवघा भरला जनार्दन ॥ ५ ॥

३७४८ जनार्दनें माझें केलें असें हित । दाविला देहातीत देव मज १ नाठवे भाव अभावना तें कांहीं । स्वर्ग मोक्ष नाहीं चाड आम्हां २ देहाचें देहत्व देहपण गेलें । एकाजनार्दनीं केलें विदेहत्व ॥ ३ ॥

३७४९ धन्य गुरू जनार्दन । स्वानंदाचें जें निधान १ तेणें केला हा उपकार । दावियेलें परात्पर २ त्याच्या कृपें करूनि जाण । प्राप्त झालें ब्रह्मज्ञान ३ एकाजनार्दन सद्गुरू । जनार्दन माझा पैं आधारू ॥ ३ ॥

३७५० वेद तो आम्हां जनार्दन । शास्त्र तें आम्हां जनार्दन । पुराण जनार्दन । सर्वभावें १ सुख जनार्दन । दुःख जनार्दन । कर्म धर्म जनार्दन । सर्वभावें २ योग जनार्दन । याग जनार्दन । पाप आणि पुण्य । तेंही जनार्दन ३ यापरीं सर्वस्व अर्पी जनार्दन । एकाजनार्दन साधें भजन ॥ ४ ॥

३७५१ नेणें मंत्र तंत्र बीजाचा पसारा । जनार्दन सोईरा घडला मज १ भक्ति ज्ञान विरक्ति नेणें पैं सर्वथा । मोह ममता चिंता कांहीं नेणें २ योग याग कसवटी कांहीं नेणों आटी । सर्व देखों सृष्टीं जनार्दन ३ कायां वाचां मन ठेविलें चरणीं । एका जनार्दनीं सर्वभावें ॥ ४ ॥

३७५२ श्रीगुरुपायीं ठेवीं तूं विश्वास । दासाचा तूं दास होय त्याच्या १ परब्रह्म राम वसिष्ठा शरण । कृष्णें संपादीन गुरु केला २ वाल्मिका उपदेशी नारद तो मुनी । वंद्य त्रिभुवनीं झाला वाल्हा ३ एकाजनार्दनीं गुरू मज भेटला । मोकळा दाविला मार्ग तेणें ॥ ४ ॥

३७५३ मनोभाव जाणोनी माझा । सगुणरूप धरिलें वोजा । पाहुणा सद्गुरुराजा । आला वो माय १ प्रथम अंतःकरण जाण । चित्त शुद्ध आणि मन । चोखाळोनी आसन । स्वामीसीं केलें २ अनन्य आवडीचें जळ । प्रेक्षाळिले चरणकमळ । वासना समूळ । चंदन लावी ३ अहं जाळियला धूप । सद्भाव

उजळिला दीप । पंचप्राण हे अमूप । नैवेद्य केला ४ रज तम सांडोनी दोन्ही । विडा दिला सत्वगुणी । स्वानुभवें रंगोनी । सुरंग दावी ५ एकाजनार्दनीं पूजा । देव भक्त नाहीं दुजा । अवघाची सद्गुरुराजा । होवोनी ठेला ॥ ६ ॥

३७५४ ध्यानीं ध्याता गुरुराया । ब्रह्मभूत होय काया १ करें करितां गुरुपूजा । तेंचि पूजन अधोक्षजा २ पायीं करा गुरुयात्रा । मुखें उच्चार गुरुमंत्रा ३ एकाजनार्दनीं परब्रह्म । हेंचि जाणा धर्म कर्म ॥ ४ ॥

३७५५ धन्य धन्य श्रीगुरुभक्त । गुरूचें जाणती मनोगत १ गुरूचरणीं श्रद्धा गाढी । गुरुभजनाची आवडी २ गुरूचें नाम घेतां वाचे । कैवल्यमुक्ति तेथें नाचे ३ गुरुचें घेतां चरणतीर्थ । भुक्ति मुक्ति पवित्र होत ४ गुरुकृपेचें महिमान । शरण एकाजनार्दन ॥ ५ ॥

३७५६ धन्य धन्य सद्गुरुराणा । दाखविलें ब्रह्मभुवना १ उपकार केला जगीं । पावन झालों आम्ही वेगीं २ पंढरी पाहतां । समाधान झालें चित्ता ३ विटेवरी समचरण । एकाजनार्दनीं निजखूण ॥ ४ ॥

३७५७ वेदान्त सिद्धान्त पाहणें ते आटी । जनार्दन भेटी निसरली १ आगम निगम कासया दुर्गम । जनार्दनें सुवर्म सांगितलें २ न्यायमीमांसा पातंजली शास्त्रें । पाहतां सर्वत्र निवारलें ३ एकाजनार्दनीं पूर्ण कृपा केली । भ्रांति निसरली मनाची ते ॥ ४ ॥

३७५८ देवाचरणीं ठाव । तैसा गुरुचरणीं भाव १ गुरु देव दोन्ही समान । ऐसें वेदांचें वचन २ गुरु देवामाजीं पाहीं । भिन्न भेद नाहीं नाहीं ३ देवा पूजितां गुरुसी आनंद । गुरुसी पूजितां देवा परमानंद ४ दो नामाचेनि छंदें । एकाजनार्दनीं परमानंदें ॥ ५ ॥

३७५९ श्रीगुरूचें नाममात्र । तेंचि आमुचें वेदशास्त्र १ श्रीगुरुचें तीर्थमात्र । सकळ तीर्थी करी पवित्र २ श्रीगुरुचें चरण रज । तेणें आमुचें जाहलें काज ३ श्रीगुरूची ध्यानमुद्रा । तेचि आमुची योगनिद्रा ४ एकाजनार्दनीं मन । श्रीगुरुचरणीं केलें लीन ॥ ५ ॥

३७६० गुरुमुखें घेतां तो निर्दोष । येऱ्हवी आयास पडे कष्ट १ रामकृष्णहरि हा मंत्र सोपा । उच्चारितां खेपा खंडे कर्म २ तुटती भावना द्वैताची ते बुद्धी । निरसे उपाधी कामक्रोध ३ एकाजनार्दनीं सत्य सत्य साचा । रामनाम मंत्राचा जप करी ॥ ४ ॥

३७६१ पीक पिकलें प्रेमाचें । सांठविलें गगन टाचें १ भूमी शोधोनी पेरिजे बीज । सद्गुरुकृपें उगवलें सहज २ कामक्रोधाच्या उपटोनी पेंडी । कल्पनेच्या काशा काढी ३ एकाजनार्दनीं निजभाव । विश्वभरित पिकला देव

३७६२ गुरुस्मरण करितां देख । स्मरणें विसरे ताहान भूक १ आसनीं

शयनीं भोजनीं । गुरूतें न विसंबे ध्यानीं मनीं २ गुरुसेवेचि आवडी । सेवा करी चढोवढी ३ गुरुचरणांची गोडी । एकजनार्दनीं पायीं दडी ॥ ४ ॥

३७६३ गुरु परमात्मा परेशु । ऐसा ज्याचा दृढ विश्वासु १ देव तयाचा अंकिला । स्वयें संचला त्याचे घरीं २ एकाजनार्दनीं गुरु देव । येथें नाहीं ना संशय ॥ ३ ॥

३७६४ गुरु माता गुरु पिता । गुरु आमची कुळदेवता १ थोर पडतां सांकडें । गुरु रक्षी मागें पुढें २ कायां वाचां आणि मन । गुरुचरणींच अर्पण ३ एकाजनार्दनीं शरण । गुरु एक जनार्दन ॥ ४ ॥

३७६५ धन्य गुरुकृपा जाहली । अहंता ममता दूर गेली १ घालूनि अंजन डोळां । दाविला स्वयंप्रकाश गोळा २ बोधीं बोधविलें मन । नाहीं संकल्पासी भिन्न ३ देह विदेह निरसलें । एकाजनार्दनीं धन्य केलें ॥ ४ ॥

३७६६ सद्गुरुसी शरण जाय । त्यासी ब्रह्मप्राप्ति होय १ न लगे आणिक उपाय । धरी सद्गुरुचे पाय २ सद्गुरुचें चरणतीर्थ । मस्तकीं वंदावे पवित्र ३ एकाजनार्दनीं सद्गुरु । हाचि भवसिंधूचा तारू ॥ ४ ॥

३७६७ पावलों प्रसाद । अवघा निरसला भेद १ द्वैताद्वैत दूर ठेलें । एकपणें एक देखिलें २ जन वन समान दोन्ही । जनार्दन एकपणें ३ एकाजनार्दनीं लडिवाळ । म्हणोनि करावा सांभाळ ॥ ४ ॥

३७६८ माथां ठेवोनियां पाव । माझा देहचि केला देव १ नवलाव पायाचा मी केला । माझ्या देहींचा देवपणा नेला २ पायीं पराक्रम पंचानन । पायीं निरसला देहाभिमान ३ पायीं देहासी पाहे ठावो । पायीं देहचि केला वावो ४ नवल हा पायाचा भावो । पायीं नुरेचि देहीं देवो ५ एकाजनार्दनाच्या पायीं । देह विदेह दोन्ही नाहीं ॥ ३ ॥

३७६९ अवघेंचि त्रैलोक्य आनंदाचें आतां । चरणीं जगन्नाथा चित्त ठेलें १ माय जगन्नाथ बाप जगन्नाथ । अनाथाचा नाथ जनार्दन २ एकाजनार्दनीं एकपणीं उभा । चैतन्याची शोभा शोभलीसे ॥ ३ ॥

३७७० साधावया परमार्था । साह्य नव्हती माता पिता १ साह्य न होत व्याही जांवई । आपणा आपण साह्य पाही २ साह्य सद्गुरु समर्थ । तेचि करिती स्वहित ३ एकाजनार्दनीं शरण । नोहे एकपणावांचून ॥ ४ ॥

## श्रीज्ञानेश्वरमहाराज

३७७१ इवलेसें रोप लावियेलें द्वारीं । त्याचा वेलु गेला गगनावरीं १ मोगरा फुलला मोगरा फुलला । फुलें वेंचितांची भारू कळियासी आला २ मनाचिये गुंफीं गुंफियेला शेला । बापरखुमादेवीवरू विठ्ठलीं अर्पिला ॥ ३ ॥

३७७२ सद्गुरुवांचुनीं संसारीं तारक। नसेचि निष्टंक आन कोणी १ इंद्र चंद्र देव ब्रह्मादि करूनि। संशयाची श्रेणी छेदिती. ना २ उघडें परब्रह्म सद्गुरुची मूर्ती। पुरविती आर्ती शिष्याचिया ३ वंचना करिती जन दुष्ट नष्ट। मुख्य श्रेष्ठ श्रेष्ठ वंदिताती ४ ज्ञानदेव म्हणे गुरुचा मी दास। नेणे साधनास आन कांहीं ॥ ५ ॥

३७७३ सद्गुरुसारिखा सोयरा सज्जन। दाविलें निधान वैकुंठीचें १ सद्गुरु माझा जीवींचा जिवलग। फेडियेला पांग प्रपंचाचा २ सद्गुरु हा अनाथ माउली। कृपेचि साउली केली मज३ ज्ञानदेव म्हणे अवचित घडलें। निवृत्तीनें दिधलें निजबीज ॥ ४ ॥

३७७४ गुरु हा संतकुळींचा राजा। गुरु हा प्राणविसांवा। माझा गुरुविण दैव दुजा। नाहीं नाहीं त्रिलोकीं १ गुरु हा सुखाचा सागरू। गुरु हा प्रेमाचा आगरू। गुरु हा धैर्याचा डोंगरू। कदाकाळीं डळमळीना २ गुरु वैराग्याचें मूळ। गुरु हा परब्रह्म केवळ। गुरु सोडवी तात्काळ। गांठ लिंगदेहाची ३ गुरु हा साधकांसीं साह्य। गुरु हा भक्तांलागी माय। गुरु हा कामधेनु गाय। भक्तांघरीं दुभतसे ४ गुरु घाली ज्ञानांजन। गुरु दाखवी निज धन। गुरु सौभाग्य देऊन। साधुबोध नांदवी ५ गुरु भक्तिचें मंडण। गुरु दोषांचें दंडण। गुरु पापाचें खंडण। नानापरी वारितसे ६ काया काशी गुरु उपदेशी। तारक मंत्र दिला आम्हांशी। बापरखुमादेवीवरासी। ध्यान मानसीं लागलें॥७॥

३७७५ देखिले तुमचे चरण निवांत राहिलें मन। कासया त्यजीन प्राण आपुला गे माये १ असेन धणविरीं आपुले माहेरीं। मग तो श्रीहरी गीतीं गाईन गे माये २ सकळही गोत माझें पंढरीसी जाण। बापरखुमादेविवरा विठ्ठलाची आण ॥ ३ ॥

३७७६ तृप्ति भुकेली काय करूं माये। जीवनीं जीवन कैसें तान्हेजत आहे १ मन धालें परि न धाये। पुढत पुढती राजा विठ्ठलुचि पाहे २ निरंजनीं अंजन लेईजत आहे। आपुलें निधान कैसें आपणाचि पाहे ३ निवृत्ति गार्हस्थ्य मांडलें आहे। निष्काम आपत्य प्रसवत जाये ४ त्रिभुवनीं आनंदु न माये गे माये। आपेआपु परमानंदु वोसंडतु आहे ५ बापरखुमादेविवरु विठ्ठलु गे माये। देहभाव सांडुनि भोगिजत आहे ॥ ६ ॥

३७७७ श्रीगुरुसारिखा असतां पाठिराखा। इतरांचा लेखा कोण करी १ राजयाची कांता काय भीक मागे। मनाचिया जोगें सिद्धि पावे २ कल्पतरु तळवटीं जो कोणी बैसला। काय वानी त्याला सांगिजो जी ३ ज्ञानदेव म्हणे तरलों तरलों। आतां उद्धरलों गुरुकृपें ॥ ४ ॥

३७७८ पदोपदिं निजपदा गेले वो । कर्मसंचित न सकर्म जाले वो १ तेथें आपुलें नाठवे कांहीं वो । आप आपणा न पडे ठाई वो २ श्रीगुरुप्रसादें ज्ञान बोधु झाला वो । नव्हे तें ठाऊकें पडिलें माय वो ॥ ३ ॥

३७७९ अनुभव खूण मी बोलें साजणी । निरंजनीं अंजन लेईलें अंजनीं १ गुरुमुखें साधन जालें पै निवृत्ति । तत्वसार आपणचि जाला निवृत्ति २ बापरखुमादेविवरा विठ्ठलकृपा चित्तीं । पुंडलिका साधिलें प्रेम तत्वार्थी ३

३७८० ब्रह्म जयाचिये बोधेंचि पावत । ते जगीं शाश्वत गुरुमूर्ति १ शब्दज्ञानें जया गुरु उपदेशिती । नाहीं त्यासी मुक्ति कदां काळीं २ संसारीं तरोनि शिष्यासी तारिती । तेचि मानिजेति गुरु एक ३ कामक्रोध लोभ जे कां न शिवती । तेचि ओळखि सद्गुरु जाण ४ ज्याशी नाहीं भेद ब्रह्मीं एकाकार । म्हणे ज्ञानेश्वर तोचि गुरु ॥ ५ ॥

३७८१ मी माझें अद्वैत द्वैत होऊनि ठेलें । सद्गुरु एका बोलें ठेविलें ठायीं १ द्वैत गिळी अद्वैत मेळीं । चित्ताची काळजी तोडी वेगीं २ ज्ञानदेव म्हणे निवृत्ति उदार । दीपीं दीप स्थिर केला सोयी ॥ १ ॥

३७८२ अनंत अनंतापरी देखतां तो अंतरीं । हृदयांभीतरीं मज निववितो माये १ चाळवी चक्रचाळ अलगट गोपाळ । यानें केला सुकाळ सहज सुखाचा वो मायें २ सांगवी तें सांगणी उमगुनि चक्रपाणी । त्या निर्गुणाचे रहाणीं मी रिघालें वो माये ३ भ्रांतिभुली फेडुनिया निवृत्ति । रखुमादेवीवरु विठ्ठलीं गती झाली वो माय ॥ ४ ॥

३७८३ अमित्य भुवनीं भरलें शेखीं जें उरलें । तें रूप आपुलें मज दावियेलें वो माय १ आंतां मी नये आपुलिया आस । सायास तुटलें भ्रांतीचे वो माय २ मंजुळ मंजुळ वायो गती झळकती । तापत्रयें निवृत्ति निर्वाळिलें वो माय ३ वेडावलें एकाएकीं निजधामरूपीं । रखुमादेविवरु दीपीं दिव्य तेज वो माय ॥ ४ ॥

३७८४ मायविवर्जित जालें वो । माझें गोत तें पंढरिये राहिलें वो १ पतिव्रता मी परद्वारिणी । परपुरुषेंसी व्यभिचारिणी २ सा चारी चौदा जाली वो । सेखीं अठरा घोकुनी राहिलें वो ३ निवृत्ति प्रसादें मी गोवळी वो । माझा भावो तो विठ्ठलु न्याहाळी वो ॥ ४ ॥

३७८५ मजमाजीं पहातां मीपण हारपलें । ठकलेंचि ठेलें सये मन माझें १ आंत विठ्ठलु बाहेर विठ्ठलु । मीचि विठ्ठलु मज भासतसे २ मीपण माझें नुरेचि कांहीं दुजें । ऐसें नाहीं केलें निवृत्तिराजें म्हणे ज्ञानदेवो ३

३७८६ चातकाची तृषा मेघें पुरविली । ब्रह्मस्तनीं पान्हाईली बाईये वो

१ निवृत्तिप्रसाद माझ्या मुखीं सुदला । प्रेमरसें धारा फुटल्या दोहीं पक्षी २ बाप श्रीगुरु तेणें मज अफाविलें । अवघें ब्रह्म दाविलें ज्ञानदेवा ॥ ३ ॥

३७८७ देहधर्मी काज गुरुराज चित्तीं । तरीच या संपत्ती फळद होती १ तैसें तुझें ध्यान करितां उद्भट । सांपडली वाट वैकुंठींची २ ज्ञेय ज्ञाता ज्ञान ध्येय ध्याता हरी । समरसें श्रीहरी तत्व जालें ३ पृथ्वी आप तेज गगनाकृती वायो । फिटला संदेहो ये जन्मींचा ४ उपदेश द्रष्टा जरि असे श्रेष्ठ । तरीच भाग्य विनट विष्णुरूपीं ५ ज्ञानदेवीं सिद्धी साउली श्रीहरी । गुरुकृपा करीं कुरवाळिलें ॥ ६ ॥

३७८८ अनुपम्य तेजें धवळलें ब्रम्हांड । विश्वरूपीं अखंड तदाकार १ रसीं रस मुरे प्रेमाचें स्फुंदन । एकरूपीं घन हरी माझा २ नाद आणि ज्योति परिपूर्ण आम्हां । परेसि माहात्मा उजेडला ३ ज्ञाला अरुणोदयो उजळलें सूर्यतेज । त्याहूनि सतेज तेज आलें ४ हरपल्या रश्मी देहभाव हरी । ऋद्धि सिद्धि कामारी जाल्या कैश्या ५ निवृत्ति उपदेश ज्ञानिया लाधला । तत्वीं तत्व बोधला ज्ञानदेव ॥ ६ ॥

३७८९ आधींच तूं ज्ञान वरीं ज्ञालें उन्मन । हरी हें जीवन हृदयीं आलें १ स्थिरावलें ध्यान ज्ञानाचिया वृत्ति । विज्ञानसंपत्ति साधलिया २ अंधकारपट नासला समतेज । रामरूपीं पैज दीपज्ञान ३ संत शांत शांति उलथीचा ठसा । कृष्णरूपीं दिशा तेजो तेज ४ अलक्ष लक्षिते अगोचर पर । तेथेंही गव्हर संचलें असे ५ ज्ञानदेव सुखी जालासे विश्रांति । परमानंद चित्तीं निरंतर ॥ ६ ॥

३७९० ऐके तूं ज्ञान सुख विश्रांति रूपा । हरिरूप दीपा पाहे ऐसा १ चित्तवृत्तीचिया आदिमध्य अंतीं । रूपीं रूप आनंदीं समरसें २ निवृत्ति सांगे ज्ञाना योगाची धारणा । जीवशिव करणा चक्षु दृढ करी ॥ ३ ॥

३७९१ साध्यसाधनकाज निवृत्तीचें गुज । केशव सहज सर्वभूतीं १ रामकृष्ण मंत्रें प्रेक्षियेलीं गात्रें । हरिरूप सर्वत्र क्षर दिसे २ गुरुगम्य चित्त ज्ञालें माझें हित । दिननिशीं प्राप्त हरि आम्हा ३ पूर्णिमा प्रकाश चंद्र निराभास । हरी हा दिवस उगवला ४ चकोरें सेविती आळाउळें पाहाती । घटाघटा घेती अमृतपान ५ ऐसें हें पठण ज्ञानदेवा जालें । निवृत्तिनें केलें आपणाऐसें ॥६॥

३७९२ आकारीं नाहीं तें निराकारीं पाहीं । निराकारी राही शून्याशून्य १ जेथें शून्यचि मावळलें तेथें काय उरलें । हेंचि सांगे एक बोल मजपासीं २ शून्य कासयापासाव जालें शून्य तें कवणें केलें । हें सांगिजो जो एक्या बोलें गुरुराया ३ आपण शून्याकार कीं आपण निराकार । आकार निराकार मूर्तिमंत दाऊ ४ आकार निराकार ये दोन्ही नाहीं । तेंचि तूं पाहीं

आपणापें ५ जेथें अनुभवचि नाहीं तेंचि तूं पाही। स्वानुभवीं राहीं तुझा तूंचि ६ जेथें चंद्र सूर्य एक होती तेथें कैंचि दिनराती। ऐसें जे जाणती ते योगेश्वर ७ कर्माकर्म पारुषले देवधर्म लोपले। गुरुशिष्य निमाले जाले क्षीरसिंधू ८ तेथें गोडीविण चाखणें जिव्हेविण बोलणें। नेत्रेंविण पाहणें तेंचि ब्रह्म ९ हातीं घेऊनियां दिवटी लागिजे अंधारापाठीं। अंधार न देखे दृष्टीं उजियेडु तो १० बापरखुमादेविवरु विठ्ठलु देखणा। दृश्यद्रष्टेपणा माल्हावले

## श्रीनिवृत्तिमहाराज

३७९३ आदिनाथ उमा बीज प्रगटलें। मच्छिंद्रा लाधलें सहजस्थिती १ तेचि प्रेममुद्रा गोरक्षा दिधली। पूर्ण कृपा केली गयनीनाथा २ वैराग्यें तापला सप्रेमें निवाला। ठेवा जो लाधला शांतिसुख ३ निर्द्वंद्व निःसंग विचरतां महीं। सुखानंद हृदयीं स्थिरावला ४ विरक्तिचें पात्र अन्वयाचें सुख। देऊनि सम्यक् अनन्यता ५ निवृत्ति गयनीं कृपा केली पूर्ण। कुळ हें पावन कृष्णनामें ॥ ६ ॥

३७९४ आम्हां हेचि थोर सद्गुरुविचार। नलगे संप्रधार नाना मतें १ नेघों तें काबाड न करूं विषय। ब्रह्मांड हें होय आत्माराम २ नेदूं यासी दुःख उन्मनीचें सुख। न करूं तो शोक आला गेला ३ निवृत्ति म्हणे आम्हां सद्गुरु उपदेशु। सर्वांभूतीं वासु हरी असे ॥ ४ ॥

३७९५ चराचरीं हरि गुरुमुखें खरा। माजि ब्रह्म सैरा विचारों आम्हीं १ आम्हां ऐसें व्हावें तरीच हें भोगावें। निरंतर ध्यावें पोटाळूनी २ नाहीं येथ काळ अवघें शून्यमय। निर्गुणीं सामाय तनु माझी ३ निवृत्ति म्हणे पर त्रिकुटीं गोल्हाट। त्यावरील नीट वाट माझी ॥ ४ ॥

३७९६ साकार निराकार हे ब्रह्मींचे विकार। तेथील अंकुर गुरुराज १ रज तम नाहीं सात्त्विकही डोहीं। परिपूर्ण देहीं आत्माराम २ सर्व घटवासि सर्वत्र निवासी। आपण समरसीं बिंबलासे ३ निवृत्तिची खूण गुरुकृपा उद्धार। सर्व हा निर्धार आत्माराम ॥ ४ ॥

३७९७ विस्तार हरीचा चराचर झालें। त्या माजी सानुलें गुरु दैवत १ गुरुविण व्यर्थ विज्ञान न संपडे। ज्ञान हेतुकडे हिंडणें व्यर्थ २ गुरु परब्रह्म गुरु मातां पिता। गुरुनें समता दाखविली ३ निवृत्ति म्हणे गुरुबोध दिठीं। भक्ति नाम पेटी उघडिली ॥ ४ ॥

३७९८ आमुचा आचार आमुचा विचार। सर्व हरिहर एक पुरे १ धन्य माझा भाव सद्गुरु उपदेश। सर्व हृषीकेश। दावियेला २ हरिविण दुजें नेणें

जो सहजें। तया गुरुराजें अर्पियेलें ३ हरि हेचि व्रत हरि हेचि कथा। हरिचिया पंथा मनोभाव ४ देहभाव हरी सर्वत्र स्वरूप। एका जन्में खेप हरिली माझी ५ निवृत्ति हा हरि प्रपंच बोहरी। आपुला शरीरीं हरी केला ६

३७९९ सर्वाघटीं वसे तो आत्मा प्रकाशे। प्रत्यक्ष आम्हां दिसे गुरुकृपा १ विराले तें ध्येय ध्यान गेलें मनीं। मनाची उन्मनि एक झाली २ ठेला अहंभाव सर्व दिसे देव। निःसंदेह भव नाहीं आम्हां ३ निवृत्ति साधन गयनिप्रसाद। सर्व हा गोविंद सांगतुसे ॥ ४ ॥

३८०० हरिविण न दिसे जनवन आम्हां। नित्य हे पौर्णिमा सोळा कळीं १ चंद्रसूर्यरश्मी न देखों तरांगणें। अवघा हरी होणें हेंचि घेवों २ न देखों हे पृथ्वी आकाश पोकळी। भरलासे गोपाळीं दुमदुमीत ३ निवृत्ति निष्काम सर्व आत्माराम। गयनी हें धाम गुरुगम्य ॥ ४ ॥

३८०१ एक देव आहे हा भाव पैं सोपा। द्वैतरूपें बापा पडसी नरकीं १ द्वैत सांडी अद्वैत धरी। एक घरोघरीं हरी नांदे २ सबाह्य कोंदलें परिपूर्ण विश्वीं। तोचि अर्जुनासि दृष्ट जाला ३ गयनिप्रसादें निवृत्ति बोधु। अवघाचि गोविंदु अवघा रूपीं ॥ ४ ॥

३८०२ आम्ही चकोर हरी चंद्रमा। आम्ही कळा तो पूर्णिमा १ कैसा बाहिजु भीतरीं हरी। विवें बिंबला एकसूत्रीं २ आम्ही देही तो आत्मा। आम्ही विदेही तो परमात्मा ३ ऐक्यपणें सकळ वसे। द्वैत बुद्धि कांहीं न दिसे ४ निवृत्ति चातक इच्छिताहे। हरिलागीं वरतें पाहे ॥ ५ ॥

३८०३ हरी हेचि खूण सांगितली, आम्हां। जनवनसमा वर्ता तुम्ही १ ॐकार मूर्धनीं करावा कीर्तनीं। नित्य ब्रह्मार्पणीं भजन भावें २ नित्यकाळ कथा हरि विचरो सार। जन वन घर आम्हां असे ३ निवृत्ति म्हणे मी गुरुचा अंकीत। वाचे उच्चारीत हरी हरी ॥ ४ ॥

३८०४ भांडवल हरि पैल द्वीपांतरीं। हरिरूप चारी दिशा पूर्ण १ न दिसे तें भान दृश्य द्रष्टा हरी। सर्व घरोघरीं आत्माराम २ ज्ञानेंसी विज्ञान गेलें अनाठाया। हरीरूप छाया आम्हावरी ३ निवृत्ति दिधला नामें रूपें दिसे। सर्व हरी असे तेजोमय ॥ ४ ॥

३८०५ विवेक वैराग्य उन्मनी विनट। हरिनामें वाट सांपडली १ हरिनाम भला हरिकृष्ण भला। दिन उगवला ब्रह्मरूपें २ हरी हरी सार वाचेसि उच्चार। सर्व हा श्रीधर पुरे आम्हां ३ निवृत्ति निर्माण एक नाम हरी। प्रपंच बोहरी कोटी राशी ॥ ४ ॥

३८०६ निगम नियम सर्व सर्वोत्तम। दिनानिशीं राम सेवितुसे १ आम्हां

गोड हरी आम्हां चाड हरी । हरी तो संहारीं आम्हांमाजीं २ नेघों हरिवीण दुजें तें पैं भिन्न । सांगितली खूण गुरुराजें ३ निवृत्ति गयनी प्रसाद उन्मनीं। निरंतर ध्यानीं रामनाम ॥ ४ ॥

३८०७ हरि आत्मा होय परात्पर आलें । नाम हें रक्षलें वेदमतें १ वेदांत सिद्धांत नाहीं आनु हेत । सर्वभूतीं हित हरी आहे २ हरिवीण न दिसे गुरु सांगतसे । हरि हा प्रकाशे सर्वरूपीं ३ निवृत्ति कोंदलें सद्गुरूनें दिधलें । हरिधन भलें आम्हांमाजीं ॥ ४ ॥

## श्रीचोखोबामहाराज

३८०८ भक्तिभाव मज तुम्ही दाखविला । आनंद सोहळा सुखाचाचि १ तें प्रेम मज नये पैं सांगतां । कोंदाटलों चित्ता सुखानंदें २ रूपीं दृष्टी धाय पाहातां न समाये । बोलतांचि न ये काय करूं ३ चोखा म्हणे धन्य नामया तूं गुरु । फेडिला आधारु जीवित्त्वाचा ॥ ४ ॥

३८०९ धन्य धन्य नामदेवा । केला उपकार जीवा १ माझा निरसिला भेवो । दाखविला पंढरीरावो २ मंत्र सांगितला सोपा । निवारिले भवतापा ३ माझी कृपेची माउली। चोखा म्हणे पान्हा घाली ॥ ४ ॥

३८१० कोणाचा संग धरूं कोणासाटीं । तों दुःखाचीच मिठी पडे तेणें १ म्हणोनि नामयाचे धरियेले पाय । आठवितां होय समाधान २ सुखाचें सुख मज दावियेलें डोळां । आनंद सांवळा विटेवरीं ३ चोखा म्हणे माझा नामदेव प्राण । घालीन लोटांगण जीवें भावें ॥ ४ ॥

३८११ आजि सोनियाचा दिवस धन्य झाला । प्रत्यक्ष भेटला नामदेव १ माझें मज दिलें माझें मज दिलें । माझें मज दिलें प्रेमसुख २ बहुत आटणी करितां दाटणी । सुखाचें सुख मनीं कोंदाटलें ३ माझा मज देव दावियेला देहीं । मी तूं पण गेलें ठायींच्या ठायीं ४ चोखा म्हणे माझ्या जीवींचा विसांवा । पोकारितों धांवा नामदेवा ॥ ५ ॥

३८१२ न करी न करी आणिक साधन । नामयानें खूण सांगितली १ संसार सागर भरला दुस्तर । तारक निर्धार विठ्ठलु हा २ मंत्राचा हा मंत्र त्रिअक्षरीं सोपा । तुटताती खेपा जन्ममरण ३ चोखा म्हणे माझा धन्य गुरुराव । दाखविला देव हृदयीं माझ्या ॥ ४ ॥

---

# संतश्रेष्ठांचें स्तवन



## श्रीतुकाराममहाराज

३८१३ माझ्या बापें मज दिधलें भातुकें । म्हणोनि कवतुकें क्रीडा करी १ केली आळी पुढें बोलिलों वचन । उत्तम हें ज्ञान आलें त्याचें २ घेऊनी विभाग जावें लवलाह्या । आलेती त्या ठायां आपुलिया ३ तुका म्हणे ज्ञानदेवीं समुदाय । करावा मी पाय येईन वंदूं ॥ ४ ॥

३८१४ काय ज्ञानेश्वरीं उणें । तिहीं पाठविलें धरणें १ ऐकोनिया लिखीत । म्हूण जाणवली हे मात २ तरी जाणे धणी । वदे सेवकाची वाणी ३ तुका म्हणे ठेवा । होता सांभाळावें देवा ॥ ४ ॥

३८१५ बोलिलीं लेकुरें । वेडीं वांकुडीं उत्तरें १ करा क्षमा अपराध । महाराज तुम्ही सिद्ध २ नाहीं विचारिला । अधिकार म्यां आपुला ३ तुका म्हणे ज्ञानेश्वरा । राखा पायांपें किंकरा ॥ ४ ॥

३८१६ ज्ञानियांचा राजा गुरु महाराव । म्हणती ज्ञानदेव तुम्हां ऐसें १ मज पामरासी काय थोरपण । पायींची वहाण पायीं बरी ७ ब्रह्मादिक जेथें तुम्हां वोळगणे । इतर तुळणें काय पुढें ३ तुका म्हणे नेणें युक्तीची ते खोली । म्हणोनी ठेविली पायीं डोई ॥ ४ ॥

३८१७ जयाचिये द्वारीं सोन्याचा पिंपळ । अंगीं ऐसें बळ रेडा बोले १ करील तें काय नव्हे महाराज । परि पाहे बीज शुद्ध अंगीं २ जयानें घातली मुक्तीची गवांदी । मेळविली मांदी वैष्णवांची ३ तुका म्हणे तेथें सुखा काय उणें । राहे समाधानें चित्ताचिया ॥ ४ ॥

३८१८ ज्ञानराज माझी योग्यांची माउली । जेणें निगमवल्ली प्रगट केली १ गीता अलंकार नाम ज्ञानेश्वरी । ब्रह्मानंद लहरी हेलावली २ छपन्न भाषेचा केलासे गौरव । भवार्णवीं नांव तरावया ३ श्रवणाच्या मिसें बैसावें येवोनी । साम्राज्यभुवनीं सुखें नांदा ४ आध्यात्मविद्येचें दाखविलें रूप । उजळीला दीप चैतन्याचा ५ तुका म्हणे ग्रंथ श्रेष्ठ ज्ञानदेवी । एक तरी ओवी अनुभवावी

३८१९ देवालय बांधिलें सुंदर । कळाकुशलीं चित्राकार १ मुख्य पहावा वो कळस । पिका आला ब्रह्मरस २ ध्यावें सर्वांचें तें सार । भव सिंधू जेणें पार ३

मुख्य पहावा० ४ ॐ नमो भगवते वासुदेवाय । अक्षर द्वादश मुख्य पाहे ५ सद्गुरुघरच्या निजबीज कळस। पिका आला० ६ गीता भागवत ज्ञानेश्वरी । रामायण विवेकसिंधुची आत्मलहरी ७ पहावा अवघ्याच्या कळस। पिका आला० ८ योग क्षेम चालवी तत्क्षणीं । ही तों श्रीमुखींची वाणी ९ अवघ्या गीतेचा कळस। पिका आला० १० मुक्तिवरील गुरुभक्ति। उद्धवें मागितली प्रेमप्रीति ११ हाचि भागवताचा कळस। पिका आला० १२ माळीये जेउतें नेलें। तेउतें उगेंचि निवांत गेलें १३ हा तों ज्ञानेश्वरीचा कळस। पिका आला ब्रह्मरस० १४ अहं तत्वं सोहं श्रीरामरामाय । हा विश्वनामाचा जप पाहे १५ मुख्य रामायणाचा कळस। पिका आला० १६ याचि देहीं याचि डोळां । पाहे मुक्तिचा सोहळा १७ नको जाऊं मनाचे मागें। मुनी जयत्पाळा सांगे १८ हाच ज्ञानाचा कळस । पिका आला० १९ अंबरीष प्रल्हाद अंगद । उद्धव नामया नामाचा बोध २० हाच भक्तीच्या कळस। पिका आला० २१ संकल्प शतकोटी केलासे । तुका म्हणे लाभलें शेष २२ झाला अवतारांचा कळस। पिका आला० ॥ २३ ॥

३८२० संतकृपा झाली। इमारत फळा आली १ ज्ञानदेवें रचिला पाया । उभारिलें देवालया २ नामा तयाचा किंकर। तेणें केला हा विस्तार ३ जनार्दन एकनाथ । खांब दिला भागवत ४ तुका झालासे कळस। भजन करा सावकाश ॥ ५ ॥

३८२१ चला आळंदीला जाऊं। ज्ञानदेवा डोळां पाहूं १ होतिल संताचिया भेटी ।सांगों सुखाचिया गोष्टी २ ज्ञानेश्वर ज्ञानेश्वर। मुखीं म्हणतां चुकती फेर ३ जन्म नाहीं रे आणीक। तुका म्हणे माझी भाक ॥ ४ ॥

३८२२ जगीं ऐसा बाप व्हावा। ज्याचा वंश मुक्तीस जावा १ पोटां येतां हरलें पापा। ज्ञानदेवा मायबापा २ मुळीं बाप होता ज्ञानी। तरी आम्ही लागलों ध्यानीं ३ तुका म्हणे मी पोटींचें बाळ। माझी पुरवा ब्रह्मींची आळ

## श्रीनिळोबामहाराज

३८२३ उभारिला ध्वज तिहीं लोकांवरीं। ऐशी चराचरी कीर्ति ज्यांची १ ते हे निवृत्तिनाथ ज्ञानेश्वर सोपान। धन्य तो निधान ज्ञान दीप्तिकळा २ धरूनि सगुणरूपें केली बाळक्रीडा। बोलविला रेडा निगम वाचें ३ बैसूनियां वरीं चालविली भिंती । चांगदेवाप्रति दिली भेटी ४ मग वास केला अळंकापुरासी । पिंपळ द्वारासी कनकाचा ५ निळा म्हणे ज्यांच्या नामें करितां घोष। नातळती दोष कळिकाळाचे ॥ ६ ॥

३८२४ बोलविला बोले वेद। म्हैसा सुबुद्ध स्वरान्वयें १ काय एक न

करा देवा । भिंती चालवा निचेष्टिता २ शिष्यालागीं देतां बोध । नलगे पलार्ध निमिष्यहि ३ निळा म्हणे ज्ञानेश्वरा । मजहि अंगिकारा रंका दीना ४॥

## श्रीनामदेवमहाराज

३८२५ तिन्ही देव जैसे परब्रह्मींचे ठसे । जगीं सूर्य जैसे प्रकाशले १ धन्य तो निवृत्ति धन्य तो सोपान । धन्य तो निधान ज्ञानदेव २ उपजतांचि ज्ञानी हें वर्म जाणोनि । आले लोटांगणीं चांगदेव ३ प्रत्यक्ष पैठणीं भटीं केला वाद । बोलविला वेद म्हैशिपुत्रा ४ सोहंसुकृताच्या सोडोनियां गांठी । केलीसे मराठी गीतादेवी ५ नामा म्हणे सर्व सुकृत लाहिजे । एक वेळां जाइजे अळंकावती ॥ ६ ॥

३८२६ नाथा नको रे अंतरूं । तुझ्या कांसेचें वांसरूं १ कळा दुभती तूं गाय । तुझा वियोग असह्य २ देह भोगितां प्राक्तन । मना ठेवीं तवाधीन ३ ज्ञानदेवीं ही समाधी । जडो मनोबुद्धि अवघी ४ नामा भेटे ज्ञानदेवा । जना प्रसाद मिळावा ॥ ५ ॥

३८२७ गेले दिगंबर ईश्वर विभूति । राहिल्या त्या कीर्ति जगामाजीं १ वैराग्याच्या गोष्टी ऐकिल्या त्या कानीं । आतां ऐसें कोणी होणें नाहीं २ सांगतील ज्ञान म्हणतील खूण । नयेचि साधन निवृत्तीचें ३ परब्रह्म डोळां दावूं ऐसें म्हणती । कोणा नये युक्ती ज्ञानोबाची ४ करतील अर्थ सांगतील परमार्थ । नये पां एकांत सोपानाचा ५ नामा म्हणे देवा सांगूनिया कांहीं । नये मुक्ताबाई गुह्य तुझें ॥ ६ ॥

३८२८ काय सांगों देवा ज्ञानोबाची ख्याती । वेद म्हैशामुखीं वदविले १ कोठवरीं वानूं याची स्वरूपस्थिति । चालविली भिंती मृत्तिकेची २ अविद्या मायेचा लागों नेदी वारा । ऐसें जगदोद्धारें बोलविलें ३ नामा म्हणे यांनीं तारिले पतित । भक्ति केली ख्यात ज्ञानदेवें ॥ ४ ॥

३८२९ अनुभव हा सागर गुह्य आणि ब्रह्म । उघडें अध्यात्म बोलियेलें प्रगट हें गुह्य उकलिलें गबाळ । केलें करतळमळ ज्ञानयानें १ कोणाची कल्पना नुरेची बा येथें । उघडा गुह्यार्थ सिद्ध केला २ करणें न करणें सांगितला पंथ । तिहीं लोकीं कीर्त वाढविली ४ ज्ञान हें अंजन साधी संजीवनी । नामा म्हणे यानीं ख्याती केली ॥ ५ ॥

## श्रीजनाबाई

३८३० भाव अक्षराची गांठी । ब्रह्मज्ञानानें गोमटी १ ते हे माय ज्ञाने-

श्वरी । संतजनां माहेश्वरी २ ज्ञानेश्वर मंगल मुर्ती । सेवा करी दासी जनी ३

३८३१ गीतेवरीं आन टीका । ज्यांनीं वाढिविली देखा १ कनकताटामाजीं । त्यानें वोगरिलें कांजी २ ज्ञानेशावांचोनी । म्हणे टीका नव्हे जनी ॥ २ ॥

३८३२ विवेक सागर । सखा माझा ज्ञानेश्वर १ मरोनियां जावें । बा माझ्याच्या पोटां यावें २ ऐसें करी गा माझ्या भावा । सखया माझ्या ज्ञान-देवा ३ जाईन वोवाळुनीं । जन्मोजन्मीं म्हणे जनी ॥ ४ ॥

३८३३ मायेहूनि माय मानी । करी जीवाची ओंवाळणी १ परलोकींचें तारूं । म्हणे माझा ज्ञानेश्वरू २ वित्त गोत चित्त पाहे । सत्य वंदी गुरूचे पाय ३ पतिव्रते जैसा पती । जनी म्हणे सांगों किती ॥ ४ ॥

३८३४ अळंकापुरवासिनी समिप इंद्रायणी । पूर्वेसी वाहिनी प्रवाह तेथें १ ज्ञानाबाई आई आर्त तुझे पायीं । धावोनियां येई दुडदुडां २ बहु कासा-विस होतो माझा जीव । कनवाळ्याची कींव येऊं द्यावी ३ नामयाची जनी म्हणावी आपुली । पायीं सांभाळिली मायबापें ॥ ४ ॥

३८३५ अहो सखिये साजणी । ज्ञानाबाई हो हरणी १ मज पाडसाची माय । भक्तिवत्साची ते गाय २ कां गा उशिर लाविला । तुजविण शीण झाला ३ अहो बैसलें दळणीं । धांव घाली म्हणे जनी ॥ ४ ॥

३८३६ सदाशिवाचा अवतार । स्वामी निवृत्ति दातार १ महाविष्णूचा अवतार । सखा माझा ज्ञानेश्वर २ ब्रह्मा सोपान तो झाला । भक्तां आनंद वर्षला ३ आदिशक्ति मुक्ताबाई । दासी जनी लागे पायीं ॥ ४ ॥

३८३७ सोपानाची ऐशी मूर्ति । विश्वकर्ता ब्रह्मा ह्मणती १ ऐसे बोले पुराणांत । सृष्टी कर्ता जो भगवंत २ जनी म्हणे हा सोपान । ब्रह्मा अवतरला पूर्ण ३

३८३८ नामयाचा गुरु । तो हा सोपान सद्गुरु १ कऱ्हेतीरीं करूनी वस्ती । ब्रह्मपुरी तिशी म्हणती २ माझ्या जीवींच्या जीवना । हृदयीं राहें तूं सोपाना ३ विश्वउद्भव ज्याची सत्ता । जनी म्हणे माझ्या ताता ॥ ४ ॥

३८३९ संत राउळा चालिले । ज्ञानेश्वर तंव बोले १ केव्हढें नवल सांगावें । दासी जनीचें पद ल्याहावें २ पाय जोडुनी विटेवरीं । कटीं हात उभा हरी ३ रूप सांवळें सुंदर । कांनीं कुंडल मनोहर ४ सोनसळा वैजयंती । पुढें गोपाळ नाचती ५ गरूडपारीं सन्मुख उभा । जनी म्हणे धन्य शोभा ॥ ३ ॥

३८४० शालिवाहन शके अक्राशें नव्वद । निवृत्ति आनंद प्रगटले १ त्र्याणवाच्या सालीं ज्ञानेश्वर प्रगटले । सोपान देखिले शाणवांत २ नव्वा-णवांच्या शकीं मुक्ताई देखिली । जनी म्हणे केली मात त्यांनीं ॥ ३ ॥

# श्रीएकनाथमहाराज

३८४१ नमो ज्ञानराजा नमो ज्ञानराजा । निवृत्ति सहजा गुरुवर्या १ नमो सोपानदेवा मुक्ताई परेशा । ठाव त्या सर्वेशा कऱ्हातटीं २ समाधी वैभव पहांता नयनीं । चुकतसे आयणी जन्मव्याधीं ३ एकजनार्दनीं म्हणावा आपुला । अंकीत अंकिला दास तुमचा ॥ ४ ॥

३८४२ ज्ञानदेव ज्ञानदेव वदतां वाचें । नाहीं कळीकाळाचें भेव जीवां १ जातां अलंकापुर गांवीं । मोक्ष मुक्ति दावी वाट त्यासी २ब्रह्मज्ञान जोडोनि हात । म्हणे मी तुमचा अंकीत ३ वाचें वदतां इंद्रायणी । यम वंदितो चरणीं ४ एकाजनार्दनीं भावें । ज्ञानदेवा आठवावें ॥ ५ ॥

६८४ ज्ञानदेव चतुराक्षरी जप हा करी नूं सर्वज्ञा । ज्ञानाज्ञानविरहित ब्रह्म-प्राप्तीची संज्ञा । ज्ञाता ज्ञेय निजांग होय ऐसी प्रतिज्ञा । ज्ञानाग्नीनें पापें जळतीं ही ज्याची आज्ञा १ ज्ञानदेव ज्ञानदेव म्हणतां ज्ञानदेव देतो । वासुदेव होतो अखंड वदनीं बदे तो ॥ धृ० ॥ नररूपें विष्णु अवतरला हा भगवान । नदी नद वापी कूप पहतां उदक नव्हे भिन्न । नवल हेंचि पशु म्हैसा करितो वेदाध्ययन । नमन करूनी सद्भावें जपतां होय विज्ञान २ देवाधीश देव भक्ताप्रति वर दे । देतां वर ब्रह्मांडीं ब्रह्मानंद कोंदे । देशिकराज दयानिधि अलंकापुरीं जो नांदे । देशभाषा ज्ञानदेवी गीतार्थ वदे ३ वक्ता श्रोता श्रवणें पठणें पावती समभाव । वर्णू जातां अघटित महिमा होतो जीव शिव । वंदुनी अनन्य एका-जनार्दनीं धरीं दृढभाव । वर्षती निर्जर ज्ञानदेव नामें पुष्पांचा वर्षाव ॥ ४ ॥

३८४४ तीन अक्षरें निवृत्ति । जो जप करी अहोरात्रीं । तया सायुज्यता मुक्ती । ब्रह्मस्थिति सर्वकाळ १ चार अक्षरें ज्ञानदेव । जो जप करी धरील भाव । तया ब्रह्मपदीं ठाव । ऐसें देवाधिदेव बोलिले २ सोपान हीं तीन अक्षरें । जो जप करील निर्धारें । तयास ब्रह्म साक्षात्कारें । होय सत्वर जाणिजे ३ मुक्ताबाई चतुर्विधा । जो जप करील सदा । तो जाईल मोक्षपदा । सायुज्य संपदा पावेल ४ ऐसी चवदाहीं अक्षरें । जो ऐकेल कर्णविवरें । अथवा गाईल मुखद्वारें । त्यासी ज्ञानेश्वर प्रत्यक्ष भेटे ३ एकाजनार्दनीं प्रेम । जो करील धरिल नेम । तयास पुनः नाहीं जन्म । ऐसें पुरुषोत्तम बोलिले ॥ ६ ॥.

३८४५ कृपाळू उदार माझा ज्ञानेश्वर । तया नमस्कार वारंवार १ न पाहे यातिकुळाचा विचार । भक्त करुणाकर ज्ञानाबाई २ भलतिये भावें शरण जातां भेटी । पाडितसे तुटी जन्मव्याधीं ३ ज्ञानाबाई माझी अनाथाची माय । एकाजनार्दनीं पाय वंदितसे ॥ ४ ॥

३८४६ कैवल्याचा पुतळा। प्रगटला भूतळा। चैतन्याचा जिव्हाळा। ज्ञानोबा माझा १ साधकांचा मायबाप। दरूशनें हरे ताप। सर्वांभूतीं सुखरूप। ज्ञानोबा माझा २ ज्ञानियांचा शिरोमणी। वंद्य जो कां पूज्यस्थानीं। सकळांसी शिरोमणी। ज्ञानोबा माझा ३ चालविली जड भिंती। हरली चांगयाची भ्रांती। मोक्षमार्गींचा सांगाती। ज्ञानोबा माझा ४ वेद रेड्या बोलविला। गर्व द्विजांचा हरविला। शांतिबिंब प्रगटला। ज्ञानोबा माझा ५ उजळिली दीपिका। गीतेवरीं केली टीका। विठोबाचा प्राणसखा। ज्ञानोबा माझा ६ गुरुसेवेलागीं जाण। शरण एकाजनार्दन। चेतन्याचें जीवन। ज्ञानोबा माझा ॥ ७ ॥

३८४७ सर्व सुखाची लहरी। ज्ञानाबाई अलंकापुरीं १ शिवपीठ हे जुगाट। ज्ञानाबाई तेथें मुगुट २ वेदशास्त्र देती ग्वाही। म्हणती ज्ञानाबाई आई ३ ज्ञानाबाइचे चरणीं। शरण एकाजनार्दनीं ॥ ४ ॥

३८४८ ॐ नमो ज्ञानेश्वरा। करुणाकरा दयाळा १ तुमचा अनुग्रह लाधलों। पावन झालों चराचरीं २ मी कळा कुसरी कांहींच नेणें। बोलतों वचनें भाविका ३ एकाजनार्दनीं तुमचा दास। त्याची आस पुरवावी ॥ ४ ॥

३८४९ अहो दयाळे ज्ञानाबाई। आर्त माझें तुझ्या पायीं १ इंद्रायणीचे तटीं। ज्ञानाबाई वो गोमटी २ सकळ मेळा हो सिद्धांचा। ज्ञानाबाई अनुग्रहाचा ३ पूर्वपश्चिम देवस्थान। मध्यें ज्ञानाबाई आपण ४ ऐशी ज्ञानाबाई ध्याऊं। एकाजनार्दनीं शरण जाऊं ॥ ५ ॥

३८५० धन्य जाहलों आतां। अवघी चिंता वारली १ आजा देखिलीं पाउलें। सुख जाहलें समाधान २ निवारला भाग शीण। पाहतां चरण गोमटे ३ भय निवारली खंती। दृष्टी मूर्ति पाहतां ४ समाधी सोहळा देखिला। एकाजनार्दन सुखावला ॥ ५ ॥

३८५१ माझी ऐकावी विनंती। ज्ञानदेवा श्रेष्ठ मूर्ति १ तुम्हीं बैसोनि अंतरीं। मज जागवा निर्धारीं २ तुम्हीं सत्ताधारी। प्रपंच करावा बोहरी ३ श्रेष्ठा ज्ञानदेवा। एकाजनार्दनीं आठवा ॥ ५ ॥

३८५२ मोक्ष मुक्ति रिद्धी सिद्धी। पाहतां समाधी ज्ञानदेवा १ ऐसा लाभ सांगे देव। ऐके नामदेव आवडीं २ दरूशनें नासे व्याधी पीडा। ऐसा संवगडा ज्ञानदेव ३ एकाजनार्दन मापारी। नाचतसे अलंकापुरीं ॥ ४ ॥

३८५३ श्रीज्ञानदेवें येऊनी स्वप्नांत। सांगितली मात मजलागीं १ दिव्य तेजःपुंज मदनाचा पुतळा। परब्रह्म केवळ बोलतसे २ अजानवृक्षाची मुळी कंठास लागली। येऊनि आळंदी स्थळीं काढ वेगीं ३ ऐसें स्वप्न होतां आलों

अलंकापुरीं । तंव नदीमाझारीं देखिलें द्वार ४ एकाजनार्दनीं पूर्वपुण्य फळलें । श्रीगुरु भेटलें ज्ञानेश्वर ॥ ५ ॥

३८५४ आदिनाथ शंकरें केला उपकार । ठेवणें निर्धारें प्रगट केलें १ तोचि महाराज निवृत्ती अवतार । केला उपकार जगालागीं २ निवृत्तीनें गुज सांगितलें ज्ञानदेवा । होता जो ठेवा गुह्य कांहीं ३ ज्ञानदेवें केलें ठेवणें प्रकट । एकाजानार्दनीं नीट मार्ग सोपा ॥ ४ ॥

३८५५ पडले मायावर्ती शुद्धि नाहीं जया । म्हणोनि अवतार तयां धरलें लागें १ धन्य गुरु माझा निवृत्ति दयाळ । दाखविलें सोज्वळ पद जेणें २ केला उपकार तारिलें हे दीन । ज्ञानां ज्ञानांजन घालुनियां ३ नेणतीं जाणतीं पडलीं जी भुलीं । तयां शुद्धि केली त्रिअक्षरीं ४ एकाजनार्दनीं त्रिभुवनीं प्रताप । उजळिला दीप ज्ञानदेवें ॥ ५ ॥

३८५६ संतांचा महिमा वर्णावा किती । अलक्ष मूर्ति ज्ञानोबा तो १ अर्जुना संकट पडतां जडभारीं । गीता सांगे हरी कुरुक्षेत्रीं २ तोचि अवतार धरी अलंकापुरीं । ज्ञानाबाई सुंदरी तारावया ३ गीता शोधोनियां अर्थ तो काढिला । ग्रंथ तो निर्मिला ज्ञानेश्वरी ४ जगाचा उद्धार ज्ञानाबाई नामें । साधन हें आणिक नेणें न करीं कांहीं ५ एकाजनार्दनीं ज्ञानाबाई नाम । पावेन निजधाम संतांचें तें ॥ ६ ॥

३८५७ भाव धरूनियां वाची ज्ञानेश्वरी । कृपा करी हरी तयावरीं १ स्वमुखें आपण सांगे तो श्रीविष्णु । श्रीगीता हा प्रश्नु अर्जुनेंसी २ तेचि ज्ञानेश्वरी वाचें वदतां साचे । भय कळिकाळाचें नाहीं तया ३ एकाजनार्दनीं संशय सोडोनी । दृढ धरीं मनीं ज्ञानेश्वरी ॥ ५ ॥

३८५८ जोडोनियां दोनी हात । जगीं जाणवितों मात १ एकदां जा रे अलंकापुरा । जन्म येरझारा चुकवा । २ आवडीं सांगा जीवीचें आर्त । माउली पुरवित जाणोनि ३ ज्ञानराज माझी माउली । एकाजनार्दनाची साउली ॥ ४ ॥

३८६० ज्ञानदेव गुरु ज्ञानदेव तारूं । उतरील पैलपारू ज्ञानदेव १ ज्ञानदेव माता ज्ञानदेव पिता । तोडिल भवव्यथा ज्ञानदेव २ ज्ञानदेव माझे सोयरे धायरे । जिवलग निर्धारें ज्ञानदेव ३ सेना म्हणे माझा ज्ञानदेव निधान । दाविली निज खूण ज्ञानदेवें ॥ ४ ॥

३८६१ अलंकपुरवासिनी । ज्ञानाबाई मायबहिणी १ लेकुराची चिंता । वागवावी कृपावंता २ मी तों आहें यातीहीन । माझा राखा अभिमान ३ करूनि विनवणी । सेना लागतों चरणीं ॥ ४ ॥

३८६२ धन्य महाराज अलंकापुरवासी। साष्टांग तयासी नमन माझें १ या ज्ञानदेवाचें नित्य नाम घेती वाचें। उद्धरती तयाचीं सकळ कुळें २ इंद्रायणीं स्नान करिती प्रदक्षणा। तुटती यातना सकळ त्यांच्या ३ सेना म्हणे त्यांचें धन्य झालें जिणें। ज्ञानदेव दरूशनें मुक्त होती ॥ ४ ॥

३८६३ धन्य अलंकारपुर धन्य सिद्धेश्वर। धन्य ते तरुवर पशुपक्षी १ धन्य इंद्रायणी धन्य भागीरथी। तेथें स्नान जे करिती धन्य जन्म २ धन्य तो प्रयाग धन्य ते त्रिवेणी। वहाती येऊनि गुप्तरूपें ३ धन्य तें भूमी धन्य तें प्राणी। देखती नयनीं ज्ञानदेवा ४ धन्य ते भाग्याचे होती अलंकापुरीं। तयांचा निर्धारी धन्य वंश ५ धन्य दासानुदास अलंकापुरींचा। सेना म्हावी त्यांचा रजःकण ॥ ६ ॥

३८६४ धन्य धन्य निवृत्तिराया। शरण आलों तुझिया पायां १ नको पाहूं दुसरें आतां। गुण दोषाची वारता २ नाहीं माझा अधिकार। यातीहीन मी पामर ३ अपराधाचा केलों। सेना म्हणे काय बोलों ॥ ४ ॥

३८६५ शिवाचा अवतार। स्वामी निवृत्ति दातार १ तया माझा नमस्कार। वारंवार निरंतर २ सव्य नांदे कैलासराणा। मागें गंगा ओघ जाणा ३ सेना घाली लोटांगण। वंदि निवृत्तीचे चरण ॥ ४ ॥

३८६६ विष्णूचा अवतार। सखा माझा ज्ञानेश्वर १ चला जाऊं अळंकापुरा। संतजनाच्या माहेरा २ स्नान करितां इद्रायणी। मुक्ती लागती चरणीं ३ ज्ञानेश्वराच्या चरणीं। सेना आला लोटांगणीं ॥ ४ ॥

३८६७ वैकुंठवासिनी कृपावंत माऊली। जगा तारावया अळंकापुरा आली १ शिव तो निवृत्ति आदिमाया मुक्ताई। ब्रह्मा तो सोपान विष्णु ज्ञानदेव पाहीं २ येऊनी प्रतिष्ठानीं पशु वेद बोलविला। पंडित ब्रह्मज्ञानी यांचा गर्व हरिला ३ तप्तीतीरवासी चौदाशें वर्षांचा होता। तयाचा अभिमान गर्व हरि आदिमाता ४ वाळितां ब्राह्मणीं स्वर्गींचे पितर आणविले। सेना म्हणे जगीं पूर्णब्रह्म अवतरलें ॥ ५ ॥

३८६८ श्रीगुरु निवृत्तिराय सांप्रदाय दाविला। अलंकारपुरवासिनी अधिकार तया दिधला १ आदिनाथें मूळ गुप्त होतें ठेविलें। निवृत्तिकृपेनें ज्ञानदेवें प्रगट केलें २ बुडतां भवसागरीं जगा काढिलें बाहेरीं। दावियेला तारू विठ्ठल या तीं अक्षरीं ३ विटेवरीं उभा नीट वैकुंठींचा राणा। दावियेली खूण म्हणे न्हावीयाचा सेना ॥ ४ ॥

३८६९ निवृत्ति निवृत्ति। म्हणतां पाप नुरेचि १ जप करितां त्रिअक्षरीं। मुक्ति लोळे चरणावरीं २ ध्यान धरितां निवृत्ति। आनंदमय राहे वृत्ती ३ सेना म्हणे चित्तीं धरा। स्मरतां चुके येरझारा ॥ ४ ॥

३८७० वाचें उच्चारी जो ज्ञानदेवाशीं । तयाच्या सुकृतासी नाहीं पार १ पूर्वींचें सुकृत फळासी आलें । वाचें उच्चारिलें ज्ञानदेवा २ या अलंकापुरीं आला जन्मासी । पूर्वज तयासी मानिती धन्य ३ सेना म्हणे त्यानें उद्धरिलें कुळ । पूर्वज सफळ आशीर्वाद देती ॥ ४ ॥

३८७१ येऊनी नरदेहासी वाचें उच्चारी ज्ञानेश्वर । तयाचा संसार सुफळ झालागे माये १ प्रत्यक्ष परब्रह्म येऊनी अवतारासी । तारिलें जगासी नाममात्रें २ जयाचें अंगणीं पिंपळ सोनियाचा । सिद्ध साधकांचा मेळा तेथें ३ तयाचें स्मरणें जळतीं पातकें । सांगत पंढरीनाथ सेना म्हणे ॥ ४ ॥

३८७२ गिरजेप्रती शंकर उपदेशिले । तो गुह्य मंत्र सप्त समुद्रापलीकडे १ ऐसें निज गुह्य साराचेंही सार । उघडें दाविलें साचार ज्ञानदेवें २ हें सुखाचें सुख साधन । भक्ति ज्ञानाचें अंजन । हेंचि परब्रह्म जीवन ३ हेंचि मुख निज राम मंत्र सार । सुलभ साकार सेना ध्याये निरंतर ॥ ४ ॥

३८७३ श्रीज्ञानराजें केला उपकार । मार्ग हा निर्धार दाखविला १ विटेवरीं उभा वैकुंठनायक । आणि पुंडलीक चंद्रभागा २ अविनाश पंढरी भूमीवरीं पेठ । प्रत्यक्ष वैकुंठ दाखविलें ३ सेना म्हणे चला जाऊं तया ठायां । पांडुरंग सखया भेटवया ॥ ४ ॥

## श्रीचोखोबामहाराज

३८७४ महाविष्णूचा अवतार । प्राणसखा ज्ञानेश्वर १ आदिनाथाचा अवतार । निवृत्ति म्हणती साचार २ चतुराननाचा अवतार । तो हा सोपान निर्धार ३ आदि माया मुक्ताबाई । चांगा उपदेशिला पाहीं ४ ऐशा संतांच्या चरणीं । चोखा घालितो लोळणी ॥ ५ ॥

३८७५ सुख अनुपम संतांचें चरणीं । प्रत्यक्ष अलंकाभुवनीं नांदतसे १ तो हा महाराज ज्ञानेश्वर माऊली । जेणें निगमवल्ली प्रगट केली २ संसारीं आसक्त माया मोहें रत । ऐसे जे पतित तारावया ३ चोखा म्हणे श्रेष्ठ ज्ञानदेवी ग्रंथ । वाचितां सनाथ जीव होती ॥ ४ ॥

३८७६ उघडोनी वेदार्थाचा ठेवा । केला तरणोपाय जीवा १ ऐसा समर्थ ज्ञानदेव । तया चरणीं ठेवा भाव २ प्रत्यक्ष प्रचित लोचनीं । अस्थी विरती जीवनीं ३ पुढें सोन्याचा पिंपळ । ऐसी साक्ष असे अढळ ४ कर जोडुनियां दोन्ही । चोखा जातो लोटांगणीं ॥ ५ ॥

## श्रीकान्होपात्रा

३८७७ शिव तो निवृत्ति विष्णु ज्ञानदेव पाही । सोपान तो ब्रह्मा मूळ

माया मुक्ताई १ धन्य धन्य धन्य धन्य निवृत्तिराया । धन्य ज्ञानदेवा सोपान सखया २ प्रत्यक्ष पैठणीं भटां दाविली प्रचिती । रेडियाचे मुखें वदविली वेदश्रुती ३ चौदाशें वरुषांचे तप्तीतीर रहीवाशी । गर्व हरविला चालविलें भिंतीशीं ४ धन्य कान्हूपात्रा आजी झाली भाग्याची । भेटी झाली ज्ञानदेवाची म्हणूनियां ॥ ५ ॥

## श्रीनिळोबामहाराज

३८७८ म्हैसीपुत्रा मुखें बोलवणें श्रुती । चालवणें भिंती बैसोनियां १ नव्हे हा सामान्य महिमा संतांचा । नैवेद्य हातींचा मूर्ती जेवी २ उदकामाजीं वह्या ठेऊनि कोरड्या । दाखवणें रोकड्या विश्वजनां ३ निळा म्हणे तिहीं संगेंचि तारणें । दीनें उद्धरणें नवल कोण ॥ ४ ॥

३८७९ अगाध कीर्ति वाढले संत । केलीं विख्यात चारित्रें हीं १ अग्नींत उभे विषचि प्याले । नाहीं ते भ्याले महा शस्त्रा २ वंदूनि आज्ञा बोले पशु । करी श्रुतिघोषु दीर्घ स्वरें ३ निळा म्हणे ठेऊनि उदकीं । कागदहि सेखीं कोरड्या वह्या ॥ ४ ॥

३८८० दळणीं दळतां आठवे मानसीं । अलंकापुरवासी ज्ञानराज १ ओविया मंगळीं गाईन तयासी । स्वामी तुकयासी निजानंदें २ एका जनार्दन आणि नामदेव । देती स्वानुभव आठवितां ३ परलोक सोइरे जिवलग हे माझे । जे कां पंढरीराजे अनुग्रहीले ४ निळा म्हणे संत जे जे भूमंडळीं । त्यांची पायधुळी वंदिन मी ॥ ५ ॥

३८८१ प्रताप तुमचा आहेचि जैसा । करितां जी तैसा बडिवारही १ नव्हे जें कोणा तें करूनी दावितां । अघटित घडवितां निमिष्यमात्रें २ स्त्रियांचें पुरुष पशुमुखें श्रुती । चालविल्या भिंती उदकीं वह्या ३ निळा म्हणे माझा करा अंगिकार । तरी महिमा थोर वाढेल तुमचा ॥ ४ ॥

३८८२ मृतप्राणी ते जेवविले । पुरुषही केले स्त्रियांचे १ हे तों तुमची सहजस्थिती । लोकांसी भक्ति प्रगटावया २ प्रसादेंचि विधवेसी बाळ । जन्मविला केवळ भातलवंडा ३ निळा म्हणे तुमची करणी । देवाहुनि अधिक ४

३८८३ जिहीं निमिषमात्रें देह पालटिला । स्त्रियेचाचि केला पुरुष उभा १ त्याचें नवल कोण तारिती जड जीवा । यालागीं घडावा संतसंग २ जिहीं फिरविलें औंढ्याचें देऊळ । बोलाविले बोल मूर्तिकरवीं ३ निळा म्हणे जिहीं प्रेतें जीवविलीं । वरदें उपजविलीं बाळें स्त्रियां ॥ ४ ॥

३८८४ पशुमुखें वेदाच्या श्रुति । पढवा कीर्ती तुमचिये १ अचेतन भिंती

चालवणें । हेंही करणें विचित्र २ तेरा दिवस उदकीं ठेवा । कागद देवा कोरडे ३ निळा म्हणे नारायण । ब्राह्मणजन तुम्हां घरीं ॥ ४ ॥

३८८५ सूरदास आंधळा पंजाबी ब्राह्मण । गातां तुमचे गुण धन्य झाला १ विसोबा खेचर चांगा वटेश्वर । नरहरी सोनार पाठक नामा २ जिवलग तुम्हां सांगाती जीवाचे । विभागी भाग्याचे केले तुम्ही ३ निळा म्हणे भेद नाहीं तुम्हां संतां । दाविली भिन्नता प्रीतीसाठीं ॥ ४ ॥

३८८६ शुक प्रल्हाद हरिच्या नामें । गातां सुख संभ्रमें निवाले १ त्यांनीं उघडूनियां मार्गा । दाविली जगा हरिभक्ती २ तैसाचि नामा विष्णुदास । पावला सौरस परब्रह्मीं ३ निळा म्हणे दाउनी तुका । गेला एका जनार्दन ४॥

३८८७ देवचि झाले अंगें । देवा भजतां अनुरागें १ शुक प्रल्हाद नारद । अंबऋषी रुक्मांगद २ निवृत्ति ज्ञानेश्वर सोपान । नामा सजना आणि जाल्हाण ३ कूर्मा विसोबा खेचर । सांवता चांगा वटेश्वर ४ कबीर सेना सूरदास । नरसी मेहता भानुदास ५ निळा म्हणे जनार्दन एका । देवचि होऊनी ठेला तुका ॥ ६ ॥

३८८८ गजेंद्राच्या संगें नाडीया उद्धार । प्रल्हादें असुर उद्धरले १ हनुमंतें जुत्पत्ती रीस आणि वानर । पावले पार भवसिंधु २ बिभीषणें राक्षस लावियेले भक्ती । केली पावन क्षिती धर्मराजें ३ निळा म्हणे तैसें संतीं उद्धरिले । नवजतां बोलिले संख्यारहित ॥ ४ ॥

## निळोबाकृत श्रीतुकारामस्तुति श्लोक

३८८९ नमो सद्गुरु तुकया ज्ञानदीपा । नमो सद्गुरु सच्चिदानंदरूपा । नमो सद्गुरु भक्त कल्याणमूर्ती । नमो सद्गुरु भास्करा पूर्ण कीर्ती १ तुझ्या आठवीं वीसरे आपणातें । तरंगा जळीं घालितां जेविं होते । अळंकार सोनेंचि होऊनि ठेला । निळा यापरीं आठवी सद्गुरुला २ तुका सद्गुरु हा तुका सद्गुरु हा । तुका नातुडे सच्चिदानंद तो हा । जया मोहरा सर्व सिद्धांत जाले । न तुके महामौन्य घेऊनि ठेले ३ असद्भाग होणेंचि नाहीं जयातें । सदत्वासि कैसेंनि येणें तयातें । जडत्वासि जो नातळे चित्प्रकाशें । चिदाभास तो बोलिजे त्यासि कैसें ४ मनुष्याकृती राघवें ख्याति केली । शिळा शीखरें सागरीं तारियेलीं । तुकास्वामी हा पूर्ण प्रकाशी । जळीं रक्षिलें निर्जिवा कागदासी ५ असे जो सदा नित्य एकांतवासी । असे जो सदां सर्वदाही उदासी । असे जो सदां भोगत्यागें विरागी । असे जो सदां रंगला अंतरंगीं ६ तयाचें पदीं रंगलें चित्त माझें । सुखा पावलें सच्चिदानंद भोजें । म्हणोनि

निळा चिंतनीं तोचि चिंती। सखा सोयरा सद्गुरु तोचि अंतीं ७ न देखे रवी अंधकारासि जैसा। कदां बंधना देखे ना मुक्त तैसा। अशा सद्गुरू तूकयासी भजावें। भजोनि सदां तोचि होऊनि जावें ८ निळा पावला थोर पुण्यें तयासी। मनीं चिंतितां सद्गुरू तूकयासी। महा लाभ अलभ्य तो प्राप्त जाला। पदीं लागतां तोचि होऊनि ठेला ९ निजानंद आनंदवीतो मनाला। मनीं तोचि तो भासतो लोचनाला। तयावीण हें रिक्त नाहींच कोठें। दिसे सर्व जें त्यांतरीं तोचि भेटे १० अकस्मात येऊनियां भेटी दीली। परी भेटण्यामाजि जाणीव नेली। अशा जाणण्यानेणण्याही निराळा। करूनि पदीं स्थापिला नित्य नीळा ११ जया चिंतितां चित्त चैतन्य होतें। जया अर्चितां सर्व सामर्थ्य येतें। जया पाहतां पाहणें तोचि होये। जया ध्यासितां ध्येय ध्यातां न राहे १२ स्वतःसिद्धची स्वामी माझा तुकावा। तुकातीत हा नातुळे रूपनावा। निळा नित्य सर्वांतरीं त्यासि पाहे। तया चिंतनीं तोचि होऊनि राहे १३ जयाचें घरीं नित्य कैवल्य नांदें। तया दुःखदारिद्र्य कैचीं प्रमादें। जया जोडली संगती भास्कराची। तया घालणी केवी घालीं तमाची १४ बरा लाभ हातासि हा आजि आला। मनीं सद्गुरू तूकया सांठवीला। तयाचेनि भोजें निळा नाचताहे। जनीं वीजनीं तोचि सर्वत्र पाहे १५ नका तूकयासी कदां भेद मानूं। असे जीव जीवीं सदां तो समानू। नभा व्यापुनि अणुरेणु प्रकाशें। असे व्यापुनी सर्वही तो निजांशें १६ गुरू माउली साउली हे अनाथा। स्नेहाळूपणें पूरवी सर्व आस्था। अपत्या दिना पाजुनि प्रेमपान्हा। कशी रक्षिते अंगसंगीं अभिन्ना १७ जयाची क्रिया नित्य आनंदकारी। जयाची क्रिया सर्वदां निर्विकारी। जयाची क्रिया आवडे पांडुरंगा। जयाची क्रिया भोगवी सौख्यभोगा १८ जयाची क्रिया सत्यसंकल्प पाळी। जयाची क्रिया नित्यपर्वा दिवाळी। जयाची क्रिया भाविका सौख्यदाती। जयाची क्रिया मान्य संतीं महंतीं १९ जयाची क्रिया अमृता जीववीती। जयाची क्रिया भास्करा भाति दाती। जयाची क्रिया नीववीते मयंका। जयाची क्रिया सत्य बोधीत लोकां २० तुका सद्गुरू सर्व भोगीं विरागी। असे तेंचि होऊनी त्यातेंचि भोगी। तया आर्चिती त्यासिही लाभ होतो। निळा सद्गुरू तुकयासीच ध्यातो २१ जयाच्या प्रकाशा नसे पार लेखा। उदो अस्तु ना ग्रहणही सांजऊखा। तया आत्मया सद्गुरू स्वामियासी। नमस्कार माझा, सदा तूकयासी २२ जेणें बोधिला बोध मीळों सकेना। जेणें दीधला स्वानुभव तो टळेना। जेणें दाविला तोचि दृष्टीस राहे। निजात्मप्रकाशूचि सर्वत्र पाहे २३ निळा सद्गुरूचाचि अंकीत झाला। पदीं तूकयानें तया ठाव दीला। असें बोधिलें तेंचि बोलून ऊठी। स्वयें

जाणण्या नेणण्यातीत गोठी २४ म्हणोनि निळा सद्गुरूच्या पदासी । जडोनीच ठेला नव्हे भिन्न त्यासीं । सदांसर्वदां तूकयाचेंचि ध्यान । नव्हे विसरू नाठवे देहभान २५ नसे वर्ण व्यक्ती परी सुंदरू तो । बहू दाउनी रंजवी जीववी तो । परी आपरूपा समानूचि राहे । अनूमान दृष्टांत तोही न साहे २६ महद्भाग्य हें आजि ऊदीत झालें । गुरुस्वामिनी सत्कृपें क्षेम दीलें । बरा बोधुनी बोध चित्तासि केला । निळा संतजनाप्रती नीरवीला २७ करूनी कृपा बोधुनी हेंचि दीलें । होतें अंतरीं आर्त प्रविष्ट जालें । निळा ऐकतां नीजवाक्या निवाला । पदां वंदूनीयां सुखाचाचि जाला ॥ २८ ॥

## रामेश्वर भट्ट

३८९० भक्त भागवत जीवन्मुक्त संत । महिमा अत्यद्भुत चराचरीं । ऐसीया अनंतामाजीं तूं अनंत । लीलावेश होत जगत्राता १ ब्रह्मानंद तुकें तुळे आला तुका । तो हा विश्वसखा क्रीडे जनीं ॥ ध्रु० ॥ शास्त्रश्रेष्ठाचार अविरुद्ध क्रिया । तुझी भक्तराया देखियेली ॥ देऊनि तिळांजुळी काम्य निषिद्धांसी । विधिविणें योगेशीं ब्रह्मार्पण २ संत ब्रह्मेळीं जगत् अंध्या गिळी । पैल उदयाचळीं भानु तुका ॥ संतवृंदें तीर्थें गौतमी हरिकथा । तुकया नरसिंहस्था भेटों आली ३ शांति पतिव्रते जाले परिणयन । काम संतर्पण निष्कामता ॥ क्षमा क्षमापणें प्रसिद्ध प्रथा जगीं । तें तों तुझ्या अंगीं मूर्तिमंत ४ दया दिनानाथा तुवां जीवविली । विश्वीं विस्तारली कीर्ति तुझी ॥ वेदवाक्यबाहु उभारिला ध्वज । पूजिले देव द्विज सर्वभूतें ५ अधर्मक्षय व्याधी धर्मांशीं स्पर्शला । तो त्वां उपचारिला अनन्यभक्ति ॥ ब्रह्म ऐक्यभावें भक्ति विस्तारिली । वाक्यें सफळ केलीं वेदविहितें ६ देहबुद्धि जात्या अभिमानें वंचलों । तो मी उपेक्षिलों न पाहिजे ॥ न घडो याचे पायीं बुद्धीचा व्यभिचार । मागे रामेश्वर रामचंद्रा ॥ ७ ॥

३८९१ पंडित वैदिक अथवा दशग्रंथी । परि सरी न पवती तुकयाची । शास्त्र ही पुराणें गीता नित्य नेम । वाचिताति वर्म न कळे त्यांसी १ कर्म अभिमानें वर्ण अभिमानें । नाडले ब्राह्मण कलियुगीं ॥ ध्रु० ॥ तैसा नव्हे तुका वाणी व्यवसाई । भाव त्याचा पायीं विठोबाचे २ अमृतांची वाणी वरुषला शुद्ध । करी त्या अशुद्ध ऐसा कोण ३ चहूं वेदांचें हें केलें विवरण । अर्थही गहन करूनियां ४ उत्तम मध्यम कनिष्ठ वेगळे । करूनि निराळे ठेविले भक्तिज्ञानें आणि वैराग्यें आगळा । ऐसा नाहीं डोळां देखियेला ६ जप तप यज्ञें लाजविलीं दानें । हरिनाम कीर्तनें करूनियां ७ मागें कवीश्वर जाले

थोर थोर। नेलें कलेवर कोणें सांगा ९ म्हणे रामेश्वर सकळां पुसोनि। गेला तो विमानीं बैसोनियां ॥ १० ॥

३८९२ वैष्णवांची याती वाणी जो आपण। भोगी तो पतन कुंभपाकीं १ ऐसी वेद श्रुति बोलतीं पुराणें। नाहीं तें दूषण हरिभक्तां॥ धृ० ॥ उंच नीच वर्ण न म्हणावा कोणी। जें कां नारायणा प्रिय जालें २ चहूं वर्णांसी हा असे अधिकार। करितां नमस्कार दोष नाहीं ३ जैसा शालिग्राम न म्हणावा पाषाण। होय पूज्यमान सर्वत्रांसी ४ गुरु परब्रह्म देवाचा तो देव। त्यासी तों मानव म्हणूं नये ५ म्हणे रामेश्वर नामीं जे रंगले। स्वयेंचि ते जाले देवरूप ॥ ६ ॥

३८९३ तुकाराम तुकाराम। नाम घेतां कांपे यम १ धन्य तुकोबा समर्थ। जेणें केला हा पुरुषार्थ २ जळीं दगडासहित वह्या। तारियेल्या जैशा लाह्या ३ म्हणे रामेश्वर भट्ट द्विजां। तुका विष्णु नाहीं दुजा ॥ ४ ॥

## श्रीरंगनाथस्वामी

३८९४ जड देहा घेउनि वाणी। गेला ही ऐका वाणी ॥ गोडवे० ॥ घट फोडुनि जनकादिक ते। अनुभविते झाले माती ॥ हा नोहे तुकया तैसा। घट राखुनि धरिली माती १ इतर ते हरूनी दुग्धा। परिणामक घेती पाणी। हा नोहे तुकया तैसा। पय राखुनी चाखे लोणी २ इतर तें हरूनी कोहं। मग चाखियला तो सोहं। हा नोहे तुकया तैसा। अच्छेद्य पचविला सोहं ३ इतर ते मिश्रपुटांते। देउनिया जड टाकियलें॥ हा नोहे तुकया तैसा। परिसानें हेमचि केलें ४ जडबुद्धि अहं या देहा। निजस्वरुपीं वाहुनि गेला। निजरंगीं रंग पहाया। रंगानें निश्चय केला ५ या बोला सारचि कथितो। दिसणें हाची जन्म। अदृश्य मरण योग्यांचें। निजरंगीं अघटित वर्म ॥ ६ ॥

## श्रीजनाबाई

३८९५ ज्ञानेश्वर अभंग बोलिले ज्या शब्दां। सच्चिदानंद बाबा लिही त्यांस १ निवृत्तिचे बोल लिहिले सोपानें। मुक्ताईचीं वचनें ज्ञानदेवें २ चांगयाचा लिहणार शामा तो कांसार। परमानंदा खेचर लिहीत होता ३ सांगे पूर्णानंद लिही परमानंद। भगवंत भेटी आनंद रामानंद ४ सांवत्या माळ्याचा काशिबा गुरव। कर्म्याचा वासुदेव काइत होता ५ चोखामेळ्याचा अनंतभट्ट अभ्यंग। म्हणोनी नामयाचे जनीचा पांडुरंग ॥ ६ ॥

३८९६ भक्तांमाजीं अग्रगणी। पुंडलीक महामुनी १ त्याचे प्रसादें तरले।

साधुसंत उद्धरिले २ तोचि प्रसाद आम्हासीं । विटेवरी हृषिकेशी ३ पुंडलिक बापमाय । दासी जनी वंदी पाय ॥ ४ ॥

## श्रीसेनामहाराज

३८९७ सिद्धांमाजीं अग्रगणी । तो हा भोळा शूळपाणी १ धन्य धन्य त्रिंबकराजा । तया नमस्कार माझा २ जटीं गंगा वाहे । तो हा त्रिगुणात्मक पाहे ३ भोंवता वेढा ब्रह्मगिरी । मध्यें शोभे त्रिपुरारी ४ सेना घाली लोटांगण । उभा राहे कर जोडून ॥ ५ ॥

३८९८ नाम हें अमृत भक्तांसी दिधलें । ठेवणें ठेविलें होतें गुप्त १ प्रत्यक्ष अवतार धरिला अलंकारीं । मार्ग तो निर्धारीं दाखविला २ कृतयुगामाजीं वशिष्ठ जाणता । नाम तो घेता नारदमुनी ३ कलियुगामाजीं न घडे साधन । जातील बुडोन महाडोहीं ४ रामकृष्ण हरी गोविंद गोपाळ । स्मरा वेळोवेळां सेना म्हणे ॥ ५ ॥

## श्रीनरहरीसोनार

३८९९ धन्य पुंडलिक भक्त निवडला । अक्षयीं राहिला चंद्रभागीं १ भक्त नामदेव अक्षयीं जडला । पायरी तो झाला महाद्वारीं २ ज्ञानोबा सोपान निघती हे भक्त । अक्षयीं राहत परब्रह्मीं ३ बोधराज भला वचनीं गोविला । कीर्तनीं राहिला पांडुरंग ४ साधुसंत फार येती थोर थोर । उभा निरंतर चोखामेळा ५ संत साधूजन वंदिती चरण । नरहरी निशिदीन सेवेलागीं ॥ ६ ॥

## श्रीचोखोबामहाराज

३९०० सप्रेम निवृत्ति आणि ज्ञानदेव । मुक्ताईचा भाव विठ्ठल चरणीं १ सोपान सांवता गोरा कुंभार । नरहरी सोनार प्रेमभरीत २ कबीर कमाल रोहिदास चांभार । आणीक अपार वैष्णवजन ३ चोखा तयां पायीं घाली लोटांगण । वंदितो चरण प्रेमभावें ॥ ४ ॥

---

# आळंदी व देहू महिमा

## श्रीनिळोबामहाराज

३९०१ एक भूवैकुंठ एक शिवपीठ। महिमा वरिष्ठ दोहींचा १ तेथें पेरिलें जुगवें शेतीं। अस्थीं विरतीं येथें उदकीं २ चंद्रभागा चक्रतीर्थ। भीमा समर्थ इंद्रायणी ३ निळा म्हणे तेथें हनुमंत। येथें अश्वत्थ कनकाचा ॥ ४ ॥

३९०२ पंढरपुरीं ज्ञानेश्वरीं। मुक्ति कामारी बोळगती १ तेथें देव येथें भक्त। महिमा अद्‌भुत दोहींचा २ तेथें ध्यान येथें ज्ञान। परलोकसाधन दो ठायीं ३ निळा म्हणे तेथें गरुड। येथें झाड अजानतरु ॥ ४ ॥

३९०३ यात्रे अलंकापुरा येती। ते ते आवडती विठ्ठला १ पांडुरंगें प्रसन्नपणें। केलें देणें हें ज्ञाना २ भूवैकुंठ पंढरपूर। त्याहुनी थोर महिमा या ३ निळा म्हणे जाणोनी संत। येती धांवत प्रतिवर्षी ॥ ४ ॥

३९०४ वर्णितां महिमा तो अगाध। जेथें सिद्ध अवतरले १ पशुमुखें वदवूनि श्रुति। निर्जीव भिंती चालविली २ सन्मुख पुढें अजानवृक्ष। पिंपळ प्रत्यक्ष सोन्याचा ३ निळा म्हणे एकोनी कीर्ती। चांगदेव येती दर्शना ॥४॥

## श्रीनामदेवमहाराज

३९०५ धन्य पुण्यभूमि आळंदी हें गांव। दैवताचें नांव सिद्धेश्वर १ चौऱ्यांशीं सिद्धांचा सिद्धभेटी मेळा। तो सुखसोहळा काय सांगूं २ विमानांची दाटी पहाती सुरवर। वर्षताती भार सुमनांचें ३ नामा म्हणे देवा चला तंया ठायां। विश्रांती घ्यावया कल्पवरी ॥ ४ ॥

## श्रीएकनाथमहाराज

३९०६ विश्रांतीचें स्थान संतांचें माहेर। तें या भूमीवर अलंकापुर १ तये स्थळीं माझा जीवींचा वो ठेवा। नमीन ज्ञानदेवा जाऊनियां २ सिद्धेश्वरस्थान दरुशनें मुक्ती। ब्रह्मज्ञानप्राप्ती वटेश्वर ३ चौऱ्यांयशीं सिद्धांचा सिद्धभेटी मेळा। प्रत्यक्ष स्थापिला कल्पवृक्ष ४ तयासी नित्यतां घडतां प्रदक्षणा। नाहीं पार पुण्या वास स्वर्गीं ५ अमृतमय वाहे पुढें इंद्रायणी। भागीरथी आदिकरूनि तीर्थराज ६ ऐशीया स्थळीं समाधी ज्ञानदेव। एका जनार्दनीं ठाव अलंकापुर ॥ ७ ॥

## श्रीसेनामहाराज

३९०७ नामयाच्या नारायणें घेतली आळी। या भूमीचें महिमान सांगें म्हणे वनमाळी १ धन्य धन्य अलंकापुर धन्य धन्य सिद्धेश्वर। धन्य इंद्रायणी तीरीं राज्य करी ज्ञानेश्वर २ या भूमीचें वर्णन करूं न शके चतुरानन। महा-क्षेत्र पुरातन पातकें नासतीं स्मरणें ३ सेना म्हणे जगज्जीवन सांगतसे जीवींची खूण। महा दोषां होय दहन ज्ञानदेव दरुशनें ॥ ४ ॥

## श्रीकान्होपात्रा

३९०८ अलंकापुरीं पुण्य ठाव। तेथ समाधी ज्ञानदेव १ पांडुरंगें दिधला वर। भेटी निर्धार कृष्णपक्षीं २ नित्य स्नानालागीं जाणा। भागीरथी दिधली ज्ञाना ३ सरस्वती मणिकर्णिका। त्रिसंगमीं वाहती देखा ४ येथें स्नान करितां। वास वैकुंठीं तत्वतां ५ ऐसे देव सांगत। कान्होपात्रा आनंदत ॥६॥

## श्रीतुकाराममहाराज

३९०९ धन्य देहूगांव पुण्यभूमी ठाव। तेथें नांदे देव पांडुरंग १ धन्य क्षेत्रवासी लोक ते दैवाचे। उच्चारिती वाचें नामघोष २ कर कटीं उभा विश्वाचा जनिता। वामांगी ते माता रखुमादेवी ३ गरुडपारीं उभा जोडु-निया कर। अश्वत्थ समोर उत्तरामुख ४ दक्षिणे शंकर लिंग हरेश्वर। शोभे गंगानीर इंद्रायणी ५ लक्ष्मीनारायण बल्लाळाचें वन। तेथें अधिष्ठान सिद्धेश्वर ६ विघ्नराज दारीं बहिरव बाहेरीं। हनुमंत शेजारीं सहित दोघे ७ तेथें दास तुका करितो कीर्तन। हृदयीं चरण विठोबाचे ॥ ८ ॥

---

# संतपर

## श्रीतुकाराममहाराज

३९१० श्रीसंतांचिया माथा चरणावरीं। साष्टांग हे करीं दंडवत १ विश्रांती पावलों सांभाळउत्तरीं। वाढले अंतरीं प्रेमसुख २ डौरली हे काया कृपेच्या

थोरसें । नव्हे अनारिसें उद्धरलों ३ तुका म्हणे मज न घडतां सेवा । पूर्वपुण्य-ठेवा वोढावला ॥ ४ ॥

३९११ आले संत पाय ठेवितों मस्तकीं । इहीं उभयलोकीं सरता केलों १ वंदीन पाउलें लोळेन चरणीं । आजि इच्छाधणी फिटईल २ अवघीं पूर्व-पुण्यें झालीं सानुकूळ । अवघेंचि मंगळ संतभेटीं ३ तुका म्हणे कृतकृत्य झालों देवा । नेणें परि सेवा डोळां देखें ॥ ४ ॥

३९१२ ऐशा भाग्यें ज्यालों । तरीच धन्य जन्मा आलों १ रुळे तळील पायरी । संत पाय देती वरी २ प्रेमामृतपान । होईल चरणरजें स्नान ३ तुका म्हणे सुखें । तया हरतील दुःखें ॥ ४ ॥

३९१३ तृषाकाळीं उदक भेटी । पडे मिठी आवडीची १ ऐसियांचा हो कां संग । जिवलग संतांचा २ मिष्टान्नाचा योग भुके । म्हणतां चुके पुरेसें ३ तुका म्हणे माते बाळा । कळवळा भेटीचा ॥ ४ ॥

३९१३ काय वानूं आतां न पुरे हे वाणी । मस्तक चरणीं ठेवितसें १ थोरीव सांडिली आपुली परिसें । नेणें सिवों कैसें लोखंडासी २ जगाच्या कल्याणा संतांच्या विभूती । देह कष्टविती परोपकारें ३ भूतांची दया हे भांडवल संतां । आपुली ममता नाहीं देहीं ४ तुका म्हणे सुख पराविया सुखें । अमृत हें मुखें स्रवतसे ॥ ५ ॥

३९१४ काय सांगों मी या संतांचे उपकार । मज निरंतर जागविती १ काय द्यावें यांसी व्हावें उतराई । ठेवितां हा पायीं जीव थोडा २ सहज बोलणें हित उपदेश । करूनि सायास शिकविती ३ तुका म्हणे वत्स धेनु-वेच्या चित्तीं । तैसें मज येती सांभाळीत ॥ ४ ॥

३९१५ कोणा पुण्या फळ आलें । आजि देखिलीं पाउलें १ ऐसें नेणों नारायणा । संतीं सांभाळीलें दीना २ कोण लाभकाळ । दिन आजिचा मंगळ ३ तुका म्हणे झाला । एवढा लाभ गा विठ्ठला ॥ ४ ॥

३९१६ ते माझे सोयरे सज्जन सांगाती । पाय आठविती विठोबाचे १ येरा मान विधिपाळणापुरतें । देवाचीं तीं भूतें म्हणोनियां २ सर्वभावें जालों वैष्णवांचा दास । करीन त्यांच्या आस उच्छिष्टाची ३ तुका म्हणे जैसे आवडती हरिचे दास । तैशी नाहीं आस आणीकांची ॥ ४ ॥

३९१८ दसरा दिवाळी तोचि आम्हां सण । सखे संतजन भेटतील १ अमुप जोडल्या सुखाचिया राशी । पा या भाग्यासी नाहीं आतां २ धन्य दिवस आजि जाला सोनियाचा । पिकली हे वाचा रामनामें ३ तुका म्हणे काय होऊं उतराई । जीव ठेऊं पायीं संतांचिये ॥ ४ ॥

३९१९ धन्य काळ संतभेटी । पायीं मिठी पडिलीसे १ संदेहाच्या सुटल्या

किरीट कुंडलें। परिधान केलें पीत वस्त्र ३ चोखा म्हणे ऐसा लावण्य पुतळा। तो आम्ही देखिला दृष्टिभरीं ॥ ४ ॥

नामपरः—

४४०५ पडतां जड भारी। दासीं आठवावा हरी १ मग तो होऊं नेदी सीण। आड घाली सुदर्शन २ नामाच्या चिंतनें। बारा वाटां पळतीं विघ्नें ३ तुका म्हणे प्राण। करा देवासी अर्पण ॥ ४ ॥

४४०६ हो कां दुराचारी। वाचे नाम जो उच्चारी १ त्याचा दास मी अंकित। कायांवाचांमनेंसहित २ नसो भाव चित्तीं। हरिचे गुण गातां गीतीं ३ करी अनाचार। वाचे हरिनाम उच्चार ४ हो कां भलतें कुळ। शुचि अथवा चांडाळ ५ म्हणवी हरिचा दास। तुका म्हणे धन्य त्यास ॥ ६ ॥

४४०७ रामनाम ज्याचें मुखीं। तो नर धन्य तिहीं लोकीं १ रामनाम वदतां वाचें। ब्रह्म सुख तेथें नाचें २ रामनामें वाजे टाळी। महादोषा होय होळी ३ रामनाम सदा गर्जे। कळीकाळ भय पाविजे ४ ऐसा रामनामीं भाव। तया संसारची वाव ५ आवडीनें नाम गाय। एकाजनार्दनीं वंदी पाय ॥ ६ ॥

४४०८ माझ्या कान्हाचें तुह्मीं नांव भरी घ्यावो। हृदयीं धरोनि यासी खेळावया न्यावो १ भक्तांकारणें येणें घेतलीसे आळी। दहा गर्भवास सोशी वनमाळी २ कल्पनेविरहित भलतया मागें। अभिमान सांडुनी दीनापाठीं लागे ३ शोषिली पूतना येणें मोडियेले तरू। आळी न संडी बापरखुमादेविवरु ॥ ४ ॥

४४०९ सकळ नेणोनियां आन। एक विठ्ठलुचि जाण १ पुढती पुढती मन। एकला विठ्ठलुचि जाण २ हेचि गुरुगम्याची खूण। एक विठ्ठलुचि जाण ३ बुझसि तरि बूझ निर्वाण। एकला विठ्ठलुचि जाण ४ हेचि भक्ति हेंचि ज्ञान। एकला विठ्ठलुचि जाण ५ बापरखुमादेविवरा विठ्ठलाचि आण। एक विठ्ठलुचि जाण ॥ ६ ॥

४४१० नसे तो ब्रह्मांडीं नसे तो वैकुंठीं। दुजियाचा गोष्टी नाहा जेथें १ तें रूप सुंदर देवकीउदरीं। वसुदेवाघरीं कृष्ण माझा २ ब्रह्मांड कडवा मनाचा वोणवा। साधितां राणिवा हारपती ३ निवृत्ति सुंदर कृष्णरूप सेवी। गयनीगोसावीं उपदेशिलें ॥ ४ ॥

४४११ आम्हां न कळे ज्ञान न कळे पुराण। वेदाचें वचन नकळे आम्हां १ आगमाची आटी निगमाचा भेद। शास्त्रांचा संवाद न कळे आम्हां २

योग याग तप अष्टांग साधन । नकळेची दान व्रत तप ३ चोखा म्हणे माझा भोळा भाव देवा । गाईन केशवा नाम तुझें ॥ ४ ॥

४४१२ धरोनि विश्वास राहिलेंसे द्वारीं । नाम श्रीहरी आठवीत १ कळेल तैसें करा जी दातारा । तारा अथवा मारा पांडुरंगा २ मी तंव धरणें घेवोनी बैसलों । आतां काय बोलों ययावरीं ३ चोखा म्हणे माझा हाचि नेम आतां । तुम्हीं कृपावंता सिद्धि न्यावा ॥ ४ ॥

कीर्तनपरः—

४४१३ वैराग्याचा मेरु तो गोरा कुंभारु । तोडियले करु आणेसाठीं १ महाद्वारीं कथा श्रवण करितां । टाळी वाजवितां निघती नवे २ तुम्हीं देवा कृपादृष्टीं अवलोकिला । हृदयीं तो धरिला प्रीति करीं ३ निळा म्हणे तुम्हां दासाचा अभिमान । अवतार म्हणवून धरणें लागे ॥ ४ ॥

एकविधः—

४४१४ तुजविण वानीं आणिकांची थोरी । तरी माझी हरि जिव्हा झडो १ तुजविण चित्ता आवडे आणीक । तरी हा मस्तक भंगो माझा २ नेत्रीं आणिकांसी पाहाती आवडीं । जातु तेचि घडी चांडाळ हे ३ कथामृतपान न करिती श्रवण । काय प्रयोजन मग यांचें ४ तुका म्हणे काय वांचून कारण । तुज एक क्षण विसंबतां ॥ ५ ॥

१४१५ आगी लागों तया सुखा । जेणें हरि नये मुखा १ मज होत कां विपत्ति । पांडुरंग राहो चित्तीं २ जळो तें समूळ । धन संपत्ति उत्तम कुळ ३ तुका म्हणे देवा । जेणें घडे तुझी सेवा ॥ ४ ॥

करुणापरः—

४४१६ कोणीकडे जाऊं । देवा तुला कोठें पाहूं १ देहीं वणवा लागला । दया येईना तुजला २ देह भाजुनी झाली लाही । मग तूं येऊन करिशील काई ३ तुका म्हणे कृपानिधी । प्राण उरला डोळ्यामधीं ॥ ४ ॥

भेटीपर :—

४४१७ जन्मोजन्मींचें संचित । भेटी झाली अकस्मात १ आतां सोडितां सुटेना । ततु प्रीतीचा तुटेना २ माझें चित्त तुझ्या पायां । मिठी पडली पंढरीनाथा ३ तुका म्हणे अंतीं । तुझी माझी एक गती ॥ ४ ॥

भूपाळीः—

४४१८ लाजले गे माय आतां कोणा ओवाळूं । जिकडे पाहे तिकडे चतुर्भुज गोपाळू १ ओवाळूं गे माय मी गेले द्वारकें । जिकडे पाहे तिकडे

चतुर्भुज सारिखें २ ओवाळूं मी गेलें माय सखिया माझारीं । जिकडे पाहे तिकडे चतुर्भुज नरनारी ३ ओवाळूं मी गेलें माय सारंगधरा । जिकडे पाहे तिकडे चतुर्भुज परिवारा ४ वैजयंती गळां श्रीवत्सलांछन । विष्णुदास नामयानें दाविली खूण ॥ ५ ॥

गौळण :—

४४१९ अरे गौळ्याच्या मुला झोंबसी ॥ धृ० ॥ अरे गौळ्याच्या, रिपु कंसाच्या करुणा येउ दे तुला १ सासुसासरे दीरभाचरे घरीं आहे दादुला २ जावा नणंदा, विषयसमंधा दीर आहे धाकुला ३ एकाजनार्दनीं नंदनंदना । किती धरिसी अबोला ॥ ४ ॥

उपदेशपर :—

४४२० विधीनें सेवन । विषयत्यागातें सामान १ मुख्य धर्म देव चित्तीं । आदि अवसानीं अंतीं २ बहु अतिशय खोटा । तर्कें होती बहु वाटा ३ तुका म्हणे भावें । कृपा करीजेते देवें ॥ ४ ॥

॥ श्री पुंडलीक वरदे हरि विठ्ठल ॥

॥ श्रीज्ञानदेव तुकाराम ॥



# आरत्या

## श्रीपांडुरंगाची आरती

युगें अठ्ठावीस विटेवरीं उभा । वामांगीं रखुमाई दिसे दिव्य शोभा । पुंडलिकाचे भेटीं परब्रह्म आले गा । चरणीं वाहे भीमा उद्धरी जगा १ जयदेव जयदेव जय पांडुरंगा । रखुमाई वल्लभा राहीच्या वल्लभा पावें जिवलगा ॥धृ०॥ तुळसीमाळा गळां कर ठेवूनि कटीं । कांसे पीतांबर कस्तुरी ल्लाटीं । देव सुरवर नित्य येती भेटी । गरुड हनुमंत पुढें उभे राहती २ आषाढी कार्तिकी भक्तजन येती । चंद्रभागेमाजीं स्नान जे करिती । दर्शनहेळामात्रें तयां होय मुक्ती । केशवासी नामदेव भावें ओवाळिती ॥ ३ ॥

## श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या आरत्या

आरती ज्ञानराजा । महाकैवल्यतेजा । सेविती साधुसंत । मनु वेधला माझा ॥ आ० ॥ धृ० ॥ लोपलें ज्ञान जगीं । विश्व नेणती कोणी । अवतार पांडुरंग । नाम ठेविलें ज्ञानी ॥ आ० ॥ १ प्रगट गुह्य बोलें । विश्व ब्रह्मचि केले । रामाजनार्दनीं । पायीं टकचि ठेलें ॥ आ ॥ २ ॥

जयदेव जयदेव जय ज्ञानसिंधु । नामस्मरणें तुमच्या तुटती भवबंधु ॥धृ०॥ होतां कृपा तुमची पशु बोले वेद । निर्जिव चाले भिंती महिमा अगाध । भगवद्गीता टीका ज्ञानेश्वरी शुद्ध । करूनि भाविक लोकां केला निजबोध १ चवदाशें वर्षांचे तप्ती तीरवासी । येऊनि चांगदेव लागले चरणांसी । करुनि कृपा देवें अनुग्रहिलें त्यासी । येउनि आत्मज्ञान केलें सहवासी २ समाधिसमयीं सकल संत समुदाव । घेउनि सुरवर आले श्रीपंढरीराव । द्वारीं अजानवृक्ष सुवर्णपिंपळ समाव । जाणुनि महिमा निळा मागे चरणांतळीं ठाव ॥ ३ ॥

## श्रीनामदेवमहाराजांची आरती

जन्मतां पांडुरंगें । जिव्हेवरि लिहिलें । शतकोटी अभंग । प्रमाण कवित्व रचिलें १ जयजयजी भक्तराया । जिवलगा नामया । आरती ओवाळितां । चित्त पालटे काया ॥ धृ० ॥ ध्यावया भक्तिसुख । पांडुरंगें अवतार । धरूनिया तीर्थमिषें । केला जगाचा उद्धार २ जय० ॥ प्रत्यक्ष प्रचीती हे ।

वाळवंट परीस केली। हारपली विषमता। द्वैतबुद्धि निरसली ३ जय० ॥ समाधी महाद्वारीं। श्रीविठ्ठल-चरणीं। आरती ओवाळितो। परिसा कर जोडूनि ४ ॥ जय० ॥

## श्रीएकनाथमहाराजांची आरती

भानुदासाच्या कुळीं महाविष्णुचा अवतार। क्षेत्र प्रतिष्ठान नांदे गोदावरि-तीर १ ओवाळूं आरती स्वामी एकनाथा। तुमचें नाम घेतां हरे भवभयचिंता २ जनार्दनाची कृपा दत्तात्रयाचा प्रसाद। भागवतीं टीका रामायण स्वात्म-बोध ३ ब्रह्मा विष्णु महेश ज्यासी छळावया येती। न ढळे निष्ठा ज्याची ऐसी एकात्मता भक्ति ४ कावडीनें पाणी ज्याघरीं चक्रपाणी वाहे। अनन्य भक्ति-भावें निळा वंदी त्याचे पाये ॥ ५ ॥

## श्रीतुकाराममहाराजांच्या आरत्या

प्रपंचरचना सर्वही भोगुनि त्यागिली। अनुतापाचे ज्वाळीं देहबुद्धि हाविली। वैराग्याची निष्ठा प्रगटुनि दाखविली। अहंता ममता दवडुनी निजशांती वरिली १ जयजयाजी सद्‌गुरु तुकया दातारा। तारक तूं सकळांचा जिव-लग सोयरा ॥ धृ० ॥ हरिभक्तीचा महिमा विशेष वाढविला। विरक्तिज्ञानाचा ठेवा उघडुनि दाखविला। जगदोद्धारालागीं उपाय सुचविला। निंदक दुर्ज-नांचा संदेह निरसिला २ तेरा दिवस वह्या रक्षुनियां उदकीं। कोरड्याचि काढूनि दाखविल्या शेखीं। अपार कविताशक्ति मिरवुनि इहलोकीं। कीर्तन श्रवणें तुमच्या उद्धरती जन लोकीं ३ बाळवेष घेऊनि श्रीहरी भेटला। विधिचा जनिता तोचि आठव हा दिधला। तणें ब्रह्मानंदें प्रेमा डोलविला। न तुके म्हणोनि तुका नामें गौरविला ४ प्रयाणकाळीं देवें विमान पाठविलें। कलिच्या काळामाजीं अद्‌भुत वर्तविलें। मानवदेहा घेऊनि निजधामा गेले। निळा म्हणे सकळां संतां तोषविलें ॥ ५ ॥

आरती तुको स्वामी। भक्तिभाव दे नामीं। तारका गुरुराया। निज सार जा माया ॥ धृ० ॥ निर्गुण गुणवंता। तुकाराम समर्था। मागुता भेटी देई। पायीं ठेवीन माथा १ वर्तुळ दोंदपोट। नेत्र नासिक कंठ। देखिल्या दंत-पंक्ती। तुकाराम समर्थी २ देखिलें रूप जैसें। ह्यास दाविजे तैसें। सावळें रूप बापा। त्याचें लागलें पिसें ३ उंच ना ठेंगणा हो। ध्यानीं हेंचि हें राहो। मानसीं कचेश्वरा। गुरु तुकोबा पहा हो ४ ॥ आरती ॥

# कठीण शब्दांचा अर्थ



अंकणा अंकित, ताबेदार
अंगद दंडातील वाकी
अगोचर अज्ञात, अगम्य
अगोज मोठें, भयंकर
अघ पाप
अचोज नवल
अदट निश्चळ
अंदु पायइंसळी
अनारिसा निराळा, भलता
अमरेश्वर देवांचा देव
अरंबळणें ओरडणें
अर्गळा साखळी, अडसर
अर्जणें मिळविणें
अलाई बलाई अलाबला
अवर्ण अवर्णनीय
अविसाळें पक्षाचे घरटें
अवलीळा सहज
असुमाय आश्चर्यकारक
अवस्था वध
असोस हाय
अळीव वयांत आलेला
अळुमाळ किंचित्
आखिला अंकित
आडणी अडचणीची वेळ
आडदरा धाक, भीती
आडळ अडचण
आतळणें स्पर्श करणें
आतुडणें सांपडणें
आथिलें असलेलें
आंदणी लग्नाच्या देणगींत मिळालेली दासी
आपंगणें प्रेमानें जवळ घेणें, पोसणें
आंबुला नवरा
आभरण अलंकार
आयणी वासना
आरजा श्रेष्ठ
आरता अलीकडे
आरळ मृदु
आराणूक १ आवड २ खटपट ३ सुख
आरुष वेडावांकडा
आरोथा इच्छा
आलोलीक प्रेमळ
आल्हर अंगाईगीत
आवर्त भोवरा
आहाच वरवर
आहाचता वरवरची कृती
आहाळणें पोळणें
आह्या ज्वाळा
आळुका १ भुकेला २ आसक्त ३ लाडक
उगलें व्यर्थ
उगळणें माघारी येणें

उगाणा झाडा
उच्चैश्रवा इंद्राचा घोडा
उजगरा १ उशीर २ श्रम ३ जागरण
उजरी उदय, उत्कर्ष
उजवणें साफल्य
उदो उदय
उद्भट १ बलवान २ कठोर ३ भेठ
उद्वस व्यर्थ, फुकट
उथळणें उबळणें
उन्मनी जागृती, स्वप्न, सुषुप्ती, तुर्या या चार, अवस्थेपलीकडची पांचवी अवस्था
उन्हवणी ऊन पाणी
उपचार उपाय
उपणणें पाखडणें
उपरमणें रममाण होणें
उभनी उभारणी
उमसणें सांगणें
उष्णकरु सूर्य
ऋणवई ऋणी
एकवंकी ऐक्य
एकसरें एकदम
ओखद औषध
ओगरणें आश्रय घेणें
ओढण ढाल
ओळगणें आश्रय घेणें
कइवाड १ खोल विचार २ कैवार
कडसणें शुद्ध करणें
कडाडी कडकडून, एकदम
कपाट दार
कमळगर्भा ब्रह्मदेव
कर्मर एक शस्त्र
कल्पकोडी एक कोटी कल्प (कल्प म्ह. चार युगाची एक चौकडी अशा हजार चौकडया )
कल्पद्रुम कल्प वृक्ष
कव आलिंगन
कवळ कावीळ
कसवटी करामत
कळासणें जखडणें
काट मळ
कांटवण कांटेरी रान
कानडा दुर्बोध
काहाळ वाजविण्याचें शिंग
काह्या कशास
किंकिणी घागऱ्या
कीळ प्रभा
कुटी आरोप, निंदा
कुडा( ढा )वा रक्षण
कुतका वरबंटा
कुवाडें कोडें
केणें माल
केवा थोरवी, सामर्थ्य
कोंवसा आश्रय
खद्योत काजवा
खाणोरिया, खाणोरी खादाड, अधाशी
खेव आलिंगन
खेवण कोंदण
खोप केंसाचा झुपका
गढणी मैत्रीण

गयावळ गयेतील पंडे लोक
गरुवा मोठा
गव्हर गुह्य
गव्हार गांवढळ, अडाणी
गळाळा घोट
गाल्होरा गालगुच्चा
गांवढे गांवढळ
गिऱ्हे ग्रह
गुढार गूढ, कोडें
गुमान अहंकार
गोमटें गोड, मनोहर
गोसावी इंद्रियांचा मालक
घरटी फेरी
घाई चर्मवाद्यांचा गजर
घुमरी विपुलता
घुरट उग्रट वासाचें
घोणें मोटें
चतुर्देह चार शरीरें
चंद्रधर्णी मनाची तृप्ती
चळथा १ राशी, ढीग
२ स्वासोच्छ्वास क्रिया
चांग चांगला
चाड बुद्धि
चिताक स्त्रियांच्या गळयांतील एक दागिना
चिंतवणी काळजी
चिरा दगड
चुकूर १ चुकवाचुकव २ बावरलेला
चेइरे जागृती
चाड चेटुक

चोखडा खरा, शुद्ध
चोज करणें कोडकौतुक पुरविणें
चोजविणें शोधणें
चोहोटा चव्हाटा
चौक चतुष्कोण
जंबीर लिंबाची एक जात
जमान जामीन
जाजावणें १ रागावणें २ भासणें
जिआलें जीवन
जुंतणें जुंपणें
जोगावणें पोसणें
जोजार भार
जोपन संगोपन
झड झडप, लगट
झणीं कदाचित्, नको
झळंबणें पोळणें
झळाळ प्रकाश
झाडापाडा झडती; हिशेबाचा निकाल
झेंगट काशाचें एक वाद्य
टकळा वेध
टेहणीं १ देखरेख २ टवाळी, हंसें
ठाण १ आकृती, शरीराची ठेवण
२ स्थान, जागा
डांग कांठी
डाय डाव
डिंगर लाडका
डोंगा वांकडा
ढाळ तेज
तपन सूर्य
तमारि सूर्य

तरणी सूर्य
तातणें तप्त होणें
त्रिभंगी तीन ठिकाणी वांकलेला
तुक महत्व, योग्यता
तुकणें वजन करणें
तुरा तुतारी
तुरतुरा झपाट्यानें
तुरंबणें खोवणें
तूर्या जागृति स्वप्न व सुषुप्ती, यापलीकडची चौथी अवस्था
तोडर तोरडी, तोडा
थाटी जमाव
थाया हट्ट
थिता व्यर्थ
थीत १ असलेलें, २ व्यर्थ
दमामा नगारा
दाटुगे श्रेष्ठ, बलवान
दादुला १ वीर, शूर २ नवरा
दिंडी वीणा
दिवीं दिवा
देकार देणगी
देशवटा } देशत्याग
देशवटी }
देशाउर भिक्षाटण
देशिक गुरु
देहुडा दिडका, एक पुरा टेकून दुसरा अर्धा टेकलेला
दुचाळा अडचण
दुडी घागर
दुणेदार दुप्पट करणारा
दुमाला मागची बाजू
दुरळ खडतर, कडक
दुरित पाप
दुर्भेर बुद्धीनें आकळण्यास कठीण
दोहावा दुर्भंत
धणी आशा, इच्छा
धिवसा उत्कट इच्छा
धीरा आश्रय
धुंद्वात वातावरणातील खळबळ
नस्वारित त्वरित
नळणी सूर्यविकासिनी कमलिनी
नागर कांतिमान
नाड अडचण
नाथणें वेसण घालणें
नाथिला लटिका
नावेक क्षणभर
नाहो नाथ, पति
निखळ केवळ, निर्भेळ
निगुरा पोरका
निघोट १ परिपूर्ण, २ सरळ
निडारणें पाण्यानें डबडबणें,
निढळवाणे निराश्रित
निदसुरा निद्रेंतला
निधाई धन्य, कृतकृत्य
निरास निराशा
निरुता खरोखर
निरुतें शुद्ध, खरें
निर्बुज मंद, दिङ्मूढ

निर्भरता पूर्णता
निशाण पताका
निसुरवाणा निष्काळजी
नीलोत्पल निळें कमळ
नेटेपाटें लवकर
नेहटणें लक्ष लाऊन पहाणें
नेहटें निश्चयानें
पडिपाडें सारखें
पडिपाडु सारखेपणा
पडिभर अतिशयता, अधिकता, भर
पढिया आवडता
पढियावो आवड, प्रेम
परजणें फिरविणें
परपडा गुंतलेला, दुःखी
परयेळ ताट
परवर घराची जमीन, भुइ
परिकर चांगलें
परियसणें एकणें, लक्ष देणें
परियंक पलंग
पवाडा ख्याति
पाइक चाकर, पायदळांतील शिपाई
पांग उत्कट इच्छा, आशा
पांगिला अंकित
पाटण शहर
पाटोळा रेशमी वस्त्र
पाडेवार महार
पाणचोर गारोड्याजवळचें एक पात्र
पाणी हात
पातेजणें विश्वासणें
पावळ तीर

पायवणी पायाचें तीर्थ
पायवाट पायांतील अलंकार, अगर पायपोस
पारखा परका
पारणें तृप्ति, आनंद
पारावार अलिकडचें व पलीकडचें तीर
पारुषणें खुंटणें, नष्ट होणें
पालउ पदर
पालाण १ आच्छादन २ खोगीर
पावटणी पायरी
पाहाणे उजाडणें
पाळती जतन
पिपाशा तृष्णा
पिलंगणें लपत लपत जाणें
पिसुण चहाडखोर, दुष्ट
पुड पुढें
पुंजाळणें पसरणें, चकाकणें
पेंडोळें गुंडाळा, बांध
पेणावणें उठवणीस येणें
पेणें मुक्काम
पेहे पेय
पोकारणें हाक मारणें
पोहणी घाण, दुर्गंधी
प्रत्यवाय दोष
प्रासाद राजवाडा
फटमर भित्रा, फजितखोर
फाटा १ बहकणें २ आडरान
फुडी खरी
फुंद गर्व
बडिवार मोठेपणा, कीर्ति

बरवंटा सुंदर, देखणा
बराडी आशाळभूत, खादाड
बसवंत उपास्य दैवत
बागडा नाचणारा, खेळकर
बाजागिरी गारुड, नजरबंदी
बांदोडी बंदीवास
बारगीर दुसऱ्याचें मागून आणलेलें
बासर भटक्या, स्वच्छंदी
बाह्‌ हात
बिढार बसतिस्थान
बिर्दी गल्ली
बिंदुली चंद्रबिंदु
बांक शोभा
बुंथी वेष
बुनादी अनादि काळ
बेंबळ ढिला
बेरसा विचारशून्य, दांडगा
बोभाइणें ओरडणें
बोहरी नाश
बोळावा सोबती, मुक्कामापर्यंत पोचविणारा
भंडाई आपकी
भणदी पोत, मशाल
भरोवरा सायास, श्रम
भर्जिलें भाजलें
भद्रजाति उत्तम लक्षणयुक्त हत्ती
भाक आश्वासन
भाजन पात्र
भांड नाटक करणारा
भाणें भांडें
भातलवंडा चांगदेवाच्या कृपेनं झालेला मुलगा, याचे जन्माचे वेळीं नदींत भात लवंडला म्हणून नांव पडलें.
भिंगुलें आरसा, काच
भूतकाय स्थूल शरीर
भूचर जमीनीवर फिरणारे
भुररें चेटुक
भेव भीति
भेषज औषध
भोज आवड
मतितार्थ सार
मधुपर्क सन्माननीय शिष्टांचें आतिथ्य म्हणुन पाय धुवून पूजा करणेचा विधी
मयंक चंद्र
मशक चिलट
मसी शाई, काजळ
माजिठें आंत
माजियेन माझ्या
मात गोष्ट
माथुलें डोक्यावरचें मडकें
मांदळा मोठा मृदंग
माव गौड बंगाल
मिराशी वतन
मुक्तलग मोती लावलली
मुऱ्हाळी बोलावणें
मुशारा मजुरी
मोहरें पुढें
मोहरी पुंगी, मुरली
म्हणियारा सेवक, दूत
यथानिगुतीं योग्यरीतीनें

यज्ञावदान यज्ञांतील एका आहुतीपुरतें यज्ञद्रव्य
युगल जोडी
येसणा एवढा, इतका, असा
रवा दिव्य करतांना तापलेल्या तेलांतून काढलेल्या धातूचा तुकडा
रळी हट्ट
राउळ देव
राणीव राज्य
रातणें रममाण होणें
रुचीक स्वादिष्ट
रूपस सुंदर
रुळणें लोळणें, शोभिवंत दिसणें
रेखिला नीटनेटका
रुटीसुटी भरीत रोडगा
लवडसवडीं त्वरेनें
लाग शोध
लागवण त्वरा
लाहातें लाभदायक
लागभाग संबन्ध
लागवेग अति त्वरा
लागावळी संबन्ध
लाटे मोठें
लाहो हव्यास, लाभ
लिगाड १ अडचण, कटकट २ चिकटा
लीळाविग्रह परमेश्वरानें लीलेनें धारण केलेलें शरीर
वक्रोक्ति वाकडें बोलणें
वज्रकवच पोलादी चिलखत
वज्रपाणी इन्द्र
वरपडा स्वाधीन झालेला
वरळा फोल व धान्य यांची मिसळ
वर्दळ त्रास, उपसर्ग
वसुमती पृथ्वी
वहिली सुंदर
वहिलें खरोखर
वाड अमर्याद, विस्मयकारक, थोर
वाडेंकोडें कौतुकानें
वाखा दुःख, पीडा
वायणें दाखविणें
वारिकें वाहन
वालादुला जिवलग
वाली प्रिया
वाल्हे जिवलग
वासिपे भय
वाह प्रवाह
विखार विषारी
विघडणें नाश करणें
विंजणा पंखा
विदग्ध } कुशल, चतुर
विद्रुद } सुंदर
विज्ञान प्रपंच
विधि ब्रह्मदेव
विनटणें तल्लीन होणें
विरंची ब्रह्मदेव
विवळणें प्रकाशणें
विसुरा विस्मय
वीरगुंठी वीराच्या मस्तकावरील केसाचा झुंबाडा
वृंद समुदाय

वेठी तुरा
वेसी आसरा
वेळाइत आणीबाणीच्या वेळी मदत करणारा कैवारी
वोज मार्ग, रीत
वोजा चगल्या रीतीनें, सहज
वोजावणें रीति
वोडवणें प्राप्त होणें, पुढें करणें
वोडियाणा बंधु उड्डीयान बन्ध, एक मुद्रा
वोढावारा प्रतिबंध
वोतप्रोत ओतप्रोत
वोथंबणे आश्रय होणें
वोथरणें ओथंबणें
वोपणें देणें
वोरवारा खटपटें
वोरस प्रेमभरानें फुटणारा पान्हा
वोल्हावणें ओले होण, शांत होणें
वोसणणें झोपेंत बरळणें
वोसंग मांडी
वोसाणें पुरांतील लाकडें
वोसावणें गळून जाणें
वोळगणें आश्रय करणें
वोळंगण आश्रय
वोळगणा दास, सेवक
वोळणें प्रसन्न होणें, अनुकूल होणें
वोळसा १ फेरा, २ भोंवरा
व्यंकट वांकडा
शची इन्द्राची पत्नी
शिराणी १ उपभोग २ कळस
शेजार शय्यागृह
सधर आश्रययुक्त, बळकट
संप्रधार युक्तायुक्त विचार
संभ्रम १ आदर २ भ्रांति
सम्यक सारखा
सरता कृतकत्य, ग्राह्य
सरिसा जवळ
संवसाटी बरोबर
सहवदणें परटाचें कपडे धुणेचें भांडें
सळ युक्ति
सळे सत्वर
साउमा समोर
साजणी सखी, मैत्रीण
साटी बदला
साटोप खटपट, अत्याग्रह
सांडवर नवरा सोडून गेलली स्त्री
सांत बाजार
साबडें भोळें भाबडें
सालझाला साल अखेरचा हिशेब
सावाधावा धाऊन येऊन केलेलें साह्य
साळढाळ साधा
सीतकरू चन्द्र
सीस मस्तक
सुती १ सरळ, बिनचूक २ निजलेली ३ नाद, छन्द, लोभ
सुयणी सुईण
सुरपति इन्द्र
सुरवाड १ शुद्ध, चोख २ सुख ३ सुकाळ
सुरवाडणें सुखावणें

# अभंग सूचि



प्रथम अभंगाचा क्रमांक, नंतर अभंगाचीं आद्य अक्षरें व शेवटीं ज्या संताचा तो अभंग त्यांच्या नांवाचीं आद्य अक्षरें दिलीं आहेत. संतनामांचा संक्षेप खालीलप्रमाणें आहे.

**तु.—तुकाराममहाराज, निळो.—निळोबामहाराज, तु. बं. कान्होबामहाराज, नाम.—नामदेवमहाराज, ज.—जनाबाई, भा.—भानुदासमहाराज, जनार्द.—जनार्दनस्वामी, ए.—एकनाथमहाराज, निवृ.—निवृत्तिनाथ, ज्ञा.—ज्ञानेश्वरमहाराज, सो.—सोपानमहाराज, मु.—मुक्ताबाई, न.—नरहरिमहाराज, से.—सेनामहाराज, चो—चोखोबामहाराज, कर्म.—कर्ममेळा, कचे.—कचेश्वर, रा.—रामेश्वरभट्ट, रं.—रंगनाथस्वामी. कान्हो.—कान्होपात्रा.**

**अभंग क्रमांक १८४७ ते १८८६ दुबार झाल्यानें त्या अभंगांचा क्रमांक न देतां ते अभंग ज्या पानावर आहेत त्या पानांचा क्रमांक ( पा....... ) असा दिला आहे.**

### झ

क्ष



ज्ञ



—:०:—

( शब्दार्थ पान ८ वरून पुढें चालू )

सरवार सुख
सूदणें घालणें
सेल निवडक, शेलका
सोकणें कोरडें होणें
सोनसळा सोनेरी काठाचा
सोम चंन्द्र
सोर आक्रांत
सौदागर व्यापारी
सौरसु गोडी, प्रेम
हडबडणें गोंधळून जाणें
हाट बाजार
हातोफळी १हातो हात, तात्काळ
२ हाताची ओंबी
हारप अक्षर
हिंपुटी कष्टी, खिन्न
हुड तिरस्कार
हेल घालणें नवीन मूल जन्मल्यावर दहा दिवस पाणी व दूध फुकट पुरविणें
हेळामात्रें लीलेनें, सहज
होंट ओठ
क्षेम आलिंगन

---

# शुद्धिपत्र

| पान व ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|
| २१।२५ | राननाम | रामनाम |
| २८।६ | तप्तामाजीं | तपामाजीं |
| ६६।२० | वोग ले | वोगरलें |
| ६६।२५ | व्यर्थ ली | व्यर्थ व्याली |
| ६६।२६ | द्धीचा | सिद्धीचा |
| ,, ।२६ | दव | दैवें |
| ७३।१ | पत्तकांचे | पताकांचे |
| ७३।३० | पलपार | पैलपार |
| ७४।१ | भण | भेणें |
| ९४।२६ | ठलो | ठेलों |
| १०९।१६ | परिमिळ | परिमित |
| १४०।२९ | घलो | बांधलो |
| १४८।१७ | जापुली | आपुली |
| १६३।३१ | मूति | मूर्ति |
| १७५।३२ | वेसे | ऐसें |
| १९३।२१ | स्वकळा | सकळा |
| १९७।३० | स्हामी | स्वामी |
| २०४।३२ | ओठा | ओठीं |
| २१७।१२ | पाळंखी | पालखी |
| २१८।१ | हाही | दाही |
| २४४।२३ | निचार | विचार |
| २५४।३ | धर्मनति | धर्मनीत |
| ३६०।२५ | अगोदर | अगोचर |
| २६५।२९ | सांद्यावरी | खांद्यावरीं |
| २७२।१२ | धन्व | धन्य |
| २८१।३१ | धम्य | धन्य |
| २८९।२३ | कसुरी | कुसरी |
| २८९।३२ | भवश्रव | भवश्रम |
| २९०।२ | तुर शंख | तुरे शंख |
| २९१।३१ | सदर्शन | सुदर्शन |
| २९९।३२ | वैष्णव | नाचताती वैष्णव |

| पान व ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|
| ३०५।५ | पातकांचे | पताकांचे |
| ३२७।५ | आपुसी | आपुली |
| ३४४।८ | दृष्टी | दृष्टी न |
| ३५१।२ | आम्हा शरण जीवन | आम्हा जीवन |
| ३६९।२५ | सूत्र | मूत्र |
| ३७४।१ | चापुले | आपुले |
| ३८७।१७ | इनुष्य | मनुष्य |
| ४२५।१ | मृते तुप्ती | तृप्ती |
| ४३२।१७ | शिष्णू | विष्णु |
| ४५६ १८ | र नेह | स्नेह |
| ४७३।१४ | बु:ख | दु:ख |
| ४७९।२७ | निजान्मया | निजात्मया |
| ४८१।२६ | जमात | जामात |
| ४८२।३ | वहिणीची | बहिणीची |
| ४८२।२९ | पका | एका |
| ५०७।१ | धळिवंता | बळिवंता |
| ५१६।२३ | निखितत | निरखित |
| ५३०।२ | खमाधि | समाधि |
| ५३२।२९ | झेउनी | घेउनी |
| ५५१।११ | जुगाट | जुनाट |
| ५५४।२३ | संखारी | संसारीं |
| ५५६।२९ | किरविले | फिरविलें |
| ५५६।१६ | जुत्पत्ती | उत्पत्ति |
| ५७६।३० | मळमून | मळमूत्र |
| ५७७।१७ | निसरला | निरसला |
| ६०८।१८ | लाषुनिया | लावुनिया |
| ६१७।१ | सोनियाचा ला | सोनियाचा दिला |
| ३२४।१६ | मी डान | मोडून |
| ६४६।११ | सामान | यमान |

---